त्यांवरून व कवनांचा एकंदर आशय पाहतां, भूषणानें इतिहासाचा विपर्यास बिल-कूल केलेला नाहीं. साधींच व सत्य वर्णनें तो उत्कृष्ट कवितेंत रसात्मक करून दाखवितो. शिवाजीचे पराजय अथवा गैरकृत्यें यांचेंही त्यानें वर्णन केलेलें आहे, ( पहा, शि. भू., छंद ६३, ९९, २१२, २१३, २५२. ) केवळ कवनांच्या जोरावर धन आणि सन्मान जितका भूषण कवीनें मिळविला, तितका दुसऱ्या कोणीं कधींही मिळविला नसेल. त्याच्या कवनांवर लुब्ध होऊन शिवाजीनें त्यास लाखों रुपये बक्षीस दिले. भूषणाचें वर्णन इतिहासाचे विरुद्ध नसल्यामुळें त्याचें मराठींत भाषांतर होणें अत्यंत जरूर आहे. 'शिवाबावनी' छंद २०, २१ व २२ यांत औरंगजेबानें मथुरा, काशी येथील मंदिरें नष्ट केलीं, त्याचें हुबेहूब वर्णन आहे. जितकीं जितकीं शिवाजीचीं कृत्यें अद्भुत तितकें भूषणाचें वर्णन प्रभावशाली झालें आहे, ( पहा, शिवा. छंद ४२, ४५ व ४६. ). 'शिवराज भूषण' हें नांवच किती तरी अन्वर्थक आहे. शिवराजाचें यश ज्यांत वर्णिलें आहे, म्हणजे ज्याचे योगानें त्याला भूषण प्राप्त झालें, असा एक अर्थ. शिवाय, भूषण म्हणजे अलंकार. त्यायोगानें 'अलंकारशास्त्रावरील हा ग्रंथ' असा त्या नांवांत गर्भित अर्थ आहे. भूषण कवीनें हा ग्रंथ बनविला असाही तिसरा एक अर्थ त्यांत व्यक्त होतो. एकंदरींत 'शिवराजभूषण' हा फार सुंदर व प्रशंसनीय ग्रंथ असून, त्यांत शिवाजीच्या शीलगुणांचें हुबेहूब चित्र सांपडतें. शिवाजी देवीभक्त होता, तसाच शिवभक्तही होता असें छंद १४, १५८, २३६, ३२६ यांवरून नक्की ठरतें.

शिवा-बावनी सुद्धां स्वतंत्र ग्रंथ नाहीं. त्यांत फक्त भूषणांचीं बावन कवनें आहेत. शिवराजभूषणापैकीं १।२ व भूषणाच्या स्फुट कवनांपैकीं कांहीं या शिवा-बावनींत आहेत. हा ग्रंथ जरी लहान असला तरी फार मनोहर व शिवराज-भूषणापेक्षां जास्त वीर्यशाली आहे. हीं सर्व कवनें कवीनें शिवाजीला पुनः पुनः म्हणून आयकविलीं. भूषणानें या सर्व कवनांत व्रजभाषा वापरिली असून, ती महाराष्ट्रांत शिवाजीस व इतरांस चांगली समजत होती, असें त्यांतील मतलबावरून दिसतें. त्यांत कांहीं प्राकृत, बुंदेली व फारसी वगैरे शब्दांचेंही मिश्रण आहे. एकंदर ग्रंथांत मिळून दहा प्रकारचे छंद वापरिले असून, त्यांचीं नांवें मनहरण, छप्पय, दोहा, मालती सवैया, हरिगीतिका, लीलावती, किरीटि सवैया, अमृतध्वनि, माधवी सवैया, आणि गीतिका अशीं आहेत. पण मुख्यतः मनहरण व मालती सवैया यांवरच विशेष भर आहे. अलंकाराचें लक्षण दोहा वृत्तांत दिलेलें आहे. कविता वाचतांना विराम चिन्ह कोठें कसें समजावें हा प्रश्न पडतो; आणि रसोत्पत्ति

होण्यास विराम बरोबर ठेवले पाहिजेत. त्यांत येणाऱ्या नानाविध व्यक्ती व स्थलें यांचा पुरेपूर छडा लावून संपूर्ण टीपांसह भूषणाचे ग्रंथ वाचकांपुढें येतील, तरच त्यांचा इतिहासास मोठा उपयोग घडेल. युद्धकाव्याच्या रचनेंत भूषणाची बरोबरी करणारा दुसरा कवि झाला नाहीं. भूषणाची कविता म्हणजे हिंदी साहित्याचें खरोखरच भूषण असून, त्याची गणना महाकवींत करणें अवश्य आहे असें हिंदी तज्ज्ञ मानतात. शिवचरित्र प्रदीपांत रा. दिवेकरांनीं ले. ३९ त शि. भूषण काव्याच्या समाप्तीची मिति २१-६-१६७४ दिलेली बरोबर आहे.

---

# प्रस्तावना.

ले. रामचन्द्र गोविन्द काटे.

उत्तर हिन्दुस्थानांत राहणाऱ्या व हिन्दी भाषा बोलणाऱ्या 'भूषण कवीं'नीं दक्षिणेंतील महाराष्ट्रीय राजांचा इतिहास काव्यबद्ध करणें, व या कारणामुळें हिन्दी भाषेचा कवि, महाराष्ट्राच्या प्रेमाचा व परिचियाचा होणें हा खरोखर अपूर्व योग आहे. हिन्दींतील संत कवि तुलसी, सूर, कबीर, हे महाराष्ट्रास अपरिचित आहेत असें नाहीं, पण त्यांचा विषय निराळा व कविवर भूषणाचा निराळा. महाराष्ट्राचा आत्मा अशा शिवरायाचें यथातथ्य गुणवर्णन करून या कवीनें महाराष्ट्रास ऋणी केलें आहे. असो.

हिन्दुपद पातशाही स्थापन करणाऱ्या श्रीशिवाजी महाराजांच्या पदरीं कविवर 'भूषण' होते. त्यांना प्रत्यक्ष शिवाजी महाराजांचा सहवास लाभला होता, ह्याबद्दल ते स्वतःस धन्य मानून घेत असत. त्यांना हिन्दुत्वाचा जबरदस्त अभिमान असल्यामुळें व त्या काळीं उत्तरेकडील बहुतेक सर्व हिन्दूंचीं संस्थानें दिल्ली तक्ताच्या ताटाखालचीं मांजरें बनल्यामुळें ( छंद १७–१८), या जातिवन्त हिन्दु कवीस यवनांचे स्तुतिपाठ करणें अगदीं आवडेना. याच कारणामुळें कविवर उत्तर हिन्दुस्थान सोडून, वेद, स्मृति, पुराणें, रामनाम तसेंच हिन्दुत्वाचें चिन्ह तिलक, यज्ञोपवीत, आणि गळ्यांतील माळा यांचें तरवारीच्या जोरावर संरक्षण करणाऱ्या मराठा धर्मवीर श्री शिवाजींची देशोदेशीं पसरलेली कीर्ति ऐकून दक्षिणेंत आले, ( छंद ४९–५१ ). कविवरास मनाजोगता चरित्रनायक मिळाल्यामुळें त्यांनीं मन मोकळें करून त्याची स्तुति गाइली आहे. 'शिवराज भूषण' मध्यें कवीनें म्हटलें आहे कीं,

**'सिव चरित्र लखि यों भयो कवि भूषन के चित्त।**
**भाँति भाँति भूषणानि सों भूषित करौं कवित्त'॥**

शिवचरित्र पाहतांच माझ्या मनास असें वाटूं लागलें कीं, तें चरित्रपर कवन नाना प्रकारच्या भूषणांनीं ( काव्य अलंकारांनीं ) सजवावें. तसेंच,—

**जे सोहात सिवराज को ते कवित्त रसमूल।**
**जे परमेश्वर पैं चढै तेई आछे फूल॥**

देवाला वाहिलीं जाणारीं तींच फुलें जशीं धन्य, तसें ज्या कवितेनें शिवराज भूषविला जाईल तीच कविता रसभरित होय. ह्या इच्छेप्रमाणें कविवरांनीं खरोखरच

नानाप्रकारच्या अर्थालंकारांनीं व शब्दालंकारांनीं शिवचरित्र भूषविलें आहे. शिव-राज–भूषण हें काव्य या म्हणण्याची साक्ष होय. कविवरांनीं चार काव्यें लिहिलीं असें म्हणतात, शिवराज–भूषण, भूषण–हजारा, भूषण–उल्लास, व दूषण–उल्लास. पैकीं शिवराज–भूषणांतच शिवा–बावनीचाहि समावेश होतो. शिवाय छत्रसाल-दशक व तितकीच आणखी स्फुट कविता प्रसिद्ध आहे. बाकी तीन अनुपलब्ध आहेत. शिवराज भूषण हा अलंकारशास्त्रावरील हिन्दी भाषेंत अनुपम ग्रंथ आहे.

शिवाबावनी ह्या छोटेखानी काव्यासंबंधीं अशी आख्यायिका* आहे कीं, भूषण कवि शिवाजीचा आश्रय मिळविण्याकरितां दक्षिणेंत आल्या वेळीं एके संध्या-काळचे सुमारास एका देवालयांत संध्या करण्याकरितां उतरले असतां, त्याच देवा-लयांत शिवाजी महाराज अकस्मात् देवदर्शनाकरितां आले. अर्थात् दोघेही एकमे-कांस ओळखीत नव्हते. शिवराजांनीं त्यांना कोण कोठील वगैरे विचारपूस केली. हे कवि असून राजाश्रयाकरितां शिव–दरबारांत जाणार आहेत असें समजल्यावर शिवरायांनीं तेथेंच कांहीं कवित्व त्यांजकडून ऐकण्याची इच्छा प्रदर्शित केली. भूषणानीं लगेच शि. भू. मधील छंद ५६ म्हणून दाखविला.

एकदां व एकच छंद ऐकल्यानें शिवरायांची तृप्ति झाली नाहीं, म्हणून त्यांनीं पुनः पुनः तो म्हणण्याचा आग्रह धरिला, तेव्हां भूषणांनीं वरील ५२ छंद त्यांस म्हणून दाखविले; कोणी म्हणतात फक्त वरील एकच छंद शिवरायांनीं अठरा वेळ ऐकिला व पुनः म्हणण्याचा आग्रह धरिला, तेव्हां भूषण कंटाळल्यामुळें म्हणाले नाहींत. त्या वेळीं शिवरायांनीं स्वतःची ओळख देऊन सांगितलें कीं, जितके वेळां तुम्हीं वरील छंद म्हणालां असतां तितके लाख रुपये तुम्हांला मिळाले असते; आतां अठरा लाखच तुम्हांस मिळतील. या आख्यायिकेस कांहीं आधार नाहीं. वरील आख्यायिका खरी मानल्यास शिवरायावर स्तुतिप्रियतेचा दोष येण्याचा संभव आहे. असो. इतकें मात्र खरें आहे कीं, शिवरायांपासून भूषणांना द्रव्यलाभ फार झाला होता व अखेर-पर्यंत ते श्रीमंतींत राहिले, हें त्यांच्याच काव्यांतील कांहीं उतार्‍यांवरून दिसून येईल.

या राष्ट्रीय कवीचें जीवनचरित्र उपलब्ध नाहीं तरी पण त्यांच्या उपलब्ध काव्यांतील एकादा छंद अस्तित्वांत आहे तोंवर त्यांचा विसर पडणार नाहीं.

शिवराज–भूषणाच्या आरंभीं तीन चार * दोह्यांत कवीनें स्वतःसंबंधीं माहिती सांगितली आहे. शिवाबावनींत छंद ४९ मध्यें कवीनें म्हटलें आहे कीं, हिन्दूंचें धर्म-

* भूषण ग्रंथावलि, काशी नगरी प्रचारिणी सभा या भूमिकेवरून.

चिन्ह संरक्षण करणारा, व यवनांचा पराजय करून देशांचे देश काबीज करणारा, अशी शिवाजीची कीर्ति मीं ऐकिली.

अर्थात् ही कीर्ति ऐकल्यानंतर भूषण कवि दक्षिणेंत आले असावे. छंद ४९ मध्यें वर्णिलेली कीर्ति राज्याभिषेकाच्या सुमारास चहूंकडे झाली असावी असें वाटतें. कसेंही समजलें तरी कविवरांस शिवरायाचा सहवास आठ एक वर्षें लाभला असें मानण्यास हरकत नाहीं. शिवरायांच्या पश्चात् कविवर बुंदेलखंडाधिपति छत्रसाल यांच्या आश्रयास जाऊन राहिले. संभाजीचा पुत्र शाहू महाराज यांच्या भेटीस सन १७१५ मध्यें कविवर पुन्हां आले असावे असें त्यांच्या स्फुट काव्यांतील छंद ७ व १० वरून वाटतें.

शिवा-बावनींत कवीनें जे ऐतिहासिक प्रसंग वर्णिले आहेत, ते संक्षेपतः खालीं देत आहें:—

औरंगजेबानें आपला सख्खा वडील भाऊ जो दारा त्यास आग्र्याच्या किल्ल्यांत जिवंत चिणलें. आपला बाप जो शहाजहान त्याचें राजछत्र हिसकावून घेतलें; मुरादबक्षाशीं विश्वासघात न केल्याबद्दल कुराण उचलून खुदाची खोटी शपथ घेतली व इतर गोत्रजांना हत्तीच्या पायांखालीं तुडवून मारविलें ( छंद १३–१४ ).

औरंगजेबानें शिवाजीस भेटीस बोलाविल्यावेळीं कडेकोट बंदोबस्त ठेऊन स्नानागारांत शिवाजीची भेट घेतली. इतिहासांत ही भेट स्नानागारांत झाल्याबद्दल कोठें उल्लेख नाहीं पण शिवा-बावनींतील छंद नं. १५ व शि. भू. तील पांच छंदांतून ही भेट स्नानागारांतच झाली असें वर्णन आहे. ( छंद. नं. १५ )

औरंगजेबानें शिवाजीस पंचहजारी सरदारांच्या रांगेत उभें करून त्याचा अपमान केला, त्यामुळें क्रुद्ध झालेल्या शिवाजीस पाहून दरबारी लोकांच्या तोंडचें पाणी पळालें व औरंगजेब काळा ठिक्कर पडला. ( १६ )

छंद १७ व १८ मध्यें कवीनें औरंगजेबास भ्रमर व इतर रावराण्यांस निरनिराळीं फुलें व शिवाजीस चंपक पुष्प कल्पून मोठ्या चतुराईनें दाखविलें आहे कीं, औरंगजेब उत्तरेकडील रावराण्यांपासून करभार घेतो पण दक्षिणेची लाज राखणाऱ्या शिवाजीकडून मात्र त्याला कांहीं घेतां येत नाहीं. ( १७,१८ ).

देवालयांचा विध्वंस, मूर्तिभंग, यवनमत-प्रचार इत्यादींचें सर्व साधारण वर्णन छंद १९ मध्यें आहे.

औरंगजेबाचे पूर्वज हुमायून, अकबर, शहाजहान यांना हिन्दूंविषयींचा आदर असून त्यांनीं हिन्दूंच्या धर्मांत ढवळाढवळ न करितां वेदमर्यादा कायम राहूं दिली. ( २० )

पण असुरी कुंभकर्ण अवतार जो ओरंगजेब त्यानें मथुरा, काशी इत्यादि पवित्र क्षेत्रें तेथील देवालयांचा, देव–देवतांचा विध्वंस करून भ्रष्ट केलीं. मथुरेंत तर सार्वत्रिक कत्तल करून ' रब ' ची द्वाही फिरविली व शेंकडों हिन्दूंना मुसलमान केलें. ( २१ )

इखलास खां सरदार शेख सय्यद मोंगल पठाणाच्या सैन्यानिशीं शिवाजीवर चाल करून आला पण त्याचें कांहीं एक चाललें नाहीं व अखेरीस साल्हेरीच्या युद्धांत त्याचा पराभव झाला. ( २४–२५ )

सर्व दक्षिण देश पादाक्रांत केला, व गुजराथेचें मुख्य ठिकाण जें सुरत शहर तें लुटून फस्त केलें. ( २६ )

सर्व निवडक किल्ले शिवाजीनें घेतल्यामुळें हताश झालेल्या बहादरखान सुभेदारानें आपल्या हाताखालील लोकांस ' आतां काय करावें ' असा सल्ला विचारला. लोकांनीं त्यास सांगितलें कीं, शायिस्ताखान व जयसिंगासारख्या सिंहास जेथें सिंहगड सोडून पळून जावें लागलें तेथें तुमचा काय पाड ? २७

' जावळीच्या चंद्रराव मोऱ्यास मारून जावळी हस्तगत केली. मोंगल सैन्याचा पराभव करून अफजलखानास मारिलें. पन्हाळगडावर शिवाजीच्या तोफा येऊन ठेपल्या; शिवाजीकडे पाठविण्याचा करभार लौकर कां पाठवीत नाहीं ? ' असें आदिलशाहाच्या बेगमा विमनस्क होऊन त्यास विचारीत आहेत ( २९ )

सबंध द्रविड प्रान्तावर शिवाजीचा भयंकर दर्प बसला ३०–३१

अफजलखानाचा वध व विजापूर गोवळकोंडा यांचा पराभव करून रुस्तुमखानास भस्मसात केलें, मुसलमानांचीं जहाजें लुटलीं, फ्रेंच आणि पोर्तुगीज यांनाही हात दाखविला. ३२

शिवाजीनें ' राजा ' होण्याची इच्छा प्रकट केल्यामुळें हिंदुस्थान व त्या बाहेरील लोकांच्या उडालेल्या दैन्याचें वर्णन. ३३

जेथें जेथें बादशाही होती, तेथें तेथें शिवाजीचा अप्रतिहत अधिकार चालू झाला. ३४

मौरंग, कमाऊन, पलाऊ, येथील राजांना कैद केलें, बावनी व वंजा व नव-कोठी येथील राजांस निस्तेज केलें, काबुल, कंदाहार, खुरासान इत्यादि परराष्ट्रांस जर्जर केलें. ४३

कर्नाटकचा पूर्ण पराभव व त्यामुळें विजापूर, गोवळकोंडा, आणि दिल्ली येथील शूर वीरांची उडालेली तिरपीट. ४४

शिवाजीच्या दर्पानें माळवा, उज्जैन, भेलशांपासून थेट शीराजपर्यंत पळापळी सुरू झाली. गोंडवण, तेलंगण, कर्नाटक, फिरंगाण या देशांतील लोकांचींच नव्हे तर, रोहिल्यांच्या मुलुखांतील रोहिल्यांचींही मनें भयानें कंपायमान झालीं आहेत. विजापूर, आग्रा, गोवळकोंडा येथील किल्ल्यांचे दरवाजे कधीं कधीं उघडतात, एरवीं बंद आहेत. ४५

सर्व मार्‍यांच्या जागा घेऊन शिवाजीनें बादशाही भस्मसात् केली. शिवाजी समोर मोठमोठ्या शूरांची हिम्मत खचली. ४६

हिन्दूंची राज्यमर्यादा वाढं लागल्यामुळें दाढी राखणार्‍यांचीं हृदयें मत्सरानें जळूं लागलीं, तुर्कांचा गव नाहींसा झाला, व हिन्दू जनतेची पीडा दूर झाली. ४७

श्रुति, स्मृति, हिन्दूंचें धर्माचिन्ह तिलक, यज्ञोपवीत, शेंडी, गळ्यांतील माळा, यांचें तसेंच देवळांतील दवांचें व घरांतील कुळधर्म कुळाचारांचे तरवारीच्या जोरावर शिवाजीनें संरक्षण केलें. ( ४९, ५१ ).

अधमांचें निर्दालन करून सूर्य धर्मपथावरून चालविला; त्यामुळें परमात्मा भगवान् श्रीकृष्णाची प्रतिज्ञाच लोकांस शिवाजीनें खरी करून दाखविली. तसेंच संसारी लोकांचा व्यवहार, शांतता प्रस्थापित झाल्यामुळें सुरळीतपणें चालूं झाला, त्याकरितां संसारी लोक, सातही पर्वत, चारी दिशा, पृथ्वीस धारण करणारे शेष, कूर्म, वराह तसेंच प्रकाशणारा सूर्य, रोज सकाळीं अगोदर शिवरायाच्या उभय बाहूंचें क्षेम चिंतितात, व त्यांच्या बल वृद्धीस्तव आशीर्वाद देतात. ( ५२ )

शिवा—बावनींतील मूळ छंदांचा महाराष्ट्रीय वाचकांस साक्षात् आस्वाद घेत यावा म्हणून या खालीं भाषासरणि विशेषाची कांहीं माहिती देत आहें.

हिन्दी भाषा ही देखील हिन्दुस्थानांतील इतर प्रचलित भाषा, मराठी, गुजराथी, बंगाली, पंजाबी इत्यादिकांप्रमाणें संस्कृतापासून झालेली आहे, व तिच्यांत संस्कृत शब्दांचें मिश्रण इतर भाषांपेक्षाही अधिक असावें असें मला वाटतें. हिन्दी कवींनी संस्कृत शब्द बेमालूम रीतीनें विकृत करून आपल्या काव्यांतून योजले

आहेत, त्यामुळें परप्रान्तीय लोकांना हे शब्द मूळ संस्कृतचेच आहेत असें समजण्यास मोठी मारामार पडते. हिन्दी कवींनीं संस्कृतांतील जोडाक्षरांनीं युक्त व उच्चारास कठिण अशा शब्दांतील वर्णांत फेरबदल करून ते शब्द जवळ जवळ हिन्दीच बनवून टाकले आहेत; यास आमचे भूषण कवि अपवाद नाहींत, त्यांनीं देखील आपल्या काव्यांतून अशा शब्दांचा उपयोग केला आहे. हिन्दी काव्यांतून मूळ संस्कृत शब्दांतील वर्णांत खालील प्रकारांनीं फेरफार केलेला आढळून येतो. *

१ मूळ संस्कृत शब्द जोडाक्षराचा असेल तर हिन्दींत जोडाक्षर गाळून सरळ करणें; जसें:-सप्त=सपत, धर्म=धरम, कूर्म=कूरम, कीर्ति=कीरति, श्रुति=सुरति.

२ उच्चारास जड व कानास कठोर लागणारीं व्यंजनें मृदु उच्चाराचीं करणें; ष, श च्या जागीं स; किंवा ख, क्ष ऐवजीं ख; किंवा च्छ, ण चे जागीं न. जसें:— शहर=सहर, दिनेश=दिनेस, शक्र=सक्र, शरमाती=सरमाती, शंका=संका, मिष= मिस, रोष=रोस, दक्षिण—दच्छिन, किंवा दख्खन, फणा—फन, भूषण=भूखन.

३ 'र' व 'ड' चा उच्चार गाळणें व त्या ऐवजीं पुढील व्यंजनाचें द्वित्व-करणें. जसें:=दुर्ग=दुग्ग, उग्र=उग्ग, खड्ग=खग्ग, गर्भ=गब्भ.

४ 'ड' च्या ऐवजीं 'र' चा उपयोग करणें. जसें:-उघडत=उघरत, दौड=दौर, पहाड=पहार, फडकना=फरकना.

५ संस्कृतच्या नियमाप्रमाणें 'ज—य';-'व—ब' यांचा तसेंच 'ल' व 'र' चा अभेद समजणें. मर्यादा=मरजादा, याचन=जाचन. बारे=वारे, विदरी=बिदरी, विदारे=बिदारे. वारे=वाले, बिदरी=विदली. पनारे=पनाले (पन्हाळे)×

६ जोडाक्षरांत अगोदर स असेल तर उच्चाराचे सोईसाठीं जोडाक्षर गाळून मागें अ लावणें. जसें:—स्वारी=सवारी=असवारी; स्मृति=अस्मृति.

७ विशेषण, क्रियाविशेषणें कवितेंतून बहुधा संक्षिप्तच दिसून येतात:—अस, जस, कस, तस, इत, उत, कत, एते, केते; असा संक्षेप क्वचित् नामामध्येंही दिसून येतो:—बाता=बत.

८ 'थ' ऐवजीं 'ह' वापरणें=नाथ=नाह ( वरील शब्दांतील अक्षरांच्या फेरफारांशिवाय ) व्याकरणाचे कांहीं विशेष खालीं देत आहें, त्यावरून हिन्दी शब्दांची मोड लक्षांत येण्यास कांहीं अंशीं मदत होईल.

---

* फेरफाराचीं दिलेलीं रूपें शिवा—बावनींतीलच आहेत. × हिन्दींत ळ हें व्यंजन नाहीं.

१ नामाचें, विशेषणाचें अनेकवचन ' न ' नें करणें. जसें:—पहार=पहारन, दौर=दौरन, राजा=राजन, करि=करिन, प्रानी=प्रानीन, नगारा=नगारन, पठान=पठानन, गढ़=गढ़न, और=औरन, एते=एतेन. मूळ धातूस 'न' लावला असतां त्याचा अर्थ चतुर्थ्यर्थक धातुसाधिताप्रमाणें होतो. जसें:—जंगजीवन=युद्ध जिंकण्याकरितां.

२ कवितेंत पूर्व कालवाचक धातुसाधितें मूळ धातूस ऱ्हस्व इ प्रत्यय लागून होतात. व कांहीं ' आय ' प्रत्यय लागूनही होतात. गंजाय, चढाय, दवाय, चबाय इत्यादि. साजि, चढि, उगलि, चिकारि, उछलि, दाबि, तोरि, निचोरि, झारि, काटि.

३ मूळ धातूस दीर्घ ई लाविल्यानें कवितेंतील भूतकाळ होतो. साजी, चढी, राखी, उगली, झारी, काटी.

४ मराठींत क्रियापदाची ओळख जशीं ' णें ' प्रत्ययानें होते, तशी हिन्दीच्या गद्यांत ' ना ' प्रत्ययानें व कवितेंत ' इबे ' प्रत्ययानें होते:–कर+णें=करणें, कर+ना करना, कर+इबे–करिबे, मारिबे, देइबे, लेइबे इत्यादि—

५ ' को ' प्रत्ययानें कवितेंत षष्ठी विभक्तीचा व गद्यांत द्वितीया किंवा चतुर्थीचा, बोध होतो. कवितेंत द्वितिया दाखविण्याकरितां ' को ' प्रत्ययाचा उपयोग झाल्यास त्यावर अनुस्वार येतो. औरन कों=इतरांना.

शिवा–बावनीच्या भाषान्तरांत अगोदर मूळ छंद, त्याखालीं कठिण शब्दांचा अर्थ व त्याखालीं छंदाचें सरळ भाषान्तर दिलें आहे. मूळांतील कठिणता दूर करण्याचा शक्य तो प्रयत्न करण्यांत आला आहे. वाचकांनीं भाषांतराच्या गुणदोषांकडे न पाहतां मुळांतील आस्वाद घेण्यांकडेसच लक्ष ठेवावें. ह्या भाषान्तरांत छंदांचा जो अनुक्रम दिला आहे तो ' हिन्दीसाहित्य–सम्मेलन प्रयाग ' तर्फे प्रकाशित झालेल्या प्रतीबरहुकूम आहे. सदरील सटीक प्रतीचा तसेंच काशी–नागरी प्रचारिणी–सभेमार्फत प्रसिद्ध झालेल्या ' भूषण–ग्रंथावलीं'तील भूमिकेचा व कांहीं टीपांचा भाषान्तराचे कामीं मला उपयोग झाला. याकरितां उक्त ग्रंथकारांचा भाषान्तर कता आभारी आहे.

---

# शिवा-बावनी.

**साजि चतुरंग वीर रंग में तुरंग चढि, सरजा सिवाजी जंग जीतन चलत है। भूषन भनत नाद बिहद नगारन के, नदी नद मद गैबरन के रलत है॥ ऐल फैल खैल भैल खलक में गैल, गैल, गजन की ठैल पैल सैल उसलत है। तारा सो तरनि धूरि धारा में लगत जिमि थारा पर पारा पारावार यों हलत है॥ १॥**

साजि=सजवून, तयार करून; जीतन=जिंकण्याकरितां; जंग=युद्ध; भनत=म्हणतो; बिहद=अमर्याद; नगारन=नगाऱ्याचें अनेक वचन; गैबरन=मत्त, ( गब्बरन–पाठ भेद ); रलत=मिसळत; ऐल=कोल्हाळ, गोंगाट; फैल=फैलावणें; खैलभैल=खळबळ; खलक=( फारसी शब्द ) दुनिया, जग; गैल गैल=गल्लोगल्लीं; ठैल पैल=ठोंसणें, धक्का देणें; सो=प्रमाणें; धूरि=धूळ; थारा=थाळी; पारावार=समुद्र; सरजा=सिंह, शूर.

शूर वीर शिवाजी सैन्यासह युद्धास निघाल्या वेळचा देखावा कवीनें वर्णिला आहे.

शूर शिवाजी चतुरंग सैन्य ( हत्ती, घोडे, रथ, पायदळ ) तयार करून वीरोचित उत्साहानें घोड्यावर बसून युद्ध जिंकण्याकरितां निघाले आहेत, नगाऱ्यांचा भयंकर ध्वनि होऊं लागला आहे, उन्मत्त हत्तींच्या गंडस्थलांतून निघणारा मद नदीनाल्यांच्या प्रवाहांत मिसळत आहे, सैन्याच्या खळबळीनें देशभर गल्लोगल्लींतून कोल्हाळ माजून राहिला आहे, हत्तींच्या एकमेकांवर रेलण्यानें डोंगर उलथून पडतात कीं काय असें वाटतें; सैन्याच्या खळबळीनें, व हत्तींच्या परस्पर रेटारेटीनें उडत असलेल्या धुळीनें आकाश इतकें भरून गेलें आहे कीं, एवढा मोठा प्रचंड सूर्य पण एकाद्या लहानशा ताऱ्याप्रमाणें दिसूं लागला आहे. समुद्र तर ताटांत धावणाऱ्या पाऱ्याप्रमाणें सारखा आन्दोलन पावत आहे. ( १ )

**बाने फहराने घहराने घंठा गजन के, नाहीं ठहराने राव राने देस देस के। नग भहराने ग्राम नगर पराने, सुनि बाजत निसाने सिव-**

**राज जू नरेस के। हाथिन के हौदा उकसाने, कुंभ कुंजर के भौन को भजाने अलि, छूटे लट केस के। दल के दरारन ते कमठ करारे फूटे, केरा के से पात बिहराने फन सेस के ॥ २ ॥**

बाने=झेंडे, निशाणें; फहराना=फडकणें; घहराना=गर्जणें; गजन=गजाचें अनेक वचन; ठहराना=थाबणें, टिकणें; भहराना=डळमळणें, कोसळून पडणें; पराना=पळणें; निसाने=डंके, नगारे; जू=जी (बहुमानवाचक); नरेस=नरेश; उकसाने=सैल झाले; भौन=भवन, घर; भजाने=पळाले; लट=केशपाश, वेणी; दरारन=दराऱ्यानें; कमठ=कांसव; करारे=कठिण; केरा=केळीं; से=प्रमाणें; पात=पान; बिहराने=फाटले; फन=फणा; सेस=शेष, नाग.

शिवराजाचें सैन्य युद्धास निघाल्यानंतर ठिकठिकाणच्या लोकांची कशी त्रेधा उडत होती हें ह्या छंदांत दाखविलें आहे.

( सर्व सैन्याच्या अग्रभागीं ) फडकत असलेले ( भगवे ) झेंडे पाहून आणि हत्तींच्या घंटांचा घनघोर ध्वनि ऐकून देशोदेशचे लहान मोठे राजे, महाराजे, शिवाजीच्या सैन्यासमोर उभे राहीनात. शिवराजांच्या डंक्यांचा ( दणदणाट ) प्रचण्ड शब्द ऐकून डोंगर कोसळून पडूं लागले; व गांवेंच्या गांवें व शहरेंच्या शहरें रहिवाशी पळून गेल्यामुळें ओस पडूं लागलीं. ( शत्रूंच्या ) हत्तींवरील हौदे सैल झाले, तसेंच हत्तींच्या गंडस्थळांवर उडत असलेले भुंगे पार आपापल्या घरीं पळून गेले. ( शत्रू स्त्रियांचे ) केशपाश विस्कळित झाले. शिवाजीच्या सैन्याच्या दराऱ्यानें पृथ्वी धारण करणाऱ्या कूर्माची कठिण अशी पाठ देखील फुटून गेली, आणि शेषाच्या फणा केळीच्या पानाप्रमाणें फटाफट फाटून गेल्या. ( २ )

**प्रेतिनी पिसाचरु निसाचर निसा चरिहू मिलि मिलि, आपुसमें गावत बधाई है। भैरों भूत प्रेत भूरि भूधर भयंकर से जुत्थ जुत्थ जोगिनी जमाति जुरि आई है। किलकि किलकि कै कुतूहल करति काली, डिम डिम डमरू दिगंबर बजाई है। सिवा पूछैं सिव सों 'समाजु आजु कहाँ चली,' काहू पै सिवा नरेस भ्रकुटी चढाई है ॥३॥**

प्रेतिनि=प्रेत ( स्त्रीलिंग; ) पिसाचरु=पिशाचें; निसाचर—रि=राक्षस—सी; हू=शीं; मिलि मिलि=भेटून; आपुस में=आपापसांत; बधाई=आनंदोत्सव; भैरों=

भैरव ( अने. ); भूरि=पुष्कळ; भूधर=पर्वत; जुत्थ=झुंडी; जमाती=टोळी; जुरिआई=मिळून आल्या; किलकि=ध्वनिविशेष; कै=करून; समाजु=मंडळी; काहू पै=कोणावर.

( वरील छन्दांत भूषण कवीनें एक काल्पनिक शिव—पार्वती संवाद वर्णन केला आहे. ) प्रेतें, पिशाच्चें, राक्षस राक्षसी, जमून आपापसांत आनंदानें गात आहेत. पर्वताप्रमाणें धिप्पाड शरीरें धारण करणारे भैरव, तसेंच भुतें, प्रेतें यांच्या झुंडींच्या झुंडी जमूं लागल्या; काली देवता किलकिल शब्द करून जमलेल्या समाजाचें कौतुक करीत आहे, आणि महादेव आनंदानें डमरू वाजवीत आहेत; हा शिवगणांचा आनंद पाहून पार्वतीनें महादेवास विचारिलें ‘ महाराज ! आज आपली मंडळी कुठें चालली आहे ? ’ महादेवः—शिवराज कोणा शत्रूवर क्रुद्ध झाले आहेत. ( ३ )

(शिवाजीच्या सैन्याचा धाक दिल्लीवासियांच्या अंतःकरणांत इतका जबरदस्त बसला होता कीं, पावसाळ्यांत आकाशांत संचार करणाऱ्या मेघांकडे पाहून त्यांस शिवाजीच्या सैन्याचा भास होत असे; कवीनें हेंच वर्णन खालील छंदांत केलें आहे.)

**बद्दल न होहिं दल दच्छिन घमंड माहिं, घटाजु न होहिं दल सिवाजी हंकारी के । दामिनी दमंक नाहिं खुले खग्ग बीरन के, बीर सिर छाप लखु तीजा असवारी के ॥ देखि देखि मुगलों की हर मैं भवन त्यागैं, उझ कि उझ कि उठैं बहत बयारी के । दिल्ली मति भूली कहै बात घन घोर घोर बाजत नगारे ये सितारे गढधारी के ॥ ४ ॥**

बद्दल=वादळ, मेघ; होहिं=होत; दल=सैन्य; दच्छिन=दक्षिण; घमंड=घमेंड, अभिमान; माहिं=मध्यें; घटा=ढग; जु=जी; हंकारी=अहंकारी, अभिमानी; दामिनी--दमंक=विजेची चमक; खग्ग=खड्ग; बीरन=वीर (अनेकवचन) लखु=पाहून; तीजा=हरताळ तजि; असवारी=सवारी, स्वारी; हरेमें=( आरबी ) स्त्रिया; उझकि उझकि=दचकून; बहत=वाहत; बयारी=वायु, हवा; मतिभूलि=बुद्धिभ्रष्ट; गढधारी=किल्ल्याचा अधिपति; सितारा=सातारा.

भीतीनें भ्रमिष्ट झालेले दिल्लीवासी ( पावसाळ्यांत ) आकाशाकडे पाहून म्हणतात, हे मेघ नव्हत, किंबहुना ( आपल्या शूरत्वाची ) घमेंड बाळगणारें हें

दक्षिणी सैन्य आहे. हे ढग नव्हत किन्तु अभिमानी शिवाजीचें हें दल आहे. चमकणाऱ्या विजेस पाहून म्हणतात हें विजेचें चमकणें नव्हे किंबहुना वीरांच्या हातांतील नंग्या तरवारी चकाकत आहेत; ( भाद्रपद शुद्ध तृतीयेच्या ) तीजेचा चंद्र पाहून म्हणतात हा चंद्र नव्हे तर शिवाजी वीराचा शिरपेंच चमकत आहे. हा देखावा पाहून मोंगल स्त्रिया आपापलीं घरें दारें सोडून पळूं लागल्या तर कित्येक, ( पावसापूर्वीं ) वाहणाऱ्या वाऱ्यास भिऊन दचकूं लागल्या आहेत. मेघांचा गडगडाट ऐकून त्या म्हणतात कीं, हा मेघांचा गडगडाट नाहीं किन्तु सातारा गडाधिपतींच्या डंक्यांचा हा दणदणाट आहे. ( ४ )

**बाजि गजराज सिवराज सैन साजत ही दिल्ली दिलगीर दसा दीरघ दुखन की। तनियाँ न तिलक सुथनियाँ पगनियाँ न, घामें घुमरातीं छोडि सेजियाँ सुखन की॥ भूषन भनत पति बाहं बहियाँ न तेऊ छहियाँ छबीली ताकि रहियाँ रुखन की। बालियाँ बिथुर जिमि आलियाँ नलिन पर, लालियाँ मलिन मुगलानियाँ मुखन की॥ ५॥**

वाजी=घोडे; सैन=सैन्य; साजतही=सजवितांच; दिलगीर=उदास; दसा=दशा; दीरघ=दीर्घ; दुखन=दुःखें; तनियाँ=अंगांत; तिलक=लांब सदरा; सुथनियाँ=विजारी; पगनियाँ=जोडे; घामें=उन्हांत; घुमरातीं=पळतात; सेजियाँ=शेज ( अनेक ); सुखन=सुख (अनेक); बाहं=भुजा; बहियाँ=वाहिलेल्या, विलग झालेल्या; तेऊ=त्या देखील; छहियाँ=छाया; छबीली=सुंदरी; ताकि रहियाँ=शोधूं लागल्या; रुखन=वृक्ष ( अनेक ); बालियाँ=वेण्या; बिथुर=विस्कळित; जिमि=ज्याप्रमाणें; आलियाँ=भ्रमरी ( अनेक ); नलिन=कमल; लालियाँ=सौन्दर्य; मुगलानियाँ=मोंगलस्त्रिया; मुखन=मुखाचें ( अनेक ).

शिवराजानें हत्ती घोडे सजवून दिल्लीवर स्वारी करण्याकरितां सैन्याची तयारी करतांच दिल्लीवासी भावी आपत्तींच्या भयानें दिलगीर झाले. मोंगल स्त्रियांचे हाल तर विचारूंच नका, त्यांना आपल्या अंगांतील चोळ्यांचें व सदऱ्यांचें तसेंच पायांतील विजारींचें व जोड्यांचें भान राहिलें नाहीं. ह्या भयानें ( शिवाजीच्या स्वारीच्या ) त्या आपल्या सुखशय्या सोडून उन्हांतान्हांतून भटकूं लागल्या.

पतींच्या बाहुपाशांतून कधीं अलग न होणाऱ्या त्या वृक्षांच्या छाया शोधूं लागल्या; त्यांच्या वेण्या सुटल्यामुळें मुखावरून जे केश रुळत होते ते कमलिनीवर फिरणाऱ्या भुंग्यांप्रमाणें शोभत होते व त्यांचीं सुंदर मुखें भीतीनें अगदीं फिक्कट झालीं होतीं. ॥ ५ ॥

**कत्ता की कराकन चकत्ता को कटक काटि, कीन्ही सिवराज बीर अकह कहानियाँ । भूषन भनत तिहुं लोक में तिहारी धाक, दिल्ली औ बिलाइति सकल बिल लानियाँ ॥ आगरे अगारन ह्वै फाँदतीं कगारन छ्वै, बाँधतीं न बारन मुखन कुम्हला नियाँ । कीबी कहैं कहा औ गरीबी गहैं भागी जायँ, बीबी गहे सूथनी सु नीबी गहे रानियाँ ॥ ६ ॥**

कत्ता=एक हत्त्यार; कराकन=जखमा, घाव; चकत्ता=चगताई वंशस्थ अर्थात् औरंगजेब; को=चा, ची, चें; काटि=कापून, कीन्ही=केल्या; अकह=अवर्णनीय; कहानियाँ=कहाण्या; भनत=म्हणतो; तिहुं=तीन्ही; तिहारी=तुझी; औ=आणि; बिलाइति=हिन्दुस्थानाबाहेरील मुसलमानी संस्थानें; बिललानियाँ=विलाप करित आहेत; अगारन=घरें; कगारन=कडे, कांठ; बारन=केश; कुम्हलानियाँ=कोमेजल्या आहेत; कीबी=करितील; कहा=काय ?; गेहैं=घेऊन; गरिबी गहैं=दीन होऊन; बीबी=बेगम; सूथनी=विजार; सु=आणि; नीबी=निरी ( उत्तरीय वस्त्राची ).

हे वीर शिवाजी ! आपण आपल्या कत्त्यानें (सुऱ्या सारख्या हत्यारानें) औरंगजेबाच्य सैन्याचे तुकडे तुकडे करून अवर्णनीय पराक्रम केले आहेत; भूषण म्हणतो, त्यामुळें त्रिलोकांत तुमचा दरारा बसला आहे, दिल्ली आणि अन्य यावनी-राज्यें सारखीं विलाप करीत आहेत; बेगमा आणि राण्या केश न बांधतां म्लान वदनानें विजारी व उत्तरीय वस्त्रांच्या निऱ्या सांवरून आगऱ्याच्या महालाच्या सौधावरून उड्या मारून पळत असतां म्हणत आहेत कीं, ‘ आतां आम्हीं काय करावें ? ’ ( ६ )

**ऊँचे घोर मंदरके अंदर रहन वारी ऊंचे घोर मंदरके अंदर रहाती हैं । कंद मूल भोग करैं कंद मूल भोग करैं, तीन बेर खातीं ते वै**

**बीन बेर खाती हैं ॥ भूषन सिथिल अंग, भूखन सिथिल अंग, विजन डुलातीं ते वै विजन डुलाती हैं । भूषन भनत सिवराज बीर तेरे त्रास नगन जडातीं ते वै नगन जडाती हैं ॥ ७ ॥**

घोर=भव्य, भयंकर; मंदर=महाल, पर्वत; रहनवारी=राहणाऱ्या; रहाती हैं=राहतात; कंदमूल=मिष्टान्न, कंदमुळें; भोगकरैं=खातात; बेर=वेळ; बीन=वेंचून; बिना=वांचून; बेर=बोरें; भूषन=अलंकार; सिथिल=जड, ओझें, म्लान; भूखन=भुकेनें; विजन=पंखा, अरण्य; डुलातीं=झुलविणाऱ्या, फिरतात, भटकतात; नगन=अलंकार, नग्न, वस्त्रावांचून; जडातीं=रत्नजडित दागिने घालीत होत्या; जडाती हैं=थंडीनें कापतात.

या छंदांत कवीनें श्लेषालंकार उत्तम साधला आहे; प्रत्येक चरणांतील पहिल्या अर्धाचा अर्थ एक व दुसऱ्याचा अर्थ त्याहून भिन्न, शब्दयोजना मात्र दोन्ही अर्धांची अगदीं सारखी आहे. जसें:——मंदर=महाल, ( पक्षीं ) पर्वत.

भूषण म्हणतो,—हे वीर शिवाजी ! उंच आणि भव्य अशा राजमहालांतून राहणाऱ्या ( मोंगल स्त्रिया ) तुमच्या धाकानें आतां उंच व भयंकर अशा डोंगराच्या दऱ्या खोऱ्यांतून राहत आहेत. नित्य मिष्टान्नांचें भोजन करणाऱ्या आतां कंदमूलांवर गुजराण करीत आहेत. दिवसांतून तीन वेळ खाणाऱ्या आतां * तीनच बोरें खाऊन राहूं लागल्या आहेत. नाजुकपणामुळें अलंकारांनीं ज्यांचें अंग पूर्वी ( भारावत ) शिथिल होत असे, त्या आतां भुकेनें शिथिल ( क्लान्त ) होत आहेत; ज्यांच्यावर नेहमीं ( व्यजन ) पंखे झुलत असत, त्या आतां विजनांत ( अरण्यांत ) भटकत आहेत; ज्या पूर्वी रत्नजडित अलंकार परिधान करीत असत, त्या आतां वस्त्राभावीं थंडीनें काकडून जात आहेत. ( ७ )

**उतरि पलंगते न दियो है धरा पै पग, तेऊ सगबग निसिदिन चली जाती हैं । अति अकुलातीं मुरझातीं न छिपातीं गात, बातन सोहातीं बोले अति अनखाती हैं ॥ भूषन भनत सिंह साहिके सपूत सिवा, तेरी धाक सुने अरि नारी बिललाती हैं । कोऊ करैं घाती**

* ' बीन बेर खाती हैं ' असा पाठभेद आहे तेथें बोरें वेंचून खातात असा एक अर्थ होतो; किंवा मिळेल तेव्हां खातात, मग अवेळीं असलें तरी हरकत नाहीं.

**कोऊ रोतीं पीटि छाती, घरै तीन बेर खातीं ते वै तीन ( बीन ) बेर खातीं हैं. ॥ ८ ॥**

उतरि=उतरतात; पलंगते=पलंगावरून; पग=पाय; तेऊ=त्या देखील; सग-बग=लगबग, सवेग; अकुलातीं=व्याकुळ झाल्या आहेत; मुरझातीं कोमेजल्या आहेत; छिपातीं=लपवितात; गात=गात्र; सोहातीं—आवडत; अनखाती=रागावतात; विललाती हैं=विलाप करितात; घाती=घात; घरै=घरीं;

पलंगावरून जमिनीवर कधीं पाय न ठेवणाऱ्या त्या देखील रात्रंदिवस पळत सुटल्या आहेत. भयाकुल झाल्यामुळें त्यांचीं मुखें म्लान झालीं आहेत, त्यांना आपले अवयव झांकून घेण्याचें देखील भान राहिलें नाहीं. दुसऱ्यानें बोललेलें तर त्यांना अगदीं खपत नाहीं. कदाचित् कोणी बोलल्यास त्या लागलींच अतिशय क्रुद्ध होतात. भूषण म्हणतो, हे सिंह समान शूर शहाजी पुत्र शिवाजी ! तुमचा दरारा ऐकून शत्रूस्त्रिया विलाप करितात इतकेंच नव्हे, तर कोणी आत्मघात करीत आहेत. तर कोणी छाती पिटून रडत आहेत. घरीं तीन तीन वेळां खाणाऱ्या आतां तीन तीन बोरांवर राहूं लागल्या आहेत. ( ८ )

**अन्दर ते निकसी न मन्दर को देखो द्वार, विन रथ पथ ते उघारे पाँव जाती हैं । हवा हू न लगती ते हवा ते विहाल भईं, लाखन की भीरमें संभारती न छाती हैं । भूषन भनत सिवराज तेरी धाक सुनि, हयादारि चीर फारि मन झुंझलाती हैं । ऐसी परीं नरम हरम बाद साहन की; नास पाती खातीं ते बनास पाती खातीं हैं॥९॥**

निकसी=निघून; उघारे पाँव=अनवाणी; बिहाल=व्याकूळ; भईं=झाल्या; लाखन=लाखों; भीर=गर्दी; संभारतीं=संभाळतात; हयादारी=लाज; चीर=वस्त्र; फारि=फाडून; झुंझलाती हैं=रागावतात; परीं=पडल्या, झाल्या; हरम=स्त्रिया; नासपाती=सफरचंदाची एक जात; बनासपाती=वनस्पती.

भषण म्हणतो,—हे शिवराज ! ज्यांनीं कधीं आंतून बाहेर निघून आपल्या महालाचा दरवाजा पाहिला नव्हता त्या ( मोंगल स्त्रिया ) तुझ्या धाकानें आज रस्त्यांतून कसल्याही वाहनावांचून अनवाणी पायांनीं फिरत आहेत. ज्यांना आपल्या

महालांत वाऱ्याचा कधीं स्पर्श होत नसे, त्या वाऱ्यानें व्याकूळ होत आहेत; व त्यांना शेंकडों माणसांच्या गर्दींतून आपला उरोभाग सांभाळण्याचें देखील भान राहिलें नाहीं. लज्जावस्त्र फाडून ( लज्जा रहित होऊन ) मनांतल्या मनांत त्या चरफडत आहेत. बादशहाच्या बेगमा इतक्या दीन झाल्या आहेत कीं, रात्रंदिवस नाशपाती (सफरचंद) सारखे उत्तम मेवे खाणाऱ्या, वनस्पतींवर ( भाजीपाल्यावर ) उपजीविका करूं लागल्या आहेत. ( ९ )

**अतर गुलाब रस चोवा धन सार सब सहज सुवास की सुरति बिसराती हैं । पलभर पलंग ते भूमि न धरति पाँव, भूली खान पान फिरें बन बिललाती हैं । भूषन भनत सिवराज तेरी धाक सुनि, दारा हार बारन सम्हारैं अकुलाती हैं । ऐसी परीं नरम हरम बाद साहनकी नास पाती खातीं ते बनास पाती खातीं हैं ।। १० ।।**

अतर=अत्तर; चोवा=अर्गजा; घनसार=कापूर; सुरति=स्मरण; विसराती हैं= विसरतात; विललाती हैं=आक्रोश करितात; दारा=स्त्रिया; हार=माला; बार= केश; सम्हारैं=सांभाळतात;

भूषण म्हणतो,—हे शिवराज ! तुमच्या धाकानें बादशहाच्या बेगमा ज्यांना नित्य गुलाबी अत्तर, अर्गजाचा केशर कस्तुरी मिश्रित सुगंधित रस, कापूर आदि सुगंधी सामग्री सहजपणें लागत असे, त्या आतां सुगंधास पार विसरून गेल्या; पलंगावरून भूमीवर पळभर पाय न ठेवणाऱ्या खाणेंपिणें विसरून रानावनांतून भटकत फिरत आहेत; आपले हार व केश सांभाळण्याचें देखील त्यांस भान नाहीं; बादशहाच्या बेगमा इतक्या दीन झाल्या आहेत कीं, नाशपातीसारखे उत्तम उत्तम मेवे खाणाऱ्या त्या वनस्पती खाऊन दिवस कंठीत आहेत. ( १० )

**सोंधे को अधार किसमिस जिनको अहार, चार को सो अंक लंक चंद सरमाती हैं । ऐसी अरि नारी सिवराज वीर तेरे त्रास पायनमें छाले परे कन्द मूल खाती हैं । ग्रीषम तपनि ऐसी तपति न सुनी कान, कंज कैसी कली बिनु पानी मुरझाती हैं । तोरि तोरि आछेसे पिछौरा सों निचौरि मुख कहैं अब ( सब ) कहां पानी मुकतों में पाती हैं ।। ११ ।।**

सोंधा=सुगंध; किसमिस=बेदाणा; लंक=कंबर; सरमाती हैं=लाजवितात; पायन=पाय ( अनेक ); छाले=फोड; परे=पडले; तपनि=ऊन; कंज=कमल; कली=कळी; आछे=उत्तम; पिछौरा=चादर; निचोरी=पिळून; मुकतों में=मोत्यांत;

हे वीर शिवाजी ! ज्यांच्या प्राणाचा आधार सुगन्ध, ज्यांचा आहार किसमिस ( बेदाणा आदि उत्तम उत्तम मेवे ) होता, चार ( ४ ) च्या अंकांतील मध्यभागाप्रमाणें ज्यांची कंबर अतिशय बारीक, व ज्या आपल्या सौन्दर्यानें चंद्रास देखील लाजवीत होत्या, अशा त्या सुकुमार शत्रू-स्त्रिया तुमच्या भीतीनें पळत आहेत. पळतांना त्यांच्या नाजुक पायांस फोड येत आहेत. त्या कंदमुळांवर गुजराण करीत आहेत. कानांनीं कधीं ऐकिला नाहीं ( मग अनुभवणें तर दूरच ) अशा कडक उन्हाळ्यांत कमळांच्या कळ्या पाण्यावांचून जशा कोमेजतात तशा त्या सुकून गेल्या आहेत. अंगावरील मूल्यवान् चादरीस ( उत्तरीय वस्त्र ) लावलेल्या उत्तम व पाणीदार मोत्यांपैकीं कांहीं मोत्यें तोडून आपल्या तोंडांत पाणी निघेल ह्या आशेनें पिळत आहेत, परन्तु त्या ( पाणीदार ) मोत्यांत तहान शमविणारें पाणी निघत नाहींसें पाहून म्हणतात, ‘ ह्या मोत्यांत पाणी कुठें आहे ? ’ ( ११ )

**साहि सिरताज और सिपाहिन में पातसाह, अचल सु सिन्धु के से जिनके सुभाव हैं । भूषन भनत परी शस्त्र रन सेवा धाक काँपत रहत न गहत चित चाव हैं । अथह विमल जल कालिन्दी के तट केते परे युद्ध विपति के मारे उमराव हैं । नाव भरि बेगम उतारैं बाँदी डौंगा भरि, मक्का मिस साह उतरत दरियाव हैं ॥ १२ ॥**

साहि=बादशहा, राजा; सिरताज=शिरोमणी; पातसाह=बादशाह; चित चाव न गहत=मनाला उत्साह वाटत नाहीं; अथह=अगाध, खोल; विमल=निर्मल; केते=कित्येक; परे=पडले; बाँदी=दासी; डौंगा=लहान नाव; मिस=मिष, निमित्त; साह=बादशाह; दरियाव=समुद्र.

( वर छंद ३ ते ७ पावेतों शिवाजीच्या व त्याच्या सैन्याच्या धाकानें मोंगल स्त्रियांची जी दैना उडाली, तिचें वर्णन कवीनें केलें आहे; या छंदांत मोठमोठ्या शूरवीर बादशहांची व राजांची शिवाजीच्या दराऱ्यानें जी त्रेधा आणि तारंबळ उडाली आहे, तिचें मोठें मौजेचें वर्णन आहे. )

भूषण म्हणतो:—ज्यांचे स्वभाव पर्वताप्रमाणें निश्चल व समुद्राप्रमाणें गंभीर व जे सर्व राजांत श्रेष्ठ व शूरांत वरिष्ठ असे मोठे बादशहा देखील शिवाजीच्या धाकानें रणांत निरुत्साह व गलित-शस्त्र होऊन कांपत आहेत. कित्येक उमराव युद्धाच्या अनर्थास भिऊन यमुना नदीच्या किनाऱ्यानें दडून बसले आहेत. खुद्द बादशाह मक्केस जाण्याच्या मिषानें आपल्या बेगमांस नावेंतून व दासींस होड्यांतून समुद्र पार करीत आहे. ( १२ )

**किबले की ठौर बाप बादसाह साहजहाँ, ताको कैद कियो मानो मक्के आगि लाई है। बडो भाई दारा वाको पकरि कै कैद कियो मेहरहू नाहिं माँ को जायो सगो भाई है॥ बंधु तो मुराद बक्स बादि चूक करिबे को, बीच ले कुरान खुदा की कसम खाई है। भूषन सुकवि कहै सुनो नवरंगजेब, एते काम कीन्हे तऊ पात साही * ( छा ) पाई है॥ १३॥**

किब्ला=मुसलमानांचें तीर्थस्थान, पश्चिम दिशा, जिकडे तोंड करून नमाज पडतात ती; ठौर=ठिकाण, ठायीं; आगि लाई है=आग लावली; वाको=त्याला; मेहर=दया; हू=देखील, च; मां को जायो=मातेपासून जन्मलेला; सगो=सख्खा; बादि=व्यर्थ; करिबे की=करण्याची; खुदा=परमेश्वर; कसम=शपथ; नवरंगजेब=औरंगजेब, कवीनें विनोदानें दिलेलें नांव, नवरंगजेब म्हणजे नऊ-रंगांनीं शोभणारा, ज्याच्या अंगीं नानाप्रकारचे रंग भरले आहेत असा. एते=इतके, असे; कीन्हे=केले; तऊ=तेव्हांच; छाई है=व्यापली आहे;

भूषण म्हणतो:—औरंगजेब ! ऐका; तुम्ही आपल्या तीर्थासमान पूज्य अस-लेल्या बापास-शाहजहानास कैद केलें, हें तुमचें कृत्य परम पवित्र अशा मक्केस आग लावण्याइतकेंच अनुचित आहे. एकाच आईच्या पोटीं जन्मलेला, त्यांतन वडील बंधू जो दारा, त्यालाही पकडून कैदेंत घातलें, ( यावरून मला वाटतें ) तुमच्या अंतःकरणांत दयेचा लवलेश नाहीं. दुसरा भाऊ मुरादबक्ष याशीं कपटा-चरण न केल्याबद्दल कुराण घेऊन खुदाची ( ईश्वराची ) खोटीच शपथ घेतली. अशीं हीं कृत्यें केलीं म्हणून तर तुम्हांला बादशाही (राज्य) मिळाली आहे. (१३).

* पाठभेद छाई है,

हात तसबीह लिये प्रात उठै बन्दगी को, आपहीं कपटरूप कपट सु जप के। आगरे में जाय दारा चौकमें चुनाय लीन्हों, छत्रहू छिनायो मानो मरे बूढे बापके ॥ कीन्हों है सगोत घात सो मैं नाहिं कहौं फेरि पील पै तो रायो चार चुगुल के गप के। भूषन भनत छर छन्दी मतिमन्द महा, सौ सौ चूहे खाय के बिलारी बैठी तप के ॥ १४ ॥

तसबीह=स्मरणी; बंदगी=प्रार्थना; चुनाय लीन्हो=चिणून टाकलें; छिनायो=हिसकावलें; मानो=जणों; बूढे=वृद्ध; सगोत=गोत्रज; पील=हत्ती; तोरायो=तुडविलें; चार=दूत; चुगुल=चहाडी; गप=गप्पा; छर छन्दी=कपटी; सौ सौ=शंभर; चूहे=उंदीर; बिलारी=मांजरी.

भूषण म्हणतो:—हे औरंगजेब ! तुम्हीं रोज सकाळींच उठून हातांत स्मरणी घेऊन ईशप्रार्थना करितां पण हें सर्व ढोंग आहे. तुम्ही प्रत्यक्ष कपटरूप आहां; कारण आगऱ्यास जाऊन आपल्या सख्ख्या भावास—दारास—चौकांत जिवंत चिणलें, जिवंत व वृद्ध बापास मृत समजून त्याचें राजछत्र हिसकावून घेतलें; ( व स्वतः राज्य करूं लागलां. ) मी आतां अधिक सांगत नाहीं. आपल्याच गोत्रजांना चहाडखोर दूतांच्या नुसत्या चहाड्यावरून हत्तीच्या पायांखालीं तुडवून मारविलें. तुम्ही मोठे धूर्त आहां; धर्मशील आहों असें लोकांस दाखवितां, पण तुमचें हें कपट ( ढोंग ) शेंकडों उंदीर खाऊन तपश्चर्या करणाऱ्या मांजरीप्रमाणें आहे. ( १४ ).

( वरील दोन छंदांत कवीनें औरंगजेबाचा ढोंगी स्वभाव व त्याचीं भयंकर कृत्यें यांचें वर्णन इतिहासानुरूप केलें आहे. भूषण कवींनीं उक्त छंद औरंगजेबास अभय घेऊन समक्ष म्हणून दाखविले अशी आख्यायिका आहे. )

कैयक हजार जहाँ गुर्ज बरदार ठाढे, करि कै हुस्यार नीति पकरि समाज की। राजा जसवंत को बुलाय कै तिखट राख्यो, तेऊ लखैं नीरे जिन्हें लाज स्वामि-काज की ॥ भूषन तबहूँ ठठकत ही गुसुलखाने, सिंहलौं झपट गुनिसाह महाराज की । हटकि हथ्यार फड बाँधि उमरावन की किन्ही तब नौरंग ने भेंट सिवराज की ॥ १५ ॥

कैयक=कित्येक; जहाँ=जेथें; गुर्ज बरदार=गदाधारी; ठाढे=उभे; तेऊ=त्यानासुद्धां; लखैं=पाहून; नीरे=केवळ; तब हूं=तरी देखील; ठठकत=भीत भीत; गुसुलखाने=स्नानागारांत; लौं=प्रमाणें, सारखें; हटकि=रोखून; फड=रांग, ओळ.

( छंद नं. १५–१६; औरंगजेबानें शिवाजीस दिल्लीला भेटीकरितां बोलावलेल्या प्रसंगास अनुलक्षून आहेत. औरंगजेबानें शिवाजीची भेट किती कडेकोट बंदोबस्त ठेऊन भीत भीत घेतली आहे हें ह्या छंदांत दिसून येईल. ही भेट स्नानागारांत झाली, असें भूषण म्हणतात पण इतिहासांत असा उल्लेख नाहीं. )

शिवाजीस भेटीला बोलाविल्यावेळीं औरंगजेबानें दरबार भरविण्याच्या नियमाप्रमाणें कित्येक हजार गदाधारी मोठ्या सावधगिरीनें उभे केले होते. राजे यशवंतसिंग व त्यांच्याच सारखी आणखी कांहीं स्वामिभक्त मंडळी बोलावून जवळ बसविली. इतकें करून ही औरंगजेब भीतच होता; शिवाजी सिंहासारखी एकदम झडप घालील कीं काय या भीतीनें उमरावांची रांग उभी करून, हत्यार बाजूस ठेवावयास लावून, स्नानागारांत औरंगजेबानें शिवाजीची भेट घेतली. ( १५ )

**सबन के ऊपर ही ठाढो रहिबे के जोग, ताहि खरो कियो जाय जारिन के नियरे। जानि गैर मिसिल गुसैल गुस्सा धरि उर, कीन्हो न सलाम न बचन बोले सियरे॥ भूषन भनत महावीर बलकन लागो, सारी पातसाही के उडाय गये जियरे। तमक ते लाल मुख सिवा निरखि भये, स्याह मुख नौरंग सिपाह मुख पियरे॥ १६॥**

ठाढो रहिबे के जोग=उभे राहण्याच्या योग्य; जारिन=हजारी; नियरे=निकट, समीप; गैर मिसिल=अयोग्य; गुसैल=रागीट; गुस्सा=राग; सियरे=नम्र; बलकन लागो=संतापानें पुटपुटूं लागला; पातसाही=दरबारी लोक; जियरे=जीव; तमकते=रागानें; सिवाको=शिवाजीचें; निरखि=पाहून; भये=झाले; स्याह=काळें; सिपाह=शिपाई; पियरे=पिंवळें; नौरंग=औरंगजेब.

सर्वांच्यावर उभे राहण्याची ( सर्वांपेक्षां अधिक मान मिळण्याची ) ज्याची ( शिवाजीची ) योग्यता त्यास लहान लहान ( पंच हजारी ) सरदारांच्या रांगेंत

उभें केलें. अशा अयोग्य स्थानीं उभें केल्यामुळें शिवाजीस अतिशय राग आला. त्यावेळीं त्यानें बादशहास सलाम केला नाहीं, किंवा विनयाचें कांहीं भाषण केलें नाहीं. भूषण म्हणतो, महावीर शिवाजी संतप्त होऊन बडबडूं लागला तेव्हां दरबारांतील सर्व लोकांचे जीव उडून गेले.(भयानें स्तंभित झाले.) संतापानें लाल झालेलें शिवाजीचें मुख पाहून औरंगजेबाचें तोंड काळें ठिक्कर पडलें व शिपायांचीं तोंडें पिंवळीं झालीं.

**राना भौं चमेली और बेला सब राजा भये, ठौर ठौर रस लेत नित यह काज है। सिगरे अमीर आनि कुन्द होत घर घर, भ्रमत भ्रमर जैसे फूल की समाज है॥ भूषन भनत सिवराज बीर, तैंही देस देसनमें राखी सब दच्छिन की लाज है। त्यागे सदा षटपद–पद अनुमानि यह अलि नवरंगजेब चंपा सिवराज है॥१७॥**

भौ–भये=झाले; ठौर ठौर=ठिक ठिकाण; सिगरे=सर्व;

(छंद १७–१८ मध्यें कवीनें मोठ्या चतुराईनें हें दाखविलें आहे कीं, औरंगजेब उत्तर हिन्दुस्तानांतील सर्व राजांपासून करभार घेत असे; परन्तु दक्षिणेची लाज राखणाऱ्या शिवाजीकडून मात्र त्याला कांहीं घेतां येत नसे.) या छंदांत औरंगजेबास कवीनें भ्रमर कल्पिलें आहे, व राणे, राजे, सरदार यांस अनुक्रमें चमेली, बेला (मोगरा) व कुंदाच्या फुलाची उपमा दिली आहे; भ्रमर सर्व फुलांतून रसपान करितो; परंतु चाफ्याच्या फुलांस शिवत देखील नाहीं, त्याप्रमाणें औरंगजेब हा उत्तरेकडील सर्व राजांपासून खंडणी घेता, परंतु शिवाजीपासून घेण्याची मात्र त्याची प्राज्ञा नाहीं. (१७)

**कूरम कमल कमधुज है कदम फूल, गौर है गुलाब, राना केतकी विराज है। पांडुरी पँवार जूही सोहत हैं चन्दावत, सरस बुंदेला सो चमेली साजबाज है॥ भूषन भनत मुचकुन्द बड गूजर हैं, बघेले बसंत सब कुसुम समाज है। लेइ रस एतेन को बैठिन सकत अहै अलि नवरंगजेब चंपा सिवराज है॥ १८॥**

लेइ=घेऊन; एतेन=ह्या; जूही=जुई; साज बाज=सजावट; कूरम=कछवाहे नामक क्षत्रिय जात, जयपुराधिपति, कमलाप्रमाणें; कमधुज=कबन्धज

जोधपूर संस्थानिक, कदंबाच्या फुलाप्रमाणें; * गौर=एक क्षत्रिय जात, गुलाबाप्रमाणें; राणा=उदेपुराधिपति, केतकी; ×पँवार=पांडुरीचें फूल; चन्दावत=जुईप्रमाणें; बुंदेले=चमेलीप्रमाणें; +गूजर=मुचकुंद पुष्प; बघेले= रजपुतांची विशेष जात, सर्व साधारण वसंत कालीन फुलाप्रमाणें.

या छंदांत उत्तरेकडील संस्थानिकांची आडनांवें व त्या प्रत्येकास कवीनें त्यांच्या योग्यतेनुरूप एकेका फुलाची उपमा देऊन हें दाखविलें आहे कीं, या सर्वांपासून औरंगजेब करभार रूप रस ग्रहण करितो परंतु शिवाजीरूपी चंपक पुष्पावर मात्र तो मुळींच बसूं शकत नाहीं. ( १८ )

**देवल गिरावते फिरावते निसान अली ऐसे डूबे राव राने सबी गये लबकी । गौरा गनपति आप औरनकों देत ताप आपनी ही बार सब मारि गये दबकी ॥ पीरा पयगंबरा दिगंबरा दिखाई देत सिद्ध-की सिद्धाई गई रही बात रबकी । कासी हूकी कलाजाती मथुरा मसीत होती, सिवाजी न हो तो तो सुनति होत सबकी ॥ १९ ॥**

डूबे=लपून बसले; लबकी गये=निर्बल झाले; दबकी मारि गये=छपून बसले; रब=पालनकर्ता ईश्वर; सुनति=सुंता ( मुसलमानी दीक्षा ).

( छंद १९ ते २१ यांत मुसलमानांच्या हल्लयांनीं हिन्दूंची व त्यांच्या धर्माची उडालेली दैना; देवता व देवालयांचा झालेला विध्वंस, जबरदस्तीनें यावनी धर्माचा प्रसार करण्याची महत्त्वाकांक्षा इत्यादिकांचें कवीनें यथोचित व इसिहासप्रमाणित वर्णन करून अशा बिकट परिस्थितींत शिवाजीचा अवतार झाल्यानें हिन्दुधर्म कसा बचावला हें दाखविलें आहे. )

मुसमानांनीं देवस्थानें पाडलीं, व अलीचे झेंडे चहूंकडे मिरविले, तेव्हां रावराणे अगदीं निर्बल व निस्तेज झाले. ( रावराण्यांची कथा काय ?) गौरी, गणपति आदि देवता परपीडा करणाऱ्या खऱ्या; पण स्वतःवर पाळी येतांच छपून बसल्या. जिकडे तिकडे औलियांचें, पीरांचें व पैगंबराचें महात्म्य वाढलें. सिद्धांचें सिद्धपण नाहींसें झालें व 'रब'चीच चर्चा सुरू झाली; अशावेळीं शिवाजीचा अवतार झाला नसता, तर काशीची कळा गेली असती, मथुरेंत चहूंकडे मशिदी दिसत्या व सर्वांची ( हिन्दूंचीं ) सुंता झाली असती. ( १९ )

---

* महाराष्ट्रांतील गोरे नांवाचे मराठे हेच असावेत; × महाराष्ट्रांतील पवार; + गुर्जर.

**सांच को न मानै देवी देवता न जानै अरु ऐसी उर आनै मैं कहत बात जबकी। और पातसाहन के हुती चाह हिन्दुन की, अकबर साहजहाँ कहैं साखि तब की ॥ बब्बर के तब्बर हुमायूँ हद्द बांधि गये दोनो एक करीना कुरान वेद ढब की, कासी हू की कला जाती मथुरा मसीत होती, सिवाजी न हो तो तो सुनति होत सब की ॥ २० ॥**

सांच=सत्य; अरु=आणि; उर आनै=मनांत आणून; हुती=होती; चाह= आवड; साखि=साक्ष; बब्बर=बाबर; तब्बर=पुत्र; हद्द बांधिगये=मर्यादा ठेवली;

भूषण कवि म्हणतो—ज्यावेळीं अन्य मुसलमानी बादशाह राज्य करीत होते त्या वेळेंची हकीकत मी तुम्हांस सांगतों. तुम्ही लक्ष पूर्वक ऐका. त्या बादशहांना हिन्दूंविषयींचा आदर होता याची साक्ष प्रत्यक्ष अकबर आणि शहाजहान हे होत; यांच्या प्रमाणें बाबराचा मुलगा हुमायून यानें देखील हिन्दूंची धर्म-मर्यादा राखली. कुराण आणि वेद यांचीं भिन्न भिन्न असलेलीं तत्त्वें एक केलीं नाहींत. अर्थात् वेद मर्यादेचें उल्लंघन होईल असें कांहीं एक केलें नाहीं. पण हा औरंगजेब पहा, ह्याला सत्याची चाड नाहीं, देव-देवतांना जुमानीत नाहीं तो अशा वेळीं शिवाजीचा अवतार झाला नसता तर काशीची कळा गेली असती, मथुराभर मशिदी दिसल्या असत्या व सर्व हिन्दूंची सुंता झाला असती. ( २० )

**कुंभकन्न असुर औतारी अवरंगजेब कीन्ही कत्ल मथुरा दोहाई फेरि रब की। खोदि डारे देवी देव सहर महल्ला बांके, लाखन तुरुक कीन्हे छूटि गई तब की ॥ भूषन भनत भाग्यो कासीपति विश्वनाथ, और कौन गिनती में भूली गति भव की। चारो वर्ण धर्म छोडि कलमा निवाज पढि, सिवाजी न हो तो तो सुनति होत सब की ॥ २१ ॥**

कत्ल=कत्तल; दोहाई=द्वाही; फेरि=फिरविली; खोदिडारे=खोदून टाकले; सहर=शहर; महल्ला=गल्ली; बांके=सुशोभित; निवाज=निमाज;

भूषण म्हणतो—कुंभकण राक्षसाचा अवतार जो औरंगजेब त्यानें मथुरेची कत्तल करून सर्व शहरांत 'रब' ची द्वाही फिरविली. ( मुसलमानी चालविली. ) शहरांतील गल्लोगल्लींतून असलेल्या उत्तम उत्तम देव देवता खोदून काढल्या; लाखों हिन्दूंना मुसलमान केलें, इतकेंच काय, पण प्रत्यक्ष काशीपति विश्वनाथ भयभीत

होऊन पळाले. महादेवाची अशी त्रेधा उडाली तेथें इतरांची कथा काय ? अशा वेळीं जर शिवाजी नसता तर चारी वर्णांना आपापले धर्म सोडून नमाज पढावी लागली असती. ( २१ )

**दावा पातसाहन सों कीन्हो सिवराज बीर, जेर कीन्हो देस हद्द बांध्यो दरबारे से। हठी मरहठी तामें राख्यौ न मवास कोऊ, छीने हथियार डोलैं बन बनजारे से॥ आमिष अहारी मांसाहारी दैदै तारी नाचैं, खांड़े तोड़े किरचैं उड़ाये सब तारे से। पील सम डील जहां गिरि से गिरन लागे मुंड मतवारे गिरैं झुंड मतवारे से॥ २२॥**

दावा=स्पर्धा; जेर कीन्हो=जेरीस आणिलें; छीने=हिसकावलें; डौलें=फिरतात; बनजारा=वनचर; मवास=किल्ला; खांडे=तुकडे तुकडे केले; तेडे=तोड्याच्या बंदुका; किरचैं=शस्त्र विशेष; पील=हत्ती; डील=शरीर; गिरन लागे=पडूं लागले; मुंड=मुंडकीं; मतवारे=उन्मत्त, यावनी मतप्रचारक; झुंड=झुंडी.

आता वीरश्रेष्ठ शिवाजीनें बादशहाशीं स्वतः बादशहा असल्याविषयीं स्पर्धा चालविली; कारण त्यानें जवळ जवळ सर्व देश पराभूत केला होता, व दिल्ली-दरबाराशीं आपली राज्य मर्यादा स्वतंत्र ठरवून टाकली होती. हट्टी मराठ्यांनीं सर्व किल्लेदारांना निःशस्त्र करून टाकलें व आपण जंगली लोकांप्रमाणें टेहळणी करीत रानावनांतून भटकूं लागले. हत्तीसारखीं धिप्पाड शरीरें धारण करणाऱ्या मुसलमानी मत प्रचारकांचीं मुंडकीं पर्वताचीं शिखरें कोसळावीं त्याप्रमाणें धडाधड उडूं लागलीं. तेव्हां मांसाहारी प्राणी भक्ष्य मिळालें म्हणून टाळ्या वाजवून नाचूं लागले. ( २२ )

**छूटत कमान और तीर गोली बानन के होत कठिनाई मुरचानहू की ओट में। ताही समय सिवराज हांक मारि हल्ला कियो, दावा बांधि परा हल्ला वीर वर जोट में॥ भूषन भनत तेरी हिम्मती कहा लौ कहों, किम्मति यहां लगि है जा की भट झोट में। ताव दै दै मूंछन कँगूरन पै पांव दै दै अरिमुख घाव दै दै कूदि परे कोट में ॥२३॥**

कमान=धनुष्य; मुरचानहू=मोर्चे; ओट=आड; ताही=त्या; जोट=मध्य, जोड; झोट=समुदाय; मूंछन=मिशा; कँगूरन=उंचावरून, शिखरावरून; कूदि-परे=उडी घालतात.

जेव्हां शत्रूच्या बाजूनें बाणांचा व गोळ्यांचा सारखा वर्षाव सुरू झाला व मोर्चांच्या आड उभें राहून सुद्धां जीव वाचविणें कठिण झालें होतें, अशा वेळीं शिवरायांनीं ललकारून शत्रूवर हल्ला केला; तेव्हां उभय पक्षाकडील वीरांत चकमक उडाली. कविभूषण म्हणतो, हे शिवराज, मी तुमच्या साहसाचें वर्णन कोठवर करूं ? आपल्या शूरत्वाची ख्याति शूरवीर मंडळींत इतकी पसरली आहे कीं, युद्ध-क्षेत्रांत आपणांस नुसतें पाहून मराठे गडी मिशांवर ताव देत देत शत्रूवर प्रहार करीत उंचीवरून किल्ल्यांत उड्या घालतात. ( २३ )

**उतै पात साहजू के गजन के ठट्ट छूटे, उमड़ि घुमड़ि मतवारे घनकारे हैं । इतै सिवराज जूके छूटे सिंहराज और बिदारे कुंभ करिन के चिक्करत भारे हैं ।। फौजें सेख सैयद मुगल औ पठानन की मिली इखलास खांहू मीरन सँभारै हैं । हद्द हिन्दुवान की बिहद्द तरवारि राखी, कैयो बार दिल्ली के गुमान झारि डारे हैं ।। २४ ।।**

उतै=तिकडून; जू=जी ( बहुमानार्थी ); ठट्ट=समूह; उमडि=वेगानें; घुमडि=घेरून येणें; मतवारे=उन्मत्त; कारे=काळे; इतै=इकडून; बिदारे=विदारण केलें; करिन=हत्ती; चिक्करत भारे हैं=मोठ्यानें गडगड करीत आहेत; चिक्करणें=हत्तीचें ओरडणें; हू=देखील; मीर=सरदार; बिहद्द=मोठी, अमर्याद; कैयोबार=कित्येक वेळां; गुमान=गर्व, अभिमान; झारि डारे हैं= झाडून टाकले आहेत, खंडन केलें.

तिकडून दिल्लीपति औरंगजेब बादशहाच्या हत्तींच्या झुंडीच्या झुंडी काळ्याकुट्ट मेघांप्रमाणें निघाल्या आहेत, तर इकडे शिवराजाकडून सिंहासारखे मराठे शूर गडी घोर गर्जना करीत त्या हत्तींच्या मस्तकांचें विदारण करीत आहेत; शेख, सय्यद, मोंगल, पठाण यांचें सैन्य इखलासखांसारखा शूर सरदार देखील संभाळूं शकेना. शिवराजानें आपल्या तरवारीच्या जोरावर कित्येक वेळां दिल्लीवाल्यांची घमेंड जिरवून हिन्दुत्वाची मर्यादा राखली. ( २४ )

**जीत्यो सिवराज सलहेरि को समर सुनि सुनि असुरन के सुसीने धरकत हैं । देवलोक, नागलोक, नरलोक गावैं जस, अजहूं लों परे खग दन्त खरकत हैं ।। कंटक कटक काटि कीटसे उड़ाये केते, भूषन**

**भनत मुखमोरे सरकत हैं । रनभूमि लेटे अघ फेंटे अरसेटे परे रुधिर लपेटे पठनेटे फरकत हैं ॥ २५ ॥**

जीत्यो=जिंकले; सुसीने=निधड्या छातीचे; जस=यश; अजहूँ लौं=अद्याप; परे=पडले; खगदन्त=शस्त्रव्रण; खरकरत हैं=त्रास देतात; कंटक=शत्रू; काटि=कापून; कीट=किडे; केते=कित्येक; मुख मोरे=तोंडें फिरवून अर्थात् पाठ दाखवून; लेटे=निजले; अघफेंटे=पापी; अरसेटे=निशक्त; पठनेटे=तरुण पठाण.

शिवाजीनें साल्हेरीचें युद्ध जिंकल्याची बातमी ऐकून मुसलमानांच्या काळजांत धडकीच भरली. तीन्ही लोक—स्वर्ग, मृत्यु, पाताळ—शिवाजीचें यश गाऊं लागले. या युद्धांतील जखमी शिपाई अद्यापि विव्हळत आहेत. भूषण म्हणतो, शत्रूचें सैन्य कापून कित्येकांस मशकाप्रमाणें उडवून लावलें, तर कित्येक पाठ दाखवून पळून गेले व रक्तस्राव झाल्यामुळें निशक्त झालेले व रक्तानें माखलेले पापी तरुण पठाण रणभूमीवर तडफडत पडले आहेत. ( २५ )

**केतिक देसदल्यो दल के बल दच्छिन चंगुल चाँपि कै चाख्यो । रूप गुमान हर्‍यो गुजरात को सूरत को रस चूसि कै नाख्यो ॥ पंजन पेलि मलेच्छ मले सब सोइ बच्यो जिहि दीन व्है भाख्यो । सो रँग हैं सिवराज बली जिन नौरँग में रँग एक न राख्यो ॥ २६ ॥**

केतिक=कित्येक; दल्यो=दलन केलें; चंगुल=पंजा; चांपिकै=दाबून; चाख्यो=चव घेतली; गुमान=घमेंड; चूसिकै=चोखून; नाख्यो=नष्ट केलें; पंजन=पंजांनीं; पेलि=ठोंसून; मले=मर्दन केलें; व्है=होऊन; भाख्यो=बोलले.

शिवाजीनें आपल्या सैन्याच्या जोरावर कित्येक देशांचें निर्दालन केलें; ( पराभव केला ) दक्षिण देश तर केव्हांच पादाक्रांत केला, गुजराथेची शोभा आणि अभिमान पार नाहींसा केला. सुरत शहर लुटून तेथील वैभव नष्ट केलें. शिवसिंहानें म्लेंछांस पंजांत पकडून यथास्थित मर्दन केलें. ज्यांनीं दीनता दाखविली ( शरण गेले ) त्यांना सोडून दिलें. एवढा नवरंगी औरंगजेब पण बलाढ्य शिवाजीनें त्याचा एकही रंग चालूं दिला नाहीं. ( २६ )

**सूबा निरानँद बादर खान गे लोगन बूझत ब्योंत बखानो । दुग्ग सबै सिवराज लिये धरि चारु विचारु हिये यह आनो ॥ भूषन**

**बोलि उठे सिगरे, हुतो पूना में साइत खान को थानो । जाहिर है जग में जसवन्त लियो गढसिंह में गीदर बानो ॥ २७ ॥**

सूबा=सुभेदार; निरानंद=निरुत्साह; बादरखान=बहादुरखान; गे=गेले; बूझत=विचारीत; ब्योंत=उपाय; बखानो=सांगा; दुग्ग=दुर्ग; चारु=चांगला; हिये=मनांत; सिगरे=सगळे; हुतो=होतें; साइतखान=शायिस्ताखान; थानो=ठाणें; गीदरबानो=गिधाडाप्रमाणें.

बहादुरखान सुभेदारानें हताश होऊन आपल्या हाताखालील लोकांस विचारलें, "ह्या शिवाजीनें सर्व चांगले चांगले किल्ले तर हस्तगत करून घेतले; आतां तुम्हीं पोक्त विचार करून मला योग्य सल्ला द्या." तेव्हां सर्वच म्हणूं लागले:—

" आपण उपाय कसला विचारीत आहां? सिंहासारखे शूर असे यशवन्तसिंग व शायिस्ताखान यांनीं पुण्यांत कित्येक दिवसपर्यंत ठाण वसविलें होतें; परंतु अखेरीस त्यांना सिंहगड सोडून गिधाडाप्रमाणें पळून जावें लागलें. त्या जगविख्यात शिवाजीपुढें तुमचा काय पाड ?" ( २७ )

**जोर करि जै हैं जुमिला हूके नरेस पर तोरि खंड खंड सुभट समाज पै । भूषन असाम रूम बलख बुखाडे जै हैं, चीन सिलहट तरि जलधि जहाज पै ॥ सब उमरावन की हठ कूरताई देखो, कहैं नवरंगजेब साहि सिरताज पै । भीख मांगि खै हैं बिन मनसब रैं हैं पैन जै हैं हजरत महाबली सिवराज पै ॥ २८ ॥**

जैहैं=जाऊं; जुमिला=सर्वत्र; तोरि=तोडून; तरि=तरून; कूरताई=भ्याडपण; खैहैं=खाऊं; मनसब=पदवी; रैंहैं=राहूं; हजरत=माननीय; पै=वर.

शिवाजीचा पराक्रम पाहून भयभीत झालेले औरंगजेबाचे सर्व सरदार त्यास म्हणतात, "आम्हीं सर्व ठिकाणच्या राजांवर जोरानें चाल करून जाऊं, शत्रूकडील शूर वीर योद्ध्यांचे तुकडे तुकडे करून टाकूं, म्हणाल तर आसाम सयामच काय पण हिन्दुस्थानाबाहेर असलेले रूमबलख, बुखारा पावेतों जाऊं; जहाजांत बसून समुद्रोल्लंघन करून चीन, सिलहट आदि देशांत जाऊं. भीक मागून खाऊं; कोणत्याही पदवीची अपेक्षा न धरितां राहूं; पण त्या महाप्रतापी शिवरायावर मात्र चाल करून जाणार नाहीं." भूषण म्हणतो, औरंगजेबाच्या सरदारांचा हा हट्ट आणि भित्रेपणा कसा आहे पहा ! ( २८ )

**चंद्रावल चूर करि जावली जपत कीन्हो, मारे सब भूप औ सँहारे पुर धाय कै। भूषन भनत तुरकान दलथंभ काटि, अफजल मारि डारे तबल बजाय कै॥ एदिल सों बेदिल हरम कहैं बार बार, अब कहा सो वो सुख सिंह हि जगाय कै। भेझना है भेजो सो रिसालैं, सिवराज जू की वाजी करना लैं परनालैं पर आय कै॥ २९॥**

चंद्रावल=चंद्रराव मोरे; चूर=चुरा; जपत कीन्हो=जप्त केली; तुरकान=मुसलमान; तबल=डंका; मारिडारे=मारून टाकले; बजाय कै=वाजवून; एदिलसों=आदिल शहास; बेदिल=विमनस्क; हरम=स्त्रिया; कहा=कसें; सोवो=निजतां; दलथंभ=सेनापति; रिसालें=करभार; करनालैं=तोफा.

विजापूरच्या आदिलशहास त्याच्या दुःखी झालेल्या बेगमा म्हणतात,

"हे नाथ! ज्यान चंद्रराव मोरे याचा चक्काचूर करून जावळी हस्तगत केली, सर्व राजे आणि नगरवासि यांचा शहरांत शिरून संहार केला, ज्यानें मुसलमानांचे मोठ मोठे अफजलखानासारखे शूर सरदार मारून देशभर डंका गाजविला, त्या सिंहाला जागें करून आतां तुम्ही सुखानें निजूं म्हणाल तर कोण निजूं देईल? शिवाजीच्या तोफा पन्हाळगडापर्यंत येऊन पोहोंचल्या आहेत, त्याच्याकडे जो करभार पाठविणें आहे तो लौकर कां पाठवीत नाहीं?" (२९)

**साजि चमू जनि जाहु सिवा पर, सोवत सिंह न जाय जगावो। तासों न जंग जुरौ न भुजंग महा विषके मुख में कर नावो॥ भूषण भाषति बैरि बधू, जनि एदिल औरंग लौं दुख पावो। तासु सुलाह की राहत जौ मति, नाह दिवाल की राहन धावो॥ ३०॥**

साजि=सजवून; चमू=सैन्य; जनि=नकारार्थी अव्यय; जाहु=जाऊं; सिवा=शिवाजी; न जगावो=जागें करूं नका; तासों=त्याशीं; जुरौ न=जुळवूं नका; नावो न=घालूं नका; भाषति=म्हणतात; लौं=प्रमाणें; सुलाह=सल्ला; राह=रस्ता; तजौ मति=सोडूं नका; नाह=नाथ; दिवाल=भिंत.

शत्रूंच्या स्त्रिया आपल्या नवऱ्यांस म्हणतात, "सैन्याची तयारी करून तुम्ही (कुठें जातां?) शिवाजीवर चढाई करून जाऊं नका, व त्या निजलेल्या सिंहास

जागें करूं नका. त्याशीं युद्ध करणें म्हणजे महा विषारी सर्पाच्या तोंडांत हात घालणें आहे. तुम्हीं त्या शिवाजीशीं युद्ध करून आदिलशहा व औरंगजेब यांच्याप्रमाणें संकटांत पडूं नका. त्याशीं तडजोडच करा. तडजोडीचा रस्ता सोडून भिंतीवर धडक बसेल अशा रस्त्याला लागूं नका." ( ३० )

**बिज्जपूर बिदनूर सूर सर धनुष न संधहिं । मंगल बिनु मल्लारि नारि धम्मिल नहिं बंधहिं ॥ गिरत गब्भ कोटै गरब्भ चिंजी चिजा डर । चाल कुंड, दल कुंड, गोलकुंडा संका उर ॥ भूषन प्रताप सिवराज तव इमि दच्छिन दिसि संचरै । मधुरा धरेस धक धकत सो, द्रविड निबिड डर दबि डरै ॥ ३१ ॥**

बिज्जपूर=विजापूर; बिदनूर=कर्नाटकांतील एक गांव; सूर=शूर; संधहिं=लावतात; मल्लारि नारि=मलबारांतील स्त्रिया; धम्मिल=केश; बंधहिं=बांधतात; गिरत=पडत; गब्भ=गर्भ, गरब्भ=मध्य; चिंजी=मुलगी; चिंजा=मुलगा; चालकुंड=एक बंदर; संका=भीति; इमि=याप्रमाणें; मधुराधरेस=मदुरेचा ( मद्रास इलाख्यांत ) राजा; धकधकत=थरथरां कांपत; निबिड=अतिशय; दबि डरै=भीतीनें लपतात.

भूषण म्हणतो,—हे शिवाजी ! आपल्या प्रतापाचा धाक दक्षिणेंत इतका जबरदस्त बसला आहे कीं, विजापूर आणि विदनूर येथील शूर वीर शिपाई आतां धनुष्यावर बाण चढवीनातसे झाले. मलबार स्त्रियांनीं तर आपलें सौभाग्यचिन्ह ( चोळी अंगांत घालणें ) सोडून दिलें; इतकेंच नव्हे तर त्या आपले केश देखील बांधीनातशा झाल्या. किल्ल्यांत सुरक्षित राहणाऱ्या शत्रू-स्त्रियांचे गर्भपात होत आहेत; त्यांची लहान लहान मुलें, मुलीं, सारखीं भीत आहेत. चालकुंड, दलकुंड आणि गोवळकोंड्याच्या किल्लेदारांचीं मनें भीतीनें व्यग्र झालीं आहेत. मदुरापतीची छाती भयानें धडकत आहे, इतकेंच काय पण सर्वच द्राविडी प्रजा महाभयानें लपून बसली आहे ( ३१ )

**अफजल खान गहि जाने मयदान मारा, बीजापुर गोलकंडा मारा जिन आज है । भूषन भनत फरासीस त्यों फिरंगी मारि हबसी तुरुक डारे पलटि जहाज है ॥ देखत में खान रुसतुम जिन**

**खाक किया, सालति सुरति आजु सुनि जो अवाज है । चौंकि चौंकि चकता कहत चहुंधा ते यारो, लेत रहौ खबरि कहां लौं सिवराज है ।।३२।।**

गहि=पकडून; जाने=ज्यानें; मयदान मारा=जय मिळविला; फरासीस=फ्रेंच; फिरंगी=पोर्तुगीज; हबसी=हबशी; तुरुक=तुर्क; जहाज पलटि डारे=जहाजें बुडवून; देखत में=पहातां पहातां; खाक किया=भस्म केला, मातींत मिसळला; जिन=ज्यानें; सालति=भिववितो; सुरति=आठवण; आजु=आज; चौंकिं चौंकि=दचकून दचकून; चकता=औरंगजेब ( चगताई वंशज ); चहुंधाते=चहूंकडून; यारो=मित्रांनों; खबरि=खबर, वर्तमान; कहांलौं=कोठवर.

भूषण म्हणतो,—दिल्लीपति औरंगजेब घाबरून दचकून आपल्या सरदारांस वारंवार म्हणे, " मित्रांनो !, ज्यानें अफजल खानासारख्या शूर सरदारास चीत केलें, विजापूर, गोवळकोंडा ज्यानें नुकतेच जिंकले, फ्रेंच आणि पोर्तुगीजांची खबर घेऊन तुर्कांचीं जहाजें समुद्रांत बुडविलीं, पहातां पहातां रुस्तुमखानास मातींत घातलें, त्याची आठवण होतांच आज देखील अंगावर शहारे येतात, करितां तो शिवाजी कोठवर आला याची चोहींकडून नित्य खबर आणवीत रहा. " ( ३२ )

**फिरंगाने फिकिरि औ हदसानि हबसाने, भूषन भनत कोऊ सोवत न घरी है । बीजापुर बिपति बिडरि सुनि भाजे सब, दिल्ली-दरगाह बीच परी खरभरी है ।। राजन के राज सब साहन के सिरताज आज सिवराज पातसाही चित धरी है । बलख बुखारे कसमीर लौं परी पुकार धाम धाम धूमधाम रूम साम परी है ।।३३।।**

फिरंगाने=फिरंगी; फिकीरि=काळजीनें; हदसानि=भयानें, भीतीनें; हबसाने=हबशांचा देश; दरगाह=दरबार; खरभरी=खळबळ; परी=पडली; साहन=शहा, बादशहा; सिरताज=शिरोमाणि; पातसाही=राज्य; चितधरी है=मनांत आणलें आहे; लौं=पर्यंत; पुकार परी = आरडाओरड झाली; धाम धाम=ठिकठिकाणीं; रूमसाम=देश विशेष.

सर्व राजांमध्यें श्रेष्ठ व बादशहांमध्यें वरिष्ठ अशा शिवराजांनीं आज राजा होण्याची इच्छा प्रकट केली आहे; त्यामुळें फिरंगी काळजीनें व हबशी

५-६

भीतीनें घटकाभर देखील झोंप घेईनात. विजापुरावर कोसळलेला अनर्थ ऐकून सर्व लोक पळून गेले, आणि तिकडे दिल्ली दरबारांत खळबळ उडून गेली आहे इतकेंच नव्हे, तर बलख, बुखारा व रूमशामपर्यंत ठिकठिकाणीं धामधूम उडून गेली आहे ( हलकल्लोळ माजला आहे ). ( ३३ )

**गरुड को दावा सदा नाग के समूह पर, दावा नाग जूहपर सिंह सिरताज को। दावा पुरहूत को पहारन के कुलपर, पच्छिन के गोल पर दावा सदा बाज को ॥ भूषन अखंड नव खंड महि मंडल में, तम पर दावा रवि किरन समाज को। पूरब पछाँह देश दच्छिन ते उत्तर लौं, जहाँ पातसाही तहाँ दावा सिवराज को ॥ ३४ ॥**

दावा=स्वत्वाचा अधिकार; जूह=समूह; पुरहूत=इंद्र; पहारन=पहाड; डोंगर; पच्छिन=पक्षी; गोल=कळप; बाज=बहिरी ससाणा; तम=अंधार; पूरब=पूर्व; पछाँह=पश्चिम; दच्छिन=दक्षिण; पातसाही=( मुसलमानी ) राज्य.

गरुडाचा अधिकार जसा सर्पांच्या समुदायावर, शूर सिंहाचा हत्तींच्या कळपावर, इंद्राचा पर्वत-राजीवर, बहिरी ससाण्याचा पक्षिगणावर, रवि किरणांचा नवखंड पृथ्वीवरील अंधकारावर, अखंडपणें चालतो तद्वत्च पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत दक्षिणेपासून उत्तरेपावेतों जेथें जेथें मुसलमानी बादशाही होती तेथें तेथें शिवाजीचा अधिकार चालू झाला. ( ३४ )

**दारा की न दौर यह रारि नहीं खजुवे कीं, बाँधिवो नहीं है किधौं मीर सहबाल को। मठ बिस्वनाथ को न वास ग्राम गोकुल को, देव को न देहरा न मंदिर गोपाल को ॥ गाढे गढि लीन्हें और बैरी कतलान कीन्हें, ठौर ठौर हासिल उगाहत है साल को। बूडति है दिल्ली सो संभारै क्यों न दिल्लीपति, धक्का आनि लाग्यो सिवराज महाकाल को ॥ ३५ ॥**

दौर=दौड, चढाई; रारि=लढाई; खजुव=एक गांव; बाँधिबो=बांधणें; किधौं=किंवा; मीर=सरदार; सहबाल=शाहबाजखां; देहरा=मंदिर; गाढे=मोठे, भयंकर; गढि=किल्ले; कतलान=कत्तल; ठौर ठौर=ठिकठिकाणीं; हासिल=करभार; उगाहत=उगवीत; संभारै=संभाळ.

ही दारावरील चढाई किंवा खजुव्याची लढाई नव्हे, अथवा मीरसहबाल (शहाबाज खां) यास धरून बांधणें नव्हे; किंवा काशीचें विश्वनाथ मंदिर उध्वस्त करणें किंवा गोकुळांत ठाणें वसवून केशवरायाचा देव्हारा व गोपाळ मंदिर जमीनदोस्त करणें नव्हे. प्रचंड व दुर्गम असे किल्ले घेत शत्रूंची कत्तल करीत, ठिकठिकाणाहून वार्षिक कर घेत घेत शिवराज येत आहे. हे दिल्लीपति औरंगजेब! त्या प्रत्यक्ष महाकाल शिवरायाचा धक्का बसण्यापूर्वींच बुडणाऱ्या दिल्लीचें संरक्षण करतां येत असल्यास कां करीत नाहीं? ( ३५ )

**गढ़न गंजाय गढ़ धरन सजाय करि, छाँडे कत धरम दुवार दै भिखारी से । साहि के सपूत पूत बीर सिवराज सिंह केते गढ धारी किये बन बनचारी से ॥ भूषन बखानै केते दीन्हें बन्दीखाने, सेख सय्यद हजारी गहे रैयत बजारी से । महतों से मुगुल महाजन से महाराज डाँडि लीन्हें पकरि पठान पटवारी से ॥ ३६ ॥**

गढ़न=गड; गंजाय=तोडून; गढधरन=किल्लेदार; सजाय=शिक्षा; छाँडे=सोडले; कत=कित्येक; धरम दुवार=धर्मद्वार; केते=कित्येक; बनचारी=रानटी, लुटारू; गहे=धरले; महतो=गांवचा प्रमुख, पुढारी; डाँड़ि=दण्ड;

भूषण म्हणतो,—शहाजीच्या पराक्रमी वीरपुत्रानें शत्रूंचे किल्ले उध्वस्त करून कित्येक किल्लेदारांना शिक्षा केल्या, तर कित्येकांना भिकाऱ्याप्रमाणें सोडून दिलें, तर कित्येकांस रानावनांतून भटकावयास लाविलें; कित्येकांना कैदेंत टाकलें. कित्येक ( पंच सप्त हजारी ) शेख—सय्यद सरदारांस बाजार बुणग्याप्रमाणें फिरावयास लाविलें. मोंगलांस पाटलांप्रमाणें, मोठमोठ्या राजांस महाजनांप्रमाणें व पठाणांस कुलकर्ण्यांप्रमाणें पकडून त्यांचेकडून दंड घेतला. ( ३६ )

**सक्र जिमि सैलपर, अर्कतम फैलपर, बिघन की रैलपर लम्बोदर लेखिये । राम दसकन्धपर, भीम जरासंधपर, भूषन ज्यों सिंधु पर कुंभज बिसेखिये ॥ हर ज्यों अनंग पर, गरुड भुजंग पर, कौरव के अंग पर पारथ ज्यों पेखिये । बाज ज्यों बिहंग पर, सिंह ज्यों मतंग पर, म्लेच्छ चतुरंग पर, सिवराज देखिये ॥ ३७ ॥**

सक्र=शक्र, इंद्र; जिमि=ज्याप्रमाणें; सैल=शैल, पर्वत; अर्क=सूर्य; तम फैल=अंधार; बिघन=विघ्न; रैल=समुदाय; लम्बोदर=गणपति; लेखिये=

समजा, पहा; दसकन्ध=रावण; कुंभज=अगस्ति; बिसेखिये=पहा; हर=महादेव; अनंग=काम; पारथ=पार्थ; पेखिये=पहा; बाज=बहिरी ससाणा; मतंग=हत्ती.

ज्या प्रमाणें इंद्र पर्वताचा, सूर्य निबिड अंधःकाराचा, आणि विघ्न–हर्ता गणराज विघ्नसमुदायाचा नाश करितो, किंवा ज्याप्रमाणें रामानें रावणाचा व भीमानें जरासंधाचा नाश केला, अगस्तिऋषींनीं समुद्राचा घोंट घेतला, महादेवानें मदनास जाळून भस्म केलें, अर्जुनानें कौरवांचा निःपात केला; किंवा सर्प गरुडांस, पक्षी बहिरी ससाण्यास, हत्ती सिंहास पाहून भयभीत होतात, त्याप्रमाणें शिवाजीस पाहून म्लेंच्छ सैन्याची गाळण उडते. ( ३७ )

**बारिधि के कुंभ--भव, घन बन दावानल, तरुन तिमिरहू के किरन समाज हौ। कंस के कन्हैया, कामधेनु हू के कंट काल, कैटभ के कालिका, विहंगम के बाज हौ ॥ भूषन भनत जम जालिम के सचीपति, पन्नग के कुल के प्रबल पच्छिराज हौ । रावन के राम कार्तवीज के परसुराम, दिल्लीपति दिग्गज के सेर सिवराज हौ ॥३८॥**

बारिधि=समुद्र; कुंभ–भव=अगस्ति; घन=गहन, दाट; दावानल=दावाग्नि; तरुन तिमिर=दाट अंधार; जम=यम; जालिम=जुलूम करणारा; दिग्गज=हत्ती.

समुद्रास ज्याप्रमाणें अगस्ति ऋषि, गहन वनास दावाग्नि, निबिड अंधःकारास सूर्यकिरणें, कंसास कृष्ण, कामधेनूस कांटेरी वन, कैटभासुरास कालीदेवी; पक्षांस बहिरी ससाणा, वृत्रासुरास इंद्र, सर्प कुलास प्रबल गरुड; रावणास राम, कार्तवीर्यास ( सहस्रबाहूस ) परशुराम, त्याप्रमाणें हे शिवराज ! दिल्लीपति औरंगजेबरूपी हत्तीस तुम्ही सिंहासारखे आहां. ( ३८ )

**दर बर दौर करि नगर उजारि धारि, कटक कटायो, कोटि दुजन दरब की। जाहिर जहान जंग जालिम है जोरावार, चलै न कछूक अब एक राजा रब की॥ सिवराज तेरे त्रास दिल्ली भयो भुवकंप, थर थर काँपति बिलाइति अरब की । हालत दहलि जात काबूल कंधार बीर रोस करि काढ़े समसेर ज्यों गरब की ॥ ३९ ॥**

दरबर=दल बल, सैन्याचें सामर्थ्य; दौर=दौड, चढाई; उजारि डारि= उजाड करून टाकले; कटायो=कापले; दुजन=दुर्जन; दरब=द्रव्य; जाहिर=

प्रसिद्ध; जहान=जग; जंग=युद्ध; जालिम=जुलूम करणारा; कछूक=कांहीं देखील; रब=मुसलमान; बिलाइति=हिन्दुस्थानाबाहेरील मुसलमानी राज्यें; दहलि जात=कांपतात; रोस=रोष; गरब=अभिमान.

हे शिवराज ! दुर्जनांच्या द्रव्यानें एकत्रित झालेल्या सैन्यावर आपल्या सैन्यानिशीं चाल करून आपण त्यांस कापून काढलें आणि त्यांचीं नगरें उध्वस्त केलीं; आपला युद्धांतील हा घोर पराक्रम आणि सामर्थ्य हीं जगजाहीर झालीं आहेत. आपल्या समोर राव, राजे, बादशहा यांचें कांहीं एक चालत नाहीं. आपल्या दराऱ्यानें दिल्लीला भूकंप होत आहेत ( दिल्लीवाले भयानें कांपत आहेत. ) अरबस्तान थरथर कांपत आहे. हे वीर शिरोमणि, जेव्हां आपण रागावून ( वीरोचित ) अभिमानानें तरवार उपसतां, तेव्हां काबूल कंदाहार डळमळून जातात. (३९)

**‘ सिवा की बड़ाई और हमारी लघुताई क्यों कहत बार बार ’ कहि पातसाह गरजा । सुनिये ‘ खुमान हरि तुरुक गुमान महि देवन जेंवायो ’ कवि भूषण यों अरजा ॥ तुमवाकों पाय कैं जरूर रन छोरो वह रावरे वजीर छोरि देत करि परजा । मालुम तिहारो होत याहि मैं निवारों रन कायर सो कायर औ सरजा ॥ ४० ॥**

बढाई=मोठे पण; लघुताई=क्षुद्रता; गरजा=गर्जून; सुनिये=ऐका; खुमान=आयुष्मान; हरि=हरण केले; तुरक=यवन; गुमान=घमेंड, अभिमान; महिदेवन=ब्राम्हण, पृथ्वी आणि देवता; यों=असें; अरजा=विनंती केली; वाकों=त्याला; पायकैं=भेटून, पाहून; छोरो=सोडतां; छोरि देत=सोडून देतो; करि=करून; परजा=प्रजा; तिहारो=तुझा; मालुम=ज्ञात; याहिमें=यांत; निबेरो=निवाडा; रन कायर=रण भीरु; सरजा=सिंह; रावरे=तुमचे.

औरंगजेबानें एकदां भूषण कवीस खोद खोदून विचारलें कीं, तूं नेहमीं शिवाजीची प्रशंसा आणि आमची निंदा करितोस ह्याचें काय कारण ? भूषणानें विनयपूर्वक उत्तर दिलें:—‘ ऐका, तो शिवाजी चिरंजीव होवो, त्यानें म्लेंच्छांचा गर्वहरण करून देवाब्राह्मणांचें संरक्षण केलें. दुसरें असें कीं रणांत तुम्ही त्याला पाहिलें मात्र कीं, तुम्हांस रण सोडून पळून जावें लागतें. ( शिवाजी ही संधि पाहून ) तुमच्या प्रधानास आपली प्रजा करून

घेतो, ( आपल्या छत्राखालीं घेतो ). तुमच्या प्रश्नाचा निवाडा या तुमच्या कृतींतच आहे. तुम्ही रण सोडून पळून जातां आणि शिवाजीस पाहून भितां म्हणून तुम्ही रणभीरु व तो रणशूर सिंह. ( ४० )

**कोट गड ढाहियतु एकै पातसाहनके, एकै पातसाहन के देस दाहियतु है । भूषन भनत महाराज सिवराज एकै साहन की फौज पर खग्ग बाहियतु है ।। क्यों न होहि बैरिन की बैरि बधू बौरी सुनि; दौरानि तिहारे कहौ क्यों निबाहियतु है । रावरे नगारे सुने बैर बारे जगरन नैन बारे नदन निवारे चाहियतु है ॥ ४१ ॥**

कोट=किल्ला, गड; ढाहियतु है=पाडतो, उध्वस्त करितो; एकै=कोणी एका; दाहियतु है=जाळतो; खग्ग बाहियतु है=खडग चालवितो; बौरी=बावरलेली अशी; दौरनि=हल्ले; निबाहियतु है=निभावतात; बैरबारे=वैरी; नदन=नद्या; निवारे=नावा; चाहियतु है=पाहिजे आहेत.

हे शिवाजी महाराज ! आपण कोणा बादशहाचे किल्ले पाडतां, कोणाचे देश जाळून भस्म करितां, तर कोणा बादशहाच्या सैन्यावर तरवार चालवितां. हा आपला पराक्रम पाहून शत्रूस्त्रिया कां बावरणार ( बावचळणार ) नाहींत ? तुमच्या हल्ल्यांपासून त्या आपलें संरक्षण कसें करूं शकतील ? भूषण म्हणतो, तुमच्या नगाऱ्यांचा भयंकर ध्वनि ऐकून शत्रूंच्या नगरांतील लोक सारखा विलाप करीत आहेत, तो इतका कीं, त्यांच्या अश्रूंच्या नद्या पार होण्यास मोठ मोठ्या नौका पाहिजे आहेत. ( ४१ )

**चकित चकत्ता चौंकि चौंकि उठै बार बार, दिल्ली दहसति चितै चाह करषति है । बिलखि बदन बिलखात बिजैपुरपति, फिराति फिरंगिनि की नारी फरकति है ।। थरथर कांपत कुतुब साह गोलकुंडा, हहरि हबस भूपभीर भरकति है । राजा सिवराज के नगारन की धाक सुनी केते पातसाहन की छाती दरकति है ।। ४२ ।।**

चकित=विस्मित; चकत्ता=चगताई वंशज औरंगजेब; चौंकि चौंकि=दचकून दचकून; दहसति=भिते; चितै चाह=मनांतील इच्छा; करषति है=ओढते;

विलखि=पाहून; बिलखात=उदास; फरकति है=घाबरतात; हहरि=हळहळून; भीर=भीति; भरकति है=पळतात; केते=कित्येक; दरकति है=फाटून जातें.

शिवाजी महाराजांच्या नगाऱ्यांचा दणदणाट ऐकून औरंगजेब भयचकित होऊन वारंवार दचकून उठतो आहे, दिल्लीवासियांच्या मनांत दहशत बसली आहे. विजापूरच्या बादशाहाचा उदास झालेला चेहरा पाहून फिरंगी स्त्रिया घाबरून गेल्या आहेत; गोवळकोंड्याचा कुतुबशाह बादशाह थरथर कांपत आहे; हबशी राजे तर भयभीत होऊन पळून जाण्याच्या तयारींत आहेत; कित्येक बादशहांच्या छात्या फाटून गेल्या आहेत. ( ४२ )

**मौरंग कुमाऊं औ पलाऊ बाँधे एक पल, कहाँ लौं गिनाऊँ जेब भूपन के गत हैं। भूषन भनत गिरि बिकट निवासी लोग, बावनी बवंजा नव कोटि धूंध जोत हैं। काबुल कंधार खुरासान जेर कीन्हों जिन, मुगल पठान सेख सैयद हा रोत हैं। अब लग जानत हे बडे होत पातसाह सिवराज प्रगटे ते राजा बडे होत हैं ॥ ४३ ॥**

मौरंग, कुमाऊं, पलाऊ=संस्थानें; औ=और; लौं=पर्यंत; गिनाऊं=मोजूं; जेऽब=जे—अब=जे आतां; बांवनी बवंजा=बुंदेलखंडांतील एक मुसलमानी संस्थान; नव कोटि=नव कोठी=मारवाडांतील एक संस्थान; धुंध=तेजहीन; जोत=ज्योत.

भूषण म्हणतो, मौरंग, कमाऊन आणि पलाऊ येथील संस्थानिकांना तर शिवाजीनें क्षणांत जिंकून कैद केलें; यांच्या प्रमाणें आणखी किती तरी राजांना कैद केलें, तें मी कोठवर मोजूं ? उंच आणि बिकट अशा पर्वतांवर राहणाऱ्यांस त्याचप्रमाणें बावनी बवंजा, नव कोटी, येथील संस्थानिकांस निस्तेज करून टाकलें. काबूल, कंदाहारास जर्जर केल्यामुळें मोंगल, पठाण, शेख, सैयद हाहाःकार करून रडत आहेत. आजपर्यंत बादशहाच काय तो मोठा असें लोक समजत असत. पण शिवाजीच्या प्रकट होण्यानें राजाच मोठा ( श्रेष्ठ ) असतो हें समजून आलें. (४३)

**दुग्ग पर दुग्ग जीते सरजा सिवाजी गाजी, उग्ग पर उग्ग नाचे रुंड मुंड फरके। भूषन भनत बाजे जीत के नगारे भारे सारे कर नाटी भूप सिंहल को सरके ॥ मारे सुनि सुभट पनारे बारे उदभट,**

**तारे लगे फिरन सितारे गढ़धर के । बीजापुर बीरनके गोलकुंडा धीरन के दिल्ली उर मीरन के दाडिम से दर के ॥ ४४ ॥**

दुग्ग=दुर्ग; उग्ग=उग्र, शंकर; सिंहल=सिंहल द्वीप; सरके=पळाले; पनारे वारे=पन्हाळगडवाले; उदभट=पराक्रमी; तारे फिरन लगे=भाग्य पालटूं लागलें; गढधर=गडपति; दरके=फाटले; गाजी=धर्म युद्ध करणारा, धर्मवीर.

धर्मवीर शिवाजीनें एकामागून एक असे कित्येक किल्ले घेतले. रणांगणांत शेंकडों धडें व शिरें नाचूं उडूं लागलीं. विजयदुंदुभींच्या प्रचंड जयघोषानें कर्नाटकचे सर्व राजे थेट सिंहलद्वीपापर्यंत पळाले. शिवाजीचा भाग्यसूर्य अनुकूळ तळपत आहेसें पाहून व पन्हाळगडच्या शूरवीर योद्ध्यांस मारलेलें ऐकून, विजापूरच्या वीरांचीं, गोंवळकोंडा येथील धैर्यशील शूरांचीं, व दिल्लीच्या सरदारांची हृदयें डाळिंबाप्रमाणें उललीं ( फाटलीं. ) ( ४४ ).

**मालवा उजैन भनि भूषन भेलास ऐन सहर सिरोज लौं परावने परत हैं । गोंडवानो तिलंगानो फिरंगानो करनाट रुहिलानो रुहिलन हिये हहरत हैं ॥ साहिके सपूत सिवराज, तेरी धाक सुन गढ़पति वीर तेऊ धीर न धरत हैं । बीजापुर गोलकुंडा आगरा दिल्ली के कोट बाजे बाजे रोज दरबाजे उघरत हैं ॥ ४५ ॥**

मालवा=माळवा; भेलास=भेलसा—ग्वाल्हेर; ऐन=ठीक, थेट ( अरबी शब्द ); सिरोज=शिराज, इराणांतील एक शहर; हहरत हैं=भयभित होतात; रुहिलन हिये=रोहिल्यांची हृदयें; कोट=किल्ला; बाजे बाजे रोज=एकाद्या दिवशीं, केव्हां तरी, कोण्या तरी.

भूषण म्हणतो—हे शहाजीचे सुपुत्र शिवराज ! तुमच्या धाकानें माळवा, उज्जैन, आणि भेलशांच्या ( यवन ) रहिवाशांस थेट इराणची राजधानी शिराजपर्यंत पळावें लागलें. गोंडवण, तेलंगण, रोहिलखंड, कर्नाटक तसेंच फिरंगी लोकांच्या वस्तींतील रहिवाशांच्या हृदयांत धडकी भरली आहे. मोठमोठे शूर किल्लेदार धीर धरीनातसे झाले. गोंवळकोंडा, आग्रा आणि दिल्ली येथील किल्ल्यांचे दरवाजे महिना पंधरा दिवसातून केव्हां तरी उघडतात, रोज रोज उघडत नाहींत. ( ४५ )

**मारि करि पातसाही खाकसाही कीन्ही, जिन जेर कीन्हों जोर सों लै हद्द सब मारे की । खिसि गई सेखी, फिसि गई सूर ताई सब, हिसि गई हिम्मति हजारों लोग सारे की ।। बाजत दमामें लाखौं धौंसा आगे घहरात, गरजत मेघ ज्यों बरात चढ़े भारे की। दूल्ह हो सिवाजी भयो दच्छिनी दमामे वारे, दिल्ली दुलहिन भई सहर सितारे की ।। ४६ ।।**

पातसाही=राज्य ( मुसलमानी ); खाक साही=भस्म; कीन्ही=केली; जिन=ज्यानें; सों=नें; लै=घेऊन; खिसिगई=पडली, झुकली; सेखी=बढाई; फिसिगई=नष्ट झाली; सूरताई=शूरत्व; धौंसा=नगारे; घहरात=गर्जत; भारे=श्रीमंत; दूल्हो=नवरा; दमामेवारे=नगारेवाले; दुलहिन=वधू, नवरी; सहर=शहर; सारे=सर्व; जेर कीन्हों=जर्जर केलें.

ज्यानें केवळ आपल्या सामर्थ्यानें सव माऱ्यांच्या जागा हस्तगत करून घेऊन मोठमोठ्यांची बढाई, शूरपणा, तसेंच हजारों शूरांच्या हिंमती ज्यानें नष्ट केल्या त्या शिवाजी राजाच्या विजयदुंदुभि मेघांच्या गडगडाटाप्रमाणें दणाणत आहेत; जणों एकाद्या श्रीमंताच्या लग्नाची वरातच ( जिच्यापुढें लाखों नगारे, नाबतींचा मेघ-गर्जनेप्रमाणें दणदणाट चालावा ) निघाली आहे असें वाटत. दक्षिणेंत विजय-दुंदुभि वाजविणारे शिवाजी हे ह्या वरातींतिल नवरदेव होत व दिल्ली त्या सातारा गडाधिपतीची नवरा होय. ( ४६ )

**डाढ़ीके रखैयनकी डाढ़ीसी रहत छाती बाढ़ी मरजाद जैसी हद्द हिन्दुवाने की कढिगई रैयत के मनकी कसक सब, मिटिगई ठसक तमाम तुरकाने की ॥ भूषन भनत दिल्लीपति दिल धकधका सुनि सुनि धाक सिवराज मरदाने की । मोठी भई चंडी बिन चोटी के चबाय सीस, खोटी भई संपति चकत्ता के घराने की ।। ४७ ।।**

डाढी=दाढी; रखैयन=राखणारे; डाढी रहत=जळत; बाढी=वाढली; मर-जाद=मर्यादा; हद्द=सीमा; हिन्दुवान=हिन्दुस्तान; कढि गई=निघाली, नाहींशी झाली; रैयत=प्रजा; कसक=पीडा; मिटि गई=मिटली, नष्ट झाली; ठसक=घमेंड,

अभिमान; तमाम=सर्व; तुरकाने की=तुर्कांची, मुसलमानांची; धकधका=थर थर कांपणें; मरदाना=शूर मर्द; मोठी=लठ्ठ; भई=झाली; चंडी=रण देवता; बिन चोटी=शिखा हीन ( मुसलमान ); चबाय=चावून; सीस=मस्तक; खोटी भई=क्षीण झाली; चकत्ता घराना=चगताई वंश (ज्यांत औरंगजेब उत्पन्न झाला.)

जसजशी हिन्दूंची राज्यमर्यादा वाढूं लागली तसतशी दाढी राखणाऱ्यांची ( यवनांची ) छाती जळूं लागली, ( हिन्दूंचें वैभव सहन होईना )–हिन्दू प्रजेच्या मनांतील सर्व पीडा नाहींशी झाली व मुसलमानांचा गर्व पार नष्ट झाला. भूषण म्हणतो, मर्द शिवराजाचा वारंवार दरारा ऐकून, दिल्लीपति औरंगजेबाच्या हृदयांत धडकी भरली. रणदेवता शिखाहीनांचीं ( यवनांचीं ) मुंडकीं खाऊन ताजी व लठ्ठ झाली आहे आणि मोंगल घराण्यांतील राजलक्ष्मी दिवसेंदिवस क्षीण होत चालली आहे. ( ४७ )

**जिन फन फुतकार उडत पहार भार, कूरम कठिन जनु कमल बिदलि गो । विष जाल ज्वाल मुखी लवलीन होत, जिन झारन चिकारि मद दिग्गज उगलि गो ॥ कीन्हों जिन पान पयपान सो जहान सब, कोल हू उछलि जल सिन्धु खलभलि गो । खग्ग खगराज महाराज सिवराज जूको अखिल भुजंग मुगलदल निगलिगो॥४८॥**

जिन=ज्या; फन=सर्प; फुतकार=फूत्कार; पहार=पहाड; भार=भारी, मोठे; कूरम=कूर्म; जनु=जणों; बिदली गो=विदारून गेली, फाटली; झारन= ठिणग्या; चिकारि=चीं चीं करून; दिग्गज=हत्ती; उगलि गो=ओकला, पलटला; जहान=जग; कोल हू=वराह सुद्धां; खल भलिगो=खळबळून गेला. खग्ग=खड्ग; खगराज=गरुड; जू=जी; मुगल दल=मोंगल सैन्य; निगलि गो=गिळून टाकलें.

ज्या मोंगल सैन्यरूपीं महासर्पाच्या फूत्कारानें मोठे मोठे डोंगर उडून जात, ज्याच्या भारानें कूर्माची अतिशय कठिण पाठ देखील कमलाप्रमाणें छिन्न भिन्न होऊन जाई, ज्याच्या भयंकर विषारी ज्वालांनीं मोठमोठे मदोन्मत्त हत्ती पण चींचीं करीत मदहीन होऊन जात, ज्यानें सर्व जग दुधाप्रमाणें पिऊन टाकलें होतें ( ग्रासलें होतें ), वराह देखील ज्याच्या पराक्रमानें स्थानभ्रष्ट झाल्यामुळें समुद्र

खवळून जाई, त्या महा सर्पास ( मोंगल सैन्यास ) शिवाजीच्या खड्गरूपीं गरुडानें सहज गिळून टाकलें. ( ४८ )

**राखी हिन्दुवानी हिन्दुवान को तिलक राख्यो, अस्मृति पुरान राखे वेद विधि सुनी मैं । राखी रजपूती राजधानी राखी राजन की, धरामें धरम राख्यो राख्यो गुन गुनीमें ॥ भूषन सुकवि जीति हद्द मरहदन की देस देस की रति बखानी तब सुनी मैं । साहि के सपूत सिवराज, समसेर तेरी दिल्ली दल दावि कै दिवाल राखी दुनी मैं ॥ ४९ ॥**

हिन्दुवानी=हिन्दुत्व; राख्यो=राखला; अस्मृति=स्मृति; पुरान=पुराण; जीति=जिंकून; हद्द=मर्यादा; मरहदन=मराठे; कीरति=कीर्ती; बखानी=वर्णन केली; समसेर=तलवार; दिवाल ( र )=भिंत, मर्यादा; दुनी=दुनिया.

हे शहाजीचे सुपुत्र शिवराज ! तुम्हीं हिन्दूंचें धर्म—चिन्ह ' तिलक ' तसें स्मृति, पुराणें, यांचें संरक्षण करून वेद—मर्यादा कायम ठेवली. रजपूत राजांच्या राजधानीचें संरक्षण केलें, पृथ्वीवर धम राखला, आणि गुणिजनांचा गुण ( त्यांच्या गुणांस उत्तेजन देऊन ) कायम ठेवला. भूषण म्हणतो,—

शिवाजीनें आपल्या तरवारीच्या जोरावर दिल्लीच्या सैन्यास जरबेंत ठेऊन—पराभव करून दुनियेंत मर्यादा ( शांतता ) राखली; तसेंच मराठ्यांची देशामागें देश जिंकल्यानें चहूंकडे ख्याति झाली तेव्हां ( ती ) मी ऐकली. ( ४९ )

**सारससे सूबा करवानकसे साहजादे, मोर से मुगलमीर धीर ही धचैं नहीं । बगुला से बंगस बलूचियो बतक ऐसे, काबुली कुलंग याते रन में रचैं नहीं ॥ भूषन जू खेलत सितारे में सिकार सिवा साहि को सुवन जाते दुवज सँचै नहीं । बाजी सब बाज से चपेटैं चंगु चहूं ओर, तीतर तुरुक दिल्ली भीतर बचैं नहीं ॥ ५० ॥**

सारस=एक पक्षी; करवानक=गौरानामक पक्षी; साहजादे=शाहजादे, राजपुत्र; मीर=सरदार; धचैं नहीं=धरीत नाहींत; बगुला=बगळा; बलूचियो=बलूची; ( अनेक ) बतक=बदक; रन=रण; रचैं नहीं=येत नाहींत; याते=यामुळें;

जाते=ज्यामुळें; दुवन=दुर्जन; सँचै नहीं=संचार करीत नाहींत. फिरत नाहींत. बाज से=बाजा ( बहिरी ससाण्या ) प्रमाणें; चपेटैं=तडाका लावतात, थप्पड देतात; चंगु=पंजा; ओर=बाजू ; तीतर=तित्तिर पक्षी; तुरुक=यवन; भीतर= आंत; बचै नहीं=वाचत नाहीं.

या छंदांत कवीनें शिवराज शिकारी, व इतर राजे बादशाह हीं त्याचीं सावजें होत, असें एक मौजेचें रूपक कल्पिलें आहे. ( ठिकठिकाणचे ) सुभेदार हे सारस, शहाजादे हे गौरा, व मोंगल सरदार हे मोरांप्रमाणें होत; शिकारी शिवाजीस पाहून, मुळींच धैर्य धरीत नाहींत. बंगष बगळ्याप्रमाणें, बलूची बदकांप्रमाणें व काबुली कुलंगाप्रमाणें असून ते शिवाजीरूपीं शिकाऱ्यास पाहून मैदानांत ( रणांत ) पाय सुद्धां ठेवीत नाहींत. भूषण म्हणतो, शहाजीचे सुपुत्र शिवाजी हे साताऱ्यांत शिकार खेळतात पण या पक्षीरूप दुर्जनांची इतस्ततः फिरण्याची प्राज्ञा नाहीं; कारण तो शिवाजी बहिरी ससाण्याप्रमाणें कोणीकडून भरारी मारून पंजांत कसा पकडील याचा नेम नाहीं व म्हणूनच दिल्लींत यवनरूप तित्तिर पक्षी वांचणें कठिण झालें आहे. ( ५० )

**वेद राखे विदित पुरान राखे सारयुत रामनाम राख्यो अति रसना सुघर में । हिन्दुनकी चोटी रोटी राखी है सिपाहिन की, काँधे में जनेऊ राख्यो माला राखी गरमें ॥ मीडि राखे मुगल मरोरि राखे पातसाइ, बैरी पीसि राखे बरदान राख्यो करमें । राजन की हद्द राखी तेग बल सिवराज, देव राखे देवल स्वधर्म राख्यो घरमें ॥ ५१ ॥**

राखे=राखले; राख्यो=राखलें; सुघर=चांगलें घर; चोटी=शेंडी; सिपाहिन= शिपाई ( अनेक ), काँधे में=खांद्यावर; जनेऊ=जानवें; राखी=राखली; गर=गळा; मीडि राखे=मर्दून ठेवलें; मरोरि=मुरगाळून; पीसि=दळून; तेग=तल- वार; तेगबल=तरवारीच्या जोरावर.

शिवाजीनें आपल्या तरवारीच्या जोरावर वेद आणि पुराणें यांचें संरक्षण केलें, सर्वस्वाचें सार असें जें रामनाम तें हिन्दूंच्या जिव्हेवर कायम ठेविलें. हिन्दूंची शेंडी राखली आणि शिपायांची रोटी ( उपजीविका ) चालविली. खांद्यावरील जानवीं

आणि गळ्यांतील माळा सुरक्षित ठेवल्या. मोंगलांचें यथास्थित मर्दन केलें, बादशहास मुरगाळून टाकलें, शत्रूंचें चूर्ण केलें. इतकें करून आपल्या हातीं वर देण्याचा अधिकार ठेवला. देवळांत देव, व घरांत कुलधर्म कुलाचार कायम ठेवले. (५१)

**सपत नगेस चारो कुकुभ गजेस कोल कच्छप दिनेस धरैं धरनि अखंड को। पापी घाले धरम सुपथ चाले मारतंड, करतार प्रन पाले प्रानिन के चंडको ॥ भूषन भनत सदा सरजा सिवाजी गाजी म्लेच्छन को मारै करि कीरति घमंड को। जग-काज-वारे निहचिंत करि डारे सब भोर देत आसिष तिहारे भुजदंड को ॥ ५२ ॥**

सपत=सप्त, सात; नगेस=मोठे पर्वत; चारो=चारी; ककुभ=दिशा; कोल=वराह; कच्छप=कूर्म; दिनेस=सूर्य; धरनि=पृथ्वी; घाले=मारले; धरम=धर्म; करतार प्रान=ईश्वर प्रतिज्ञा; पाले=पाळली; चंड=शक्ति, प्रानिन=प्राणी (अनेक); गाजी=धर्मवीर ( धर्मयुद्ध करणारा ); कीरति=कीर्ति; घमंड=मान; जगकाज वाहे=जग कार्य वाले, अर्थात् प्रापंचिक; निहचिंत=निश्चिंत; करिड़ारे=करून टाकले; भोर=प्रातःकाळ; आसिष=आशीर्वाद; तिहारे=तुमच्या, तुझ्या; भुजदंड=बाहु युग्म.

भूषण म्हणतो, हे धर्मवीर शिवाजी ! तुम्हीं म्लेंच्छांना मारून अखंड कीर्ति आणि मान मिळविला. दुष्टांचें निर्दलन करून सूर्य धर्म मार्गानें चालविला; व परमेश्वराची प्रतिज्ञा ( यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युथानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ) अक्षरक्षः पाळली. जीवांच्या सामर्थ्याचें संरक्षण केलें; या मुळें सातही पर्वत, चारी दिशा, वराह, कूर्म, पृथ्वीस अखंड धारण करणारा शेष, सूर्य, तसेंच नित्याचा व्यवहार सुरळीतपणें चालूं लागल्यामुळें प्रापंचिक लोक, रोज सकाळीं उठून अगोदर तुमच्या उभय बाहूंस आशीर्वाद देत आहेत. (५२)

---

# मराठशाहींतील किल्ले

## निवेदन

[ गो. स. सरदेसाई ]

मराठ्यांच्या इतिहासांत किल्ल्यांचें महत्त्व विशेष आहे. त्यातील कोणत्याही बाबतीचा अभ्यास करितांना या किल्ल्यांचीं नांवें वारंवार येतात; आणि अमुक किल्ला अमुक ठिकाणीं आहे, असा बिनचूक पत्ता न लागल्यानें विषय समजण्यास पुष्कळदां अडचण पडते. यासाठीं महाराष्ट्रांतील किल्ल्यांची एक संपूर्ण यादी करून त्यांचा छडा लावून ठेवण्याचें माझ्या मनांत किती वर्षं घोळत आहे. शिवकालीन बखरींत[1] अशा किल्ल्यांच्या यादी ठिकठिकाणीं दिलेल्या आढळतात, पण त्यांत स्थलनिर्देश नसून शिवाय त्या यादी परिपूर्ण नाहींत. सबब महाराष्ट्रांतील जिल्ह्याचे इंग्रजींत असलेले वर्णन भाग गझेटियर्स मधून धुंडाळून व त्यांचे स्थलनिर्देश हुडकून काढून पुढील सुमारें पांचशें किल्ल्यांची यादी मी बनविली आहे. बखरींतील बहुतेक नांवें गझेटियर्समध्यें आहेत; तथापि ज्यांची माहिती गझेटियर्स-मध्यें दिलेली नाहीं, पण जीं नांवें बखरींत आहेत, अशांचाही समावेश मीं पुढील यादींत केला असून, स्थल–निर्देश न मिळाल्यानें, पुढें प्रश्नचिन्ह ठेविलें आहे.

किल्ल्यांच्या संज्ञा बहुधा गिरि, गड, दुर्ग, कोट इत्यादि प्रकारच्या असून, कित्येकांचीं नांवें जुनीं, देशी आहेत. कित्येकांचें जुनें व नवीन संस्कृत नांव दोनही कायम असून तीं दोनही यादींत दाखल केलीं आहेत. शिवछत्रपतीनें बनविलेलीं संस्कृत नांवें किती तरी सुंदर व अन्वर्थक भासतात.

सर्व हिंदुस्थानांतील किल्ल्यांची एक संपूर्ण यादी सरकारानें छापलेली असून, तिचा उल्लेख गझेटियरचा कर्ता वारंवार करितो.[2] मला ही यादी उपलब्ध झाली नाहीं. शिवाय सर्व हिंदुस्थानांतील किल्ल्यांची पूर्ण यादी देण्याचा माझा उद्देशही नाहीं. कारण पूर्वीं प्रत्येक नगरास व त्यांतील मोठमोठ्या वाड्यांस सुद्धां लहान मोठे तट असत, तेही एक प्रकारचे किल्लेच होत. कांहीं लहान गांवांच्या तटांस गढ्या म्हणत. अशा सर्वांची यादी करूं लागल्यास, तो एक हिंदुस्थानचा स्वतंत्र भूगोलच होईल. सबब यादींत बहुतेक नांवें महाराष्ट्रांतील डोंगरी किल्ल्यांचीं व किनाऱ्यावरील

---

१ शिवदिग्विजय पृ. १४८, चिटणीसकृत सप्त प्र० चारित्र पृ. ३१५, सभासदकृत शि० बखर पृ. १९९, शेडगांवकर बखर रुमाल १ पृ. ९६, शाहू रोजनिशी पृ. १४८; अष्टप्रधानांचा इ०.

2. Government List of Civil Forts in India.

जंजिऱ्यांचीं मात्र घेतलीं आहेत. कांहीं थोडीं कर्नाटकांतलीं व महाराष्ट्राबाहेरील, महत्त्वाचीं समजून यादींत दिलीं आहेत. एका मुख्य किल्ल्याचे अनेक पोटभाग असून, त्यांसही स्वतंत्र नांवें असतात. अशांची स्पष्टताही शक्य तितकी केली आहे. कित्येक किल्ल्यांचीं एकाहून अधिक नांवें प्रचलित असून, उलट पक्षीं, एकाच नांवाचे अनेक भिन्न किल्ले विद्यमान आहेत, हें पुढील यादी तपासल्यास कळून येईल.

किल्ल्यांचीं वर्णनें किंवा पुष्कळसे अवांतर तपशील या यादींतून मीं मुद्दामच गाळले आहेत. तथापि इतिहासाभ्यसनाच्या सोयींसाठीं बहुतेक महत्त्वाच्या बखरींतून वगैरे दिलेले प्रसंग थोडक्यांत दाखविले आहेत, त्यांवरून ऐतिहासिक कागदपत्रांचा अभ्यास करितांना ही यादी उपयोगी पडावी अशी दृष्टि ठेविली आहे. यादी शक्य तितकी परिपूर्ण करून कोणत्याही नांवानें असलेला किल्ला हुडकतां यावा अशी ही यादी वर्णानुक्रमवार बनविली आहे. तथापि या यादींतून महत्त्वाचीं नांवें गळलीं असल्यास तीं, किंवा इतर कांहीं प्रमाद जे वाचकांस आढळतील ते त्यांनीं कृपा करून दुरुस्तीसाठीं मला कळवावे, अशी विनंति आहे.

किल्ल्यांचे मुख्य चार वर्ग पडतात. डोंगरी, भुईकोट, जंजिरा व छावणी. छावणी म्हणजे गढीवजा फौजेच्या उताराची जागा. प्रत्येक नांवापुढें या वर्गाचा निर्देश प्रथम करून नंतर जिल्ह्याचें नांव व त्यापुढें स्थलनिर्देश दिशेनें व मैलांचे आंकड्यांनीं केला आहे.

तथापि या कामांत अनेक उणीवा आहेत हें मी जाणून आहें. त्या हळू हळू अभ्यासानेंच भरून येतील. हल्लींचें त्याचें स्वरूप सुद्धां अनेकांच्या निरपेक्ष साह्यानेंच तयार झालें. प्रथम कांहीं दिवस खपून मी एक कच्चें लिखाण तयार केलें. नंतर माझे मित्र रा. प. न. घाटे त्यांनीं तें बखरींवरून तपासून दुरुस्त केलें. तदनंतर समर्थ–विद्यालयाचे उत्साही शिक्षक रा. दिनकर विनायक काळे व दुसरे येथील अभ्यासक रा. श्यामसुंदर य. मराठे या दोन कष्टाळू गृहस्थांनीं त्यांत आपापल्या परी खपून त्याची पूर्तता केली, म्हणूनच त्यास हें प्रस्तुतचें स्वरूप प्राप्त झालें आहे. रा. काळे यांनीं किल्ल्यांच्या संबंधानें एक मार्मिक व विवेचक लेख लिहून, शिवाय गॅझेटियर्स मधील माहिती मोठ्या कळकळीनें वेंचून घेतली. रा. काळ्यांचा लेख प्रस्तावनारूपानें या प्रकरणास जोडला आहे. या मेहनतीबद्दल वरील सर्व सहाय्यकांचे नुसते शाब्दिक आभार मानून मोकळें होणें मला प्रशस्त वाटत नाहीं. परंतु या पलीकडे त्यांच्या उपकारांची फेड करणें माझ्या शक्तींत नाहीं, याबद्दल वाईट वाटतें. वाचकांना हे श्रम पसंत पडले म्हणजे सर्वांच्या श्रमांचें चीज झालें. असें मी मानतों.

---

# मराठशाहींतील किल्ले

## प्रस्तावना

लेखक—**दिनकर विनायक काळे**, बी. ए.

" सर्वांचा निर्वाह आणि दिल्लींद्रासारखा शत्रु उरावर आहे, तो आला तरी, नवे-जुने तीनशें साठ किल्ले हजरतीस आहेत. एक एक किल्ला वर्ष वर्ष लढला तरी तीनशें साठ वर्षें पाहिजेत. " —**शिवदिग्विजय**. पृ० १९०.

" **संपूर्ण राज्याचें सार, तें दुर्ग.** " —अमात्यांची राजनीति, पृ० २७.

१. किल्ल्यांचें महत्व. २. किल्ल्यांचे वर्ग. ३. किल्ल्यांची दुर्गमता.
४. किल्ल्यांचे तट. ५. शिवाजीनें केलेले फरक. ६. मराठी बांधणीचे विशेष.
७. ऐतिहासिक परंपरा.

**१. किल्ल्यांचें महत्त्व.**—श्री छत्रपति शिवाजीचा जन्म शिवनेरी किल्ल्यावर झाला. त्यानें स्वराज्याचें तोरण तोरणा किल्ल्यावर बांधिलें. त्याच्या रणशूर मावळे, प्रभु वीरांनीं सिंहगड पुरंदरावर पराक्रम गाजविले. अफजलखानासारखा मदांध शत्रु प्रतापगडाचे आश्रयानें चीत झाला. संकटाचे ऐन प्रसंगीं शिवाजीला त्याच्या किल्ल्यांनीं अनेक वेळां बचावलें. त्याच्या मुख्य हालचाली किल्ल्यांच्या आश्रयानें झाल्या. त्याचा राज्याभिषेक रायगड किल्ल्यावर झाला, आणि त्याचें देहावसानही रायगडावरच झालें. राज्याच्या उलाढाली करितांना त्याला प्रसंगोपात्त सर्वच प्रकारच्या किल्ल्यांचा उपयोग करावा लागला. तथापि त्याचा मुख्य भर महाराष्ट्रांत इतस्ततः पसरलेले सह्याद्रीचे फांटे आणि त्यांवरील डोंगरी किल्ले यांवरच असल्यामुळें ' डोंगरांतील उंदीर ' हें नांव त्याला यथार्थ शोभतें.

शिवकालीन महाराष्ट्रांतील स्वराज्याचा राजा, राज्य व राजकारण यांचा विविध प्रपंच सह्याद्रीचे आश्रयानें थाटला जावा, हा प्रकार भूतलावर एका अर्थानें अपूर्व होता. शिवाजीचे वैयक्तिक आवडीचा किंवा महाराष्ट्राचे स्वभाववैशिष्ट्याचा हा प्रश्न नव्हता. हा सर्व तत्कालीन परिस्थितीचा खेळ होता. त्या काळीं लोकांचा सर्व अनुभव, सर्व शहाणपणा, सर्व बुद्धिमत्ता परक्यांचे कारणीं लागत होती. अशा वेळीं कोणताही उपक्रम अत्यंत सावधपणें व स्वसंरक्षणाची योग्य काळजी घेऊन करणें जरूर होतें. केव्हां अंगावर बाजू उलटेल व सर्वनाश होईल याचा नियम नव्हता. अखेरीस शत्रूवर निश्चयानें हार देतां येण्याकरितां, हा स्वराज्याचा लपंडाव बिकट पर्वतांचे आश्रयानें खेळण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें.

शिवाजीचें किल्ल्यांचे बाबतींतिल धोरण अत्यंत कुशलतेनें आंखलेलें होतें. जुन्या किल्ल्यांची डागडुजी व नवीन किल्ल्यांची उभारणी यांचेवर तो पाण्यासारखा पैसा खर्च करी. सुरत, राजापूर वगैरे व्यापारी शहरें लुटून आणलेली संपत्ति किंवा कल्याण सारख्या मोगल सुभ्यावर छापा घालून पकडलेला खजीना हा बहुतांशीं शिवाजीचे किल्ले व शिबंदी यांचेवरच खर्च होत असे. किल्ल्यांवर त्याची अत्यंत भिस्त होती आणि ती अनाठायीं नव्हती. अनेक संकटांतून या किल्ल्यांनीं त्याचा बचाव केला. अफजलखानाचें एकच उदाहरण घेतलें तर त्याचे सारख्या बलाढ्य शत्रूशीं उघड्या मैदानावर सामना देणें शिवाजीला अशक्य झालें असतें. पण प्रतापगडाचे आश्रयानें त्याला युक्ति लढवून ती गोष्ट यशस्वी करितां आली.

लढाऊ महत्त्वाचें ठिकाण शोधून काढून त्याचा अचूक उपयोग करण्याची हातोटी शिवाजीला जन्मतःच प्राप्त झालेली होती, असें म्हटलें पाहिजे. महत्त्वाचीं ठिकाणें निवडतांना त्याला आपल्या वडिलांच्या संचारभूमीचें भौगोलिक ज्ञान बरेंच उपयोगी पडलें असावें. तथापि वडिलांची पुणें–सुप्याची जहागीर संभाळतांना हा देशावरील मुलूख मुसलमानांचे हल्ल्यांस सुलभ असल्यामुळें, शिवाजीनें आपली भिस्त प्रथम मुख्यतः भोरजवळच्या तोरणा–राजगडावर व पुढें कोंकणांतील रायगडादींवर संकटकाळचीं आश्रयस्थानें म्हणून ठेवली. सन १६६५ त त्यानें सत्तावीस किल्ले जयसिंगाचे हवालीं केले; त्यावेळीं मावळांतले बारा दुर्गम होते, ते स्वतःकडे ठेवले. रायगडचे वायव्येला तळें घोंसाळ्यांचे जोडीला बिरवाडी व आग्नेयीला पारघांटाचे बंदोबस्ताकरितां प्रतापगड हे किल्ले बांधून, हां हां म्हणतां त्यानें या आपल्या आश्रयस्थानाचें दृढीकरण केलें. त्यानें आपल्या जहागिरीची वाढ पूर्वेकडे न करितां पश्चिमेकडेच प्रथम केली, हें अत्यंत सूचक आहे. सह्याद्रि हा मध्यवर्ति कणा समजून त्याचे दोन्ही अंगांकडील मुलखाकडेच त्यानें विशेष लक्ष दिलें. कुलाबा व पुणें जिल्ह्यांचीं दुर्गम स्थानें हातीं आल्याबरोबर, अफजलखानाचे वधानंतर प्रथम त्यानें सह्याद्रीचे दक्षिण टोंकाकडील म्हणजे हल्लींच्या कोल्हापूरचे राज्याचा प्रदेश जिंकण्याचा उद्योग केला. त्यांतील पन्हाळा, विशाळगड वगैरे किल्ले त्याच्या पद्धतीप्रमाणें परमुलखांत रोंवलेल्या खुंट्याच होत. त्यांचे सभोंवार मुलूख जिंकीत रहाणें व तो स्वाधीन ठेवणें, हें या किल्ल्यांचे बळावर त्याला साधतां येत असे.

किल्ले म्हणजे मुलुखाच्या किल्ल्या होत, अशी शिवाजीची भावना होती. त्याचे मृत्युसमयीं स्वराज्याचा विस्तार एकाद्या दक्षिण हिंदुस्थानचे नकाशांत पडताळून पाहिल्यास या भावनेचें प्रत्यंतर मिळतें. पश्चिमघांटालगतचा लांब पट्टा–स्वराज्याचा

मुख्य कणा—उत्तरेस कल्याणापासून सुरू होतो, तो दक्षिणेस फोंड्याचे सुमारें संपतो. पश्चिमकिनाऱ्यावरील कारवार व अंकोला हे दक्षिणेकडील दोन किल्ले सुवर्णदुर्ग-सिंधुदुर्ग वगैरेंची मालिका पुरी करितात. थेट दक्षिणेस नजर दिली तर कोपळ, बेलारी, वेलोर, आरणी व महत्वाचा जिंजी असे किल्ले व मूळची वडिलोपार्जित जहागीर हीं स्थलें मधून मधून ठिपकेवजा पसरलीं होतीं. हे ठिपके म्हणजे दख्खनभर पसरलेला स्वराज्याचा लांब हातच होत.

ह्या किल्ल्या परचक्रापासून जिंकून घेण्याची शिवाजी शिकस्त करी, त्याचप्रमाणें नव्या नव्या बनवीही. त्याच्या चाणाक्ष पहाणींतून कोणतेंही उपयोगी पडण्यासारखें स्थल निसटून जात नसे. मुंबईचे दक्षिणेचें उंदेरी बेट त्याचे नजरेखालीं आल्याबरोबर त्यानें तेथें स. १६७९ मध्यें तटबंदी करण्यास सुरुवात केली. तेव्हां इंग्रज, पोर्तुगीज व त्याचा जन्माचा हाडवैरी जंजिऱ्याचा सीदी हे सर्व त्याचेवर उठले. युद्धामध्यें याचा जय झाला असेंही नाहीं, परंतु हरप्रयत्न करून त्यानें ह्या बेटाचा ताबा आपल्या हातीं ठेविलाच.

मोरोपंत पेशवे व विसाजीपंत मुजुमदार किल्ल्यांचा हिशेब पाहून खर्च फार होतो, अशी तक्रार करूं लागले; त्यांना शिवाजीनें दिलेलें उत्तर प्रथमतःच उद्धृत केलें आहे, त्यांत त्याचें हृद्गत संपूर्ण उतरलें आहे. पहिल्या वाक्यांत किल्ल्यांचें आर्थिक व राजकीय महत्व, दुसऱ्यांत किल्ल्यांची संख्या व तिसऱ्यांत त्याचा किल्ल्यांवरील विश्वास व राज्यरक्षणाचे कामीं त्यांचा उपयोग वर्णिला आहे. शिवाजीची तीक्ष्ण नजर फिरत असतांना प्रत्येक किल्ला एक एक वर्ष लढण्यास समर्थ असला पाहिजे यांत शंका नाहीं. या उक्तीची सत्यता कसाला लावण्याची पाळी दुर्दैवानें महाराष्ट्रावर आली, त्या वेळीं हे किल्ले थोडेबहुत सत्त्वाला जागले हेंही खरेंच आहे. स. १६८३ पासून १७०७ पर्यंत पावशतकभर प्रत्यक्ष औरंगजेब बादशहा जातीनिशीं आटोकाट प्रयत्न करीत असतां किल्ल्यांमुळेंच राज्याचा बचाव झाला. एवढी एकच कामगिरी शिवाजीच्या दुर्गप्रेमाची यथार्थता पटाविण्यास पुरेशी आहे. " संपूर्ण राज्याचें सार, तें दुर्ग " हें रामचंद्रपंत अमात्यांचें सूत्र अक्षरशः यथार्थ आहे.

**२. किल्ल्यांचे वर्ग.**—किल्ला हा शब्द सामान्य अर्थानें वापरतात. तथापि निरनिराळ्या किल्ल्यांचीं विशेष नांवें योजितांना कांहीं वर्गीकरणाची प्रवृत्ति दिसून येते. बऱ्याच किल्ल्यांचीं नांवें गडान्त आहेत; जसें सिंहगड, कलानिधिगड. कित्येक नांवांचे शेवटीं दुर्ग हा शब्द असतो; जसें—सिंधुदुर्ग, विजयदुर्ग. कांहीं थोड्या नांवांचा दुसरा शब्द कोट असा असतो, जसें—सर्जेकोट, राजकोट, बागलकोट.

शिवाय अशींही कांहीं नांवें आहेत कीं, त्यांमध्यें गड, दुर्ग किंवा कोट असा किल्लावाचक शब्द नसून गांवाचें किंवा स्थलाचें जसें मूळचें नांव असेल तसेंच चालतें. जसें अरनाळा, करनाळा, करंजा, साल्हेर वगैरे. रत्नागिरि, नंदगिरि, मोरगिरि वगैरे मूळचीं डोंगरांचीं नांवें असून, तींच पुढें त्यांवरील किल्ल्यांसही चालूं झालीं.

वर्गीकरणाचे दृष्टीनें विचार केल्यास सामान्यतः गड हा शब्द डोंगरावरील क़िल्ल्यास उपयोजिला जातो असें दिसतें. दुर्गाचा उपयोग बऱ्याच अंशीं पाण्यांतील किल्ल्यांचे नांवांत केलेला असतो, व कोट हा शब्द सपाट भूमीवरील शहरांच्या वगैरे तटबंदींना वापरतात. परंतु क्वचित् या क्रमाचा विपयास झाल्याचीं उदाहरणें आहेत. रामदुर्ग हा भुईकोट आहे व काळदुर्ग हा अर्थात् डोंगरावर वसलेला आहे. अरनाळा कुलाबा हे जंजिरे असूनही यांना दुर्ग नांव वापरलेलें नाहीं. परंतु अशीं नांवें अल्पच आहेत.

डोंगरावरील किल्ल्यांना ' डोंगरी, ' कोटांना ' भुईकोट, ' व दुर्गांना ' जंजिरे ' अशी गुणवाचक परिभाषा ठरलेली आहे. गड शब्दामध्यें चढ़ावाचा अवघडपणा, दुर्ग शब्दामध्यें प्रवेशाची कठिणाई व कोट शब्दामध्यें शहरासभोंवारची तटबंदी यांचा तत्काळ बोध होतो. ह्या विशेष गोष्टी डोंगर, पाणी व सपाट जमीन अशांच्या सोयींवर अवलंबून आहेत. मूळचे यौगिक शब्द अलीकडे रूढ म्हणून वापरले जातात, यांत नवल नाहीं. पैकीं डोंगरी व भुईकोट हे शब्द सरळ अर्थ दर्शवितात. ' जंजिरा ' हें नांव जझीरा ( म्हणजे बेट ) या आरबी शब्दाचा मराठी अपभ्रंश आहे.

हें वर्गीकरण केवळ स्थलावर अवलंबून आहे, बांधणीवर नाहीं. सर्व किल्ले एकाच तत्त्वावर बांधलेले असत. त्या वेळच्या युद्धकलेंत किल्ल्यांचें स्थान निश्चित ठरलेलें होतें. सभोंवार भिंत बांधून आंतील लोकांचें संरक्षण बाहेरच्या शत्रूपासून करणें, हाच या किल्ल्यांचा मुख्य उद्देश असे. समुद्रावर काय, डोंगरावर काय किंवा सपाट भूमीवर काय, सर्वत्र किल्ल्यांची रचना एकच असे. एकादा डोंगरी किल्ला समुद्रांत, किंवा समुद्रांतील दुर्ग सपाट जमिनीवर ठेवून देतां आला असता, तर त्या वेळच्या योद्ध्यांनीं मुळींच तक्रार केली नसती. स्थलपरत्वें त्यांत त्यांनीं कमी अधिक किरकोळ सोई करून घेतल्या असत्या इतकेंच. उदाहरणार्थ,—भुईकोटाचा दरवाजा जमिनीचे सपाटीबरोबर असेल, तर समुद्रांतील लाटांच्या कक्षेवर दुर्गाचा दरवाजा बांधला पाहिजे. भुईकोटांतील पळून जाण्याचें साधन भुयार वगैरे असेल, तर जंजिऱ्याला आडभिंत बांधून, त्यांत होडी वगैरे गुप्त साधनांची तरतूद करून

ठेविली पाहिजे. डोंगरी किल्ल्यांत व इतर किल्ल्यांत वरवर दिसून येणारा फरक म्हटला म्हणजे किल्ल्यांतील सैन्य् व शत्रूचें सैन्य यांच्या संचारांतील फरक होय. डोंगरी किल्ल्यावरील लोक वर उंच असल्यामुळें शत्रूच्या आटोक्याचे बरेच बाहेर असतात. म्हणून शत्रूनें तट पाडण्याकरितां लाविलेल्या सुरुंगाची वगैरे भीति भुई-कोटांपेक्षां त्यांना फार कमी असते.

जंजिरा म्हणजे समुद्रांतील खडकांवर बांधलेला किल्ला होय. याचें बांधकाम इतर दोन वर्गांतील किल्ल्यांप्रमाणेंच बहुतांशीं कोरड्या पायावरच केलेलें असे. यामुळें समुद्रांतील पाण्यांत पाया खोदण्याचा वगैरे अवघड बांधकामाचा प्रश्न त्यावेळीं उद्भूत झाला नाहीं. खडकावर वरील दगडाचें बांधकाम कसें ठरेल इतकाच प्रश्न त्यांना सोडवावयाचा होता. सिंधुदुर्ग ( मालवण ) बांधतांना कित्येक खंडी शिशाचा उपयोग या कामाकडे केल्याचा उल्लेख आहे. खडक उंच नसल्यास पाण्यामुळें किल्ल्यांना त्रास सोसावा लागेच. विजयदुर्गाचे पश्चिमेच्या तटाचें व इतर किल्ल्यांचेंही समुद्राचे लाटांमुळें बरेंच नुकसान झालेलें दिसून येतें.

प्रबळ शत्रूच्या आटोक्याबाहेर रहाणें व त्याच्या माऱ्यापासून आपला बचाव करणें, असें किल्ल्यांचें मुख्यत्वेंकरून संरक्षक धोरण दिसून येतें. अप्रत्यक्षपणें मात्र शत्रूवर चढाई करण्यासाठींही किल्ल्यांचा उपयोग होई. एकाद्या शत्रूवर चढाई करून जावयाचें तर त्याचे मुलुखांत घुसण्याचें व त्याचेवर लगट करण्याचें धोरण स्वीकारलें पाहिजे. अशा वेळीं आपलें सामर्थ्य पुरें न पडल्यास परत किल्ल्याचा आश्रय करून शत्रूचे आटोक्याचे पलीकडे सुरक्षित परत येतां येतें. किल्ल्यामध्यें धान्यसामुग्री वगैरेंचा पुरवठा करून ठेवून युद्धप्रसंगीं त्याची मदत घेतां येते. अर्थात् हातांतील ठिकाण शत्रूला दुर्गम होईल असें बनवावयाचें, हाच किल्ला बांधण्याचा मुख्य हेतु होय. एकादा किल्ला ताब्यांत असला म्हणजे त्याचे आसपासही सांग्रामिक कारवाई निर्धास्तपणें करितां येते. किल्ल्याखालील मुलूख किल्लेदाराचे अमलाखालीं राहूं शकतो. किल्ल्याचे आधारावर बाहेर सभोंवार संचार करितां येतो आणि संकटाची वेळ आली तर प्रबळ शत्रूपासून बचाव करण्याचें साधन पाठीमागें तयार असतें. शत्रूचे वेगापेक्षां आपला किल्ल्याकडे कूच करण्याचा वेग थोडा अधिक असला म्हणजे काम भागतें.

परंतु शत्रु पुरा धूर्त व समर्थ असला तर तो तसाच वेढा देऊन पडून राहतो. त्याला अन्नपाणी बाहेरून मिळत असतें. किल्ल्यांतील लोकांना अर्थात् बाहेरून कांहीं मिळण्याचा संभव नसतो. त्यांना अशा प्रसंगीं उपयोगी पडण्याकरितां भरपूर अन्न-

सामुग्री आणि पुरेसें पाणी याचा सांठा किल्ल्यावर बाळगणें जरूर पडतें. धान्य-सामुग्री किल्ल्यांवरच निर्माण करितां येईल इतकी किल्ल्यावर विस्तृत व सुपीक जमीन असेल, तर धान्याबद्दल विशेष काळजी करावयास लागत नाहीं. परंतु तसें नसेल तर आसपासचे मुलखांतून त्याचा संग्रह अगाऊच करून ठेविला पाहिजे. पाण्याचा मात्र तसा संग्रह करून ठेवणें अशक्य आहे. करितां प्रत्येक किल्ल्यावर पिण्याचे पाण्याची उत्तम सोय असणें, ही गोष्ट किल्लेकऱ्यांचें स्वास्थ्य व सुख या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची होती.

**३ किल्ल्यांची दुर्गमता.**—किल्ल्यांवर सामान्यतः कोणती कामगिरी पडे याचा विचार केल्यास साहजिकपणें किल्ला ( १ ) शत्रुवर्गाला दुर्गम असला पाहिजे; ( २ ) त्यावर रहाणाऱ्या माणसांना वेढ्याचे प्रसंगीं पुष्कळ दिवस पुरेल अशी धान्य-सामुग्री असली पाहिजे; ( ३ ) आणि उत्तम नैसर्गिक पाणी किल्ल्यावर असलें पाहिजे, या गोष्टी प्रामुख्यानें पुढें उभ्या रहातात. यांचा आतां क्रमशः विचार करूं.

दुर्गमता.—स्थान आपल्या हातांत असल्यानंतर प्रबळ परचक्राविरुद्धही रक्षण सुलभ जावें, असा दुर्गमतेचा अर्थ केला पाहिजे. म्हणजे ( १ ) प्रवेशद्वारें शक्य तितकीं कमी ठेवणें; ( २ ) जीं ठेवावयाचीं तीं शक्य तितकीं अरुंद व सहज अडवून धरतां येतील, अशीं अडचणीचीं ठेवणें; ( ३ ) आणि अशा प्रवेशद्वारांतून प्रवेश करणाऱ्यावर सहज मारा करितां येईल अशीं गुप्त, उघड व मजबूत स्थानें तयार करणें, या गोष्टी साध्य झाल्या पाहिजेत. ( ४ ) ह्यांशिवाय परचक्रानें वेढा घालून उघड द्वारें बंद झाल्यानंतर बाह्य जगाशीं आपला व्यवहार सुरक्षित चालावा म्हणून गुप्त भुयारें वगैरे ठेवणें ही एक अत्यंत आवश्यक गोष्ट होती.

सभोंवार तट बांधून घेतला म्हणजे दारांची संख्या व त्यांची रुंदी वगैरेंची योजना आपल्या मनासारखी आपल्याला करितां येते, असें पाहून याच युक्तीचा अवलंब अनेक शतकांपासून होत आला आहे. डोंगराचा आश्रय केला म्हणजे उंच भिंतींचें काम डोंगरांचे स्वाभाविक चढानें भागतें. मूळापासून उंच भिंती चढविण्याच जगड्व्याळ काम करण्या ऐवजीं उभा डोंगर अवघड नसल्यास सुरुंग लावून, खणून किंवा अन्य उपायांनीं तासून तोडून योग्य बनविण्याचें काम किती तरी सुलभतेनें करितां येतें. महाराष्ट्रांतील सह्याद्रिवरचे कित्येक डोंगर तर मुद्दाम सोईनें निर्माण केलेले किल्लेच आहेत कीं काय असा भास होतो. सातारा किंवा त्या बाजूचे डोंगर उभा कडा तुटलेले असे दिसतात. सह्याद्रीचे वरील भुसभुशीत भाग हजारों वर्षे उष्णता, वारा व पाऊस यांचे आघातानें धुपून जाऊन खडक मोकळे झाले, त्यांची

उंची संरक्षणास पुरेशी न वाटल्यास त्यांजवर आणखी उंच तट बांधला म्हणजे काम भागे. सह्याद्रीचा काळा फत्तर मूळच्या पाषाणरसाचा बनलेला आहे. या कारणास्तव डोंगरावर बांधावयाच्या भिंतींना कणखर पाया तेव्हांच सांपडतो. बांधकाम करावयाला लागणारा दगड थोड्याशा परिश्रमानें किल्ल्यावरच मिळूं शकतो व डोंगरी किल्ले बांधणें जितकें अधिक सुलभ तितके ते अधिक दुर्गम असें ठरतें. मात्र स्वतःला किल्ल्याची चढउतार करण्याची पुष्कळ खटपट पडते, ती पूर्वीचे मराठ्यांना खपत असे.

सभोंवतालचा कडा उभा तोडून काढला म्हणजे एकादें अरुंद व वळणावळणाचें दार किल्ल्यावर चढावयास सहज राखतां येतें. उंच डोंगर तरी वांकणांवांकणांनींच चढावा लागतो; त्यांतून मुद्दाम तयार केलेल्या व बनविलेल्या किल्ल्याची गोष्टच बोलावयास नको. ही अरुंद वाट जसजशी चढत असते, तसतशी निवाऱ्याची व सोईची जागा पाहून मधून दरवाजे बांधून त्या वाटेनें येणाऱ्या सैन्याचा मार्ग अटकावण्याची सिद्धता करितां येते. हे दरवाजे म्हणजे खरीं प्रवेशद्वारें नसून प्रवेश विरोधक बुरूज किंवा शत्रूला थोपवून धरण्याची तटबंदी असते. बहुधा या दरवाज्यांजवळ रस्ता एकदम एक किंवा दोन वळणें घेतो. तेथें दोन्ही बाजूंला उंच बुरूज बांधून मागच्या रस्त्याची चढण, चढणाराचे नजरेआड केलेली असते, व त्याच बुरुजांवरून मारा करून शत्रूला कापून काढण्याची सोय असते. या बुरुजांचें दारांतून थेट दरवाज्यापर्यंत शत्रु आलाच तर तेथें अधिक शिबंदी असते. शिवाय, दरवाजा साफ बंद करून मध्यें अडथळा उत्पन्न केला जातो. तो दरवाजा भक्कम असतो एवढेंच नव्हे तर थेट त्याचेवर कांहीं साधनें चालवितां येऊं नयेत म्हणून लोखंडी सुळके बाहेर बसवलेले असतात. असे दरवाजे व बुरूज सपाट जमिनीवर बांधणें अशक्य नाहीं. परंतु हा नैसर्गिक चढाचा दुर्गमपणा व सहजसाध्य होणारा अरुंदपणा पुष्कळ अंतरपर्यंत लांबवर विनाखर्चानें डोंगरावर शक्य होतो तसा सपाट जमिनीवर होत नाहीं. भुईकोटाचे तट सुरुंगांनीं उडविणें शक्य आहे. परंतु या काळ्या फत्तराचे डोंगरी गाभ्याला सुरुंग लावण्याचें काम सोपें नाहीं. आणि सुरुंग तरी सर्व डोंगर फोडील इतका जोरानें उडेल तेव्हांच वरच्या तटांना धक्का लागणार!

निसर्गदत्त दुर्गमतेला बुरुजांनीं वगैरे मजबुदी आणण्याचा हा एक मार्ग झाला. त्याशिवाय अति दुर्गमतेच्या सिद्धीकरितां नाना तऱ्हेच्या युक्त्या अमलांत आणितां येतात. ठाणें जिल्ह्यांतील बहिरवगडास उभ्या सुळक्या सारख्या खडकांत पायऱ्या

करून मार्ग ठेविला आहे. वरून दोर सोडल्याशिवाय अर्थातच या मार्गानें कोणालाही वर जातां येत नाहीं. आपले लोक वर आल्यावर हा दोर आंत ओढून घेतला कीं काम झालें. हल्लीं दगडी कोळशांचे खाणींतून उतरण्यास विहीर असते, किंवा मोठ्या घरास यांत्रिक पाळण्याची (Lift) सोय असते, तशा धर्तीवर कित्येक किल्ल्यांचे पायथ्यापासून उघडणारी विहीर किंवा उभा बोगदा ठेवलेला असतो. प्रचितगडासारख्या किल्ल्यावर वरून खालीं शिडी सोडल्याशिवाय वर चढतांच येत नसे. दौलताबादचे बालेकिल्ल्यावर जाण्याचा रस्ता बोगद्यांतूनच जातो, हें बरेच जणांनीं पाहिलें असेल. असे मार्ग मोठ्या किल्ल्यांवर कधींच उपयोगी नव्हते, लहान टेंकड्या दुर्गम करण्यास मात्र त्यांचा उपयोग होत असे.

डोंगरी किल्ल्यांचे योगानें राज्याचें सर्व काम भागविणें शक्य होत नाहीं. आणीबाणीचे प्रसंगीं रायगडावर राजधानी होती; परंतु थोडी स्थिरस्थावर झाल्यानंतर सातारा व नंतर पुणें हीं मैदानी शहरेंच महत्त्वाला चढलीं, याचें कारण उघड आहे. सातान्या सारख्या ठिकाणीं व दौलताबादलाही जवळच्या डोंगरांचा उपयोग करावा लागला. अशांचाही बंदोबस्त करणें जरूर पडतें. हजारों लहान मोठीं गांवें कमी अधिक प्रमाणांत दगडांच्या व चिखलाच्या भिंतींनीं वेढिलेलीं दिसतात. तोफांचा काळ नव्हता त्या वेळीं यांचा उपयोग चांगलाच होत असे. डोंगरांचे उंचीनें तटबंदीपासून शत्रूला लांब राखण्यास मदत होत असे. तशा प्रकारचें कार्य या भुईकोटाचे बाबतींत तटापासून बारा पंधरा यार्डांचा खंदक बांधून करण्यांत येत असे. अशा खंदकांतून पाणी सोडलेलें असे. पाण्यांतून किंवा इतक्या अंतराचे पलीकडून भिंतीचा नाश करण्याकरितां सुरुंग लावणें अर्थातच अशक्य होतें. शिवाय खोल खंदकामुळें अगदीं भिंतीशीं लगट करणें शत्रूला केव्हांही जमत नसे.

भुईकोट किल्ला खंदकासह उचलून समुद्रांत खडकावर नेऊन बसवला कीं जंजिरा झाला; मात्र कृत्रिम खंदकाचे ऐवजीं सभोंवतीं नैसर्गिक पाण्याचा वेढा, एवढाच फरक. कृत्रिम खंदकाची रुंदी व खोली परिमित असे. उलट जंजिऱ्याचा खंदक निसर्गानें बनविला असल्यामुळें त्यांत शत्रूला जाचणारा अनिश्चितपणा फार असे. ओहोटीचे किंवा भरतीचे वेळीं पाण्याखालील खडकांतून होडी सुरक्षित किल्ल्याला लागेल असा एकादाच मार्ग असे. समुद्राच्या लाटा आदळत असतां त्यांतून होडी तटापावेतों आणण्याचीं ठिकाणें गुप्तपणें राखून ठेवलेलीं असत. तीं शत्रूला सहज कळणें शक्य नसे. किनाऱ्याचे रक्षणाकरितां असे जागोजागीं किल्ले बांधणें आवश्यक होतें. आणि तेवढें काम जयगड, पूर्णगड, देवगड सारख्या डोंगरी किल्ल्यांनींही

भागण्यासारखें होतें. परंतु किनारा ताब्यांत असतांना शत्रूंचे हातीं खांदेरी, कुलाबा, सिंधुदुर्ग अशांसारखे जलावृत खडक लागून, त्यांचे बळावर त्यांनीं किनाऱ्यावर मारा लागूं करूं नये, म्हणून या सर्व समुद्रांतील खडकांचा ताबा कोंकणपट्टीचे मालकाचे हातांत असावयास पाहिजे. तशांतून सिंधुदुर्ग व जंजिरा अशांसारखीं ठाणीं खाड्यांच्या तोंडाशीं असल्यामुळें खाड्यांचा निर्वेध ताबा राहून आंत आरमाराच्या हालचाली सुरक्षित व्हाव्या व शत्रूचा प्रवेश होऊं नये म्हणून हे पहारेकरी खाडीच्या तोंडाशीं सज्ज ठेवणें जरूर होतें. एकंदरींत थेट किनाऱ्यापर्यंतही जयगड सारखे डोंगराचे फांटे पुरवून महाराष्ट्रांतील किल्ल्यांचें काम किती तरी सुलभ झालें आहे.

येथपावेतों किल्ल्यांचा पाया व आकार यांचें अनुरोधानें त्यांचे दुर्गमतेचा विचार झाला. स्थलभिन्नत्वामुळें प्रत्येक वर्गाचे किल्ल्यांत ही दुर्गमता कशी साधली आहे तें सांगितलें. या मुद्याचा इतका विस्तार करण्याचें कारण असें, कीं सर्व सोईंपैकीं याच गोष्टीचा मराठशाहींत प्रामुख्यानें विचार होत असे. आज किल्ला म्हणून मानल्या जाणाऱ्या पूर्वीच्या टेंकड्या तपासून पाहिल्या तर असें आढळेल कीं, कित्येकांवर पाव एकरही पाठार नाहीं. म्हणजे वर राहण्याची सोय अर्थात्च नव्हती, व होणें शक्यही नाहीं. परंतु वेळीं कांहीं काळ संरक्षणाला आधार व परचक्राचे मार्ग रोखण्याचें साधन असा या टेंकड्यांचा उपयोग होत असे इतकेंच. कित्येक महत्त्वाचे किल्ले प्रसंगीं वर्ष वर्ष लढावे अशा इराद्यानें शिवाजीनें बनविले होते. अशांवर अर्थात्च धान्याचीं कोठारें, रहावयास निवाऱ्याचीं घरें, पिण्याच्या सोईचें उत्तम पाणी व थोडीबहुत शेती, एवढ्या गोष्टी अवश्य साधिलेल्या होत्या. पाण्याचे बाबतींत डोंगरांची निवड अत्यंत कसोटीनें केलेली आढळते. कित्येक वेळां त्या डोंगरांचे पायथ्याशीं व आसपासचे टापूंत पाण्याचा थेंब नसतो; परंतु गडावर मात्र मधुर, गार व मुबलक पाणी जिवंत झऱ्याचें असतें. हें पाणी तेथें खोल विहिरींतून काढावें लागतें, अशांतलाही भाग नाहीं. सहज लहान मुलाचेही हातास येईल अशीं पुरेपुर भरलेलीं स्वच्छोदकाचीं टांकीं वर आढळतात. समुद्रांतील खडकांचे किल्ल्यांतूनही ही पाण्याची योजना केलेली पाहून मोठें आश्चर्य वाटतें. शिवाजीनें या बाबतींत पुष्कळ काळजी घेतल्याचें उघड दिसून येतें. भरतगड म्हणून रत्नागिरी जिल्ह्यांत एक टेंकडी आहे. तिजवर पाणी न सांपडल्यामुळें शिवाजीनें तो किल्ला बांधण्याचें रद्द केलें, असा उल्लेख आहे.

**४ किल्ल्यांचे तट व बांधणी**—किल्ल्यांच्या तटांबद्दलही एक दोन गोष्टी येथें नमूद केल्या पाहिजेत. कित्येक किल्ल्यांना तटबंदी मुळींच नव्हती, याबद्दल

किल्ल्यांचें मुख्य प्रयोजन लक्षांत घेतल्यास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. सुप्रसिद्ध रायगड किल्ल्याला दरवाजांचे शिवाय अन्यत्र तटबंदीचें काम नाहींच म्हटलें तरी चालेल. नाशिक जिल्ह्यांतील अंजनेरीची गोष्ट अशीच आहे. डोंगराच्या सर्वच बाजू एकसारख्या दुर्गम असल्या म्हणजे मग तटांचें कारणच काय ? घोरपडीनें वगैरे येण्यासारखा एकादा मार्ग आढळल्यास सुरुंगानें किंवा अन्य मार्गांनीं तो तोडला म्हणजे झालें. प्रत्यक्ष रायगडाचे बाबतींत शिवाजीनें बक्षीस लावून किल्ल्याची दुर्गमता पारखून पाहिली, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. जेथें तटबंदी असे, तेथील भिंती बऱ्याच जाड म्हणजे रुंद असत. सहा ते बारा फुटांपेक्षांही या भिंती रुंद असत. तोफांचा परिणाम होऊं नये म्हणून ही जाडी धरली असें वाटण्याचा संभव आहे, परंतु वस्तुस्थिती तशी नाहीं. कारण ते किल्ले बांधले गेले तेव्हां युद्धकलेंत तोफांचा इतका चांगला उपयोग होत नसे. तटाच्या रुंदीचीं एक दोन कारणें उघड दिसतात तीं अशीं कीं, एकतर काम भक्कम व चिरस्थायी करावें ही आपल्या पूर्वजांची नित्याची भावना असे. आजही जुन्या बांधणीचीं घरें पाहिलीं तर त्यांच्या भिंती, तुळया वगैरे आपल्याला आजच्या कल्पनांप्रमाणें वाजवीपेक्षां फाजील बोजड असल्याचें दिसून येतें. मग किल्ले बांधतांना या भावनेचा अंमल किती असेल तो पहावा. शिवाय किल्ल्यांचे तटांवरून शत्रूच्या गडाखालील हालचाली स्पष्ट दिसाव्या म्हणून भिंतीवरून फिरण्याची सोय ठेवणें जरूर होतें. कित्येक वेळां भिंतीचे वरील रुंदीवरून खालील लोकांवर मारा करण्याकरितां पवित्र्यांत बसण्याची वगैरे सोय अत्यंत आवश्यक होती; ती या भिंतीच्या रुंदीमुळें साधत असे.

महाराष्ट्रांतील सर्व किल्ले एकाच वेळीं बांधले गेले नाहींत. इ. स. चे १० व ११ वे शतकांत कोल्हापूर प्रांतांत शिलाहार राजांची राजधानी होती. त्यांचा अंमल त्या बाजूचे बऱ्याच मुलुखावर होता. ठाणें जिल्ह्यांतील अशेरी, साताऱ्यांतील वांसोटा व बावडा, पन्हाळा वगैरे किल्लें त्यांनीं बांधले असें म्हणतात. देवगिरीचे यादव महाराष्ट्रावर तेरावे शतकांत राज्य करीत होते; त्यांना राज्याच्या बंदोबस्ताकरितां शिवाजीचे पूर्वीं अनेक किल्ले बांधावे लागले. त्यानंतर बहामनी व निजामशाही व आदिलशाही वगैरे मुसलमानी राजांनींही पूर्वींच्या कित्येक हिंदु किल्ल्यांची डागडुजी करून कित्येकांचीं नांवें बदललीं आणि कांहीं स्वतंत्र किल्लेही बांधले, असे उल्लेख आहेत. उत्तर कोंकणचे किनाऱ्यावर अरनाळा, ठाणें जिल्ह्यांत माहुली, सातारा जिल्ह्यांत चंदनवंदन, नगर जिल्ह्यांत औंढा-पट्टा, पलीकडे बेळगांव जिल्ह्यांत गोकाक वगैरे व वर उल्लेखिलेले सर्व किल्ले दक्षिणेंत तोफांचा प्रसार होण्यापूर्वींचे आहेत. म्हणजे त्यांचे तट तोफांच्या भीतीनें मुद्दाम जाड ठेवले असें म्हणतां येत नाहीं.

तोफांच्या भीतीनें किल्ल्यांच्या बांधणींत फरक झाला नसला, तरी निरनिराळ्या अंमदानींचा थोडा बहुत फरक त्या बांधणींत सहज दृष्टीस पडतो. दगडांच्या रचनाशास्त्राच्या इतिहासावरूनही हा फरक लक्षांत येण्यासारखा आहे. सुमारें तेरावे किंवा चौदावे शतकाचे पूर्वीं चुन्यानें दगड जोडण्याचा प्रसार विशेष झाला नव्हता. म्हणजे त्यापूर्वीं रचलेले किल्ले चुन्याशिवाय बांधले असले पाहिजेत हें उघड आहे. मुसलमानी अंमलापूर्वींचे किल्ले भले भक्कम १०।१२ फूट चौरस असे दगड एकमेकांवर रचून बांधीत. शिवाजीनेंही ही प्राचीन पद्धत थोडी बहुत स्वीकारली. पुढें मुसलमानी अमलांत चुन्याचा उपयोग सर्वत्र होऊं लागला; तेव्हांपासून पूर्वींची बांधणी बदलली. चुन्याच्या उपयोगानें सुंदर व कुशल रचना करितां येते. मुसलमानी बांधणी बऱ्याच अंशीं चुन्याची आहे. शिवकालीन बांधणीही बहुतेक चुन्यांची आहे. बांधणीच्या व जडावाच्या सुबकपणांत चुन्याच्या योगानें मोठाच फरक झाला. मुसलमानी कारागीर याकामीं सुंदर घडीव दगड वापरतात. बुरुजांना माथ्यावर कंगोरेदार मुकुट थोडा पुढें आलेला असा चढवितात. त्यांच्या वरच्या भागाला तोफांबंदुकांकरितां उभ्या खांचामध्यें पडद्याची जीभ असते. हीच व्यवस्था पुढें मराठ्यांनीं स्वीकारिली. मराठ्यांची बांधणी ओबडधोबड असून त्यांत घडीव दगड क्वचितच वापरलेले असत. मराठ्यांचें लक्ष सौंदर्यापेक्षां उपयोगाकडे जास्त होतें. विजयदुर्गाच्या बांधणीकरितां शिवाजीनें मुद्दाम गोवेकराकडून कारागीर मागविला होता. गोवेकर या बाबतींत चांगले कुशल असून महाराष्ट्रांतील किल्ल्यांची बांधणी करणाऱ्या सत्ताधीशांत कोंकण किनाऱ्यावर किल्ले बांधणाऱ्या या पोर्तुगीज सत्तेचाही उल्लेख केला पाहिजे.

**५. शिवाजीनें केलेले फरक.**—एकंदर किल्ल्यांपैकीं कोणी, केव्हां व किती किल्ले बांधले, हें सांगणें सुलभ नाहीं. परंतु शिवाजीनें किती किल्ले बांधले याचा तपास सामान्यपणें लावतां येतो. शिवाजीचे पूर्वींच पुष्कळसे किल्ले बांधले गेले होते हें निर्विवाद आहे. सुप्रसिद्ध पन्हाळा, रांगणा, बावडा, विशाळगड, तोरगड हे कोल्हापुराकडील; नरगुंद, बहादुरगड, नगर हे देशावरील; साल्हेर—मुल्हेर वगैरे नाशिक जिल्ह्यांतील; चाकण, सिंहगड, पुरंदर, राजमाची हे पुणें जिल्ह्यांतील; खुद्द रायगड व घोंसाळें, तळें हे कुलाबा जिल्ह्यांतील; साताऱ्यांतील वांसोटा, चंदनवंदन, सज्जनगड व कोंकणांतील अरनाळा, करनाळा, माहुली असे सहज लक्षांत येणारे अनेक किल्ले शिवपूर्वकालांत निर्माण झाले, असें स्पष्ट दिसतें. सभासदानें २४० किल्ल्यांची नांवनिशी देऊन त्यांपैकीं ५० मूळचे, १११ शिवाजीनें नवीन बांधिलेले व ७९ कर्नाटकांतले अशी वर्गवारी केली आहे. चिटणीस हीच यादी ३१७ ची देतो.

शिवाजीनें बरेच किल्ले जिंकून घेतले व त्यांची डागडुजी केली यांत शंका नाहीं. अनेक किल्ल्यांचीं मुसलमानी नांवें बदलून अत्यंत सुंदर अशीं संस्कृत नांवें त्यानें दिलीं, हेंही सिद्ध आहे. अवचितगड, उचितगड, गुणवंतगड, धनगड, पद्मगड, प्रचंडगड, प्रतापगड, प्रसिद्धगड, भूधरगड, भूषणगड, महिमंडनगड, सज्जनगड, संतोषगड, हीं सुंदर नांवें राजव्यवहारकोशाची कल्पना काढणाऱ्याचे बुद्धीचें द्योतक होय. शिवाजीनें स्वतः बांधलेल्या नवीन किल्ल्यांत सुप्रसिद्ध प्रतापगड, रायगडाजवळ बिरवाडी, साताऱ्यांतील भूषणगड, मकरंदगड, संतोषगड, कुलाब्यांत लिंगाणा, विजापुरांत गजेंद्रगड, किनाऱ्यावर उंदेरी वगैरेंचा उल्लेख पुढील यादींत सांपडेल. परंतु एकंदरींत ही संख्या फारशी मोठी दिसत नाहीं. खरें म्हटलें तर बिकट परिस्थितीशीं झगडतांना सह्याद्रीच्या प्रत्येक टेंकडीला शिवाजीच्या वेळीं महत्त्व आलें. आणि महाराष्ट्राचें अंतःकरण स्वराज्याच्या वातावरणांत विहरत असतांना अनेक टेंकड्यांना गड हें गौरवाचें नांव प्राप्त झालें. असे कित्येक पाव एकर, अर्धा एकर पठाराचे गड मोठ्या गंभीरतेनें उल्लेखिलेले आढळतात, हें पुढील यादीवरून दिसून येईल. महिपालगडाचे सदरांत कथारीगडाचा उल्लेख पहावा. हा कथारीगड म्हणजे एक लहान टेंकडी आहे. सारांश, शिवाजी आणि गड यांचे संबंध वर वर्णन केले, त्यांवरून बऱ्याच—केवळ डागडुजी केलेल्या, जिंकलेल्या, नांव बदललेल्या, किंवा फक्त गौरविलेल्या—किल्ल्यांचें जनकत्व महाराष्ट्राचे भावनेनें शिवाजीला दिलें, असें उघड दिसतें.

शिवाजीनें थोडेच किल्ले बांधले याला आणखीही प्रमाणें आहेत. कोल्हापूरचे शिलाहार, व बेदर, अहमदनगर, विजापूर व इतर ठिकाणचे शिवपूर्वकालीन राजे यांनीं आपल्या काळांत बहुतेक सर्व महत्त्वाच्या ठाण्यांना तटबंदी केली असल्यामुळें नवे महत्त्वाचे किल्ले बांधण्यास शिवाजीस फारसा अवसरच राहिला नव्हता. या राजसत्तांनीं राजधानीपासून दूर अंतरावरही पुष्कळ बंदोबस्त केला होता. शिवकालीन पुणें—रायगड टापू मराठी सत्तेचें केंद्र बनला. त्याचें महत्व पूर्व सत्तांनाही पटलें होतें. रायगड, तळें, घोसाळें, चाकण, सिंहगड, पुरंदर हे महत्त्वाचे किल्ले शिवपूर्वकालाचे होते. बिरवाडी किंवा प्रतापगड यांसारखे नवीन किल्ले बांधून राज्याची बळकटी करण्याला शिवाजीला कितींही अवसर असला तरी तो फार अल्प होता.

किल्ले बांधण्याचा मोठा कार्यक्रम हातीं घेण्याला आवश्यक असलेली स्वस्थता व विपुल द्रव्य हीं साधनें शिवाजीला पूर्णपणें लाभल्याचें दिसत नाहीं. स. १६४६ मध्यें तोरणा घेतल्यापासून तों स. १६५९ त अफजलखान वधापर्यंतच काय तें अशा

बांधणीचें काम त्याला थोडें बहुत करितां आलें. अगदीं सुरवातीला स. १६४८ चे दरम्यान त्यानें लिंगाणा, बिरवाडी हे कुलाब्यांतील किल्ले बांधले. त्यापुढें विजापूरकरांचा शहाजीवर रोष झाल्यामुळें तो नजर कैदेंत असेपर्यंत शिवाजीला कांहींच करितां आलें नाहीं. चंद्रराव मोऱ्याचें पारिपत्य करून त्याची संपत्ति हातीं येतांच स. १६५६ चे सुमारास पारघाटावर प्रतापगड, त्याचेच खालीं साताऱ्यांत मकरंदगड वगैरे जावळीचे दृढीकरणार्थ किल्ले बांधणीचा दुसरा मोठा हप्ता त्यानें हातांत घेतलेला दिसतो. त्यानंतर स. १६५९ पासून त्याजवर मुसलमानी हल्ल्यांची सारखी सरबत्ती चालूं झाल्यामुळें किरकोळ डागडुजी पलीकडे मोठ्या महत्त्वाच्या कामास त्यास फुरसत झालेली दिसत नाहीं.

राजधानीपासून जवळच जंजिऱ्याचा सीदी हा शत्रु शिवाजीला अस्तनींतल्या निखाऱ्याप्रमाणें होता. आरमारी विभाग बळकट करण्याची जरूरी त्याला वाटण्याचें अंशतः तरी कारण या सीदीचे धोक्याचेंच होय. या संबंधांत स. १६६५ चे सुमारास मालवण-सिंधुदुर्ग बांधून शिवाजीनें विजयदुर्ग वगैरेची डागडुजी केली, हें महशूर आहेच. स. १६७९ तील उंदेरीवरील तटबंदी ही शिवाजीच्या दुर्गमंडणाचे कार्यक्रमापैकीं अगदीं शेवटची बाब दिसते.

**६. मराठी बांधणीचे विशेष.**—किल्ल्यांच्या रचनेचीं सामान्य तत्त्वें, निरनिराळे किल्ले बांधले गेल्याचा काळ व त्या संबंधांत शिवाजीनें बांधलेल्या किल्ल्यांची संख्या, यांचें येथपर्यंत विवेचन केलें. आतां ही बाब नजरेआड करून आज जें किल्ल्यांचें स्वरूप दिसत आहे त्यावरून दुर्ग निर्मितिशास्त्रांतील कांहीं महाराष्ट्रीय विशेष दृष्टीस पडतात कीं काय तें पाहूं.

( १ ) डोंगरी किल्ल्यांचे दारासमोर सपाट जागा असल्यास तेथें खंदक खणून शत्रु एकदम तटाजवळ येऊं नये अशी तजवीज करीत. शिवाय मुख्य तटाचे पायथ्याशीं दुसरा एक तट उभारून मुख्य तटाचें रक्षण करीत. ( अमात्यकृत राज नीति. पृ. ३३ )

( २ ) किल्ल्याचें पठार मोठें असलें, आणि मुख्य चढ संपल्यावर एकावर एक अशा छोट्या चढांनीं डोंगर उंच जात असला, तर बाहेर पडकोट बांधून प्रत्येक छोट्या चढावाची पूर्तता करीत. अशा रीतीनें किल्ल्यांत किल्ला अशा कधीं कधीं तीनचार पट्टरांगा होत. किल्ल्याचा एकादा भाग पायथ्यापासून फुटून बाजूला गेला असला व तो संबंध समूळ तोडून काढणें शक्य नसलें, तर त्याचे टोंकावर बुरूज बांधून

त्यापासून किल्ल्याचे तटापर्यंत उंच भिंती बांधून तो मुख्य किल्ल्याला जोडून घेत. अथेन्स व अथेन्सचें बंदर पायरीअस अशींच जोडलेलीं होती. लोहगड पाहिला असेल त्यांना विंचूकाट्याची परिस्थिति लक्षांत येईल.

( ३ ) कित्येक वेळां डोंगरांचीं जोड शिखरें अगदीं जवळ जवळ असत. त्यांपैकीं एकाची तटबंदी करून दुसरें मोकळें सोडल्यास शत्रूला त्याचा उपयोग होण्याचा संभव राहतो म्हणून बहुधा दोन्ही शिखरांवर गड बांधून एका अंमलांत ठेवण्याचा यत्न करीत. उ. औंढा—पट्टा, अलंग—कुलंग, चंदन—वंदन, लोहगड—विसापूर अशा जोड किल्ल्यांचें एकमेकांस पाठबळ मिळे व वेढा घालणाऱ्या शत्रूला वेढ्याची कक्षा फार वाढवावी लागल्यामुळें त्याचे सैन्याचा पसारा वाढून तें विरळ झाल्यानें कमजोर होई.

( ४ ) एकादे ठिकाणीं पायथ्याचें पठार एकच असून पुढें दोन स्वतंत्र किल्ले होतील इतकीं जरी नाहींत, तरी निराळीं अशीं अनेक शिखरें असतात. त्यांना स्वतंत्र तटबंदी करून दोघांनाही सामान्य असा पायथ्यासभोंवार एक तट अथवा पडकोट बांधतात. म्हणजे हे दोन किंवा अधिक स्वतंत्र बाले किल्लेच बनतात. माऱ्याचे दृष्टीनें आणि रक्षणाचेही दृष्टीनें किल्ल्यांचें बळ या परिस्थितीनें वाढतें. उ. राजमाची व पन्हाळा. जिंजीची रचना अशीच आहे. रोम प्रथम बांधलें त्यांत सात टेंकड्यांचा समावेश केलेला होता, हें सुप्रसिद्धच आहे.

( ५ ) एका डोंगराचे रांगेंत जेवढीं शिखरें असतील, तेवढीं सगळीं एकाच सत्तेचे हातांत असणें जरूर असतें म्हणून सर्वच शिखरांची रांगेनें तटबंदी करितात. सह्याद्रीचा मुख्य कणा—दक्षिणोत्तर रांग—अत्यंत उंच व महत्त्वाच्या किल्ल्यांनीं भरलेली आहे. उत्तरेकडे त्रिंबकपासून तों मध्यभागीं राजमाची, रायगड, प्रतापगड, महिपतगड, विशालगड, गगनबावडा व तेथून पुढें थेट रांगणा, मनोहरगडापर्यंत ही मुख्य रांग झाली. त्याशिवाय या मुख्य कण्यापासून अनेक रांगा पूर्वेकडे देशावर व पश्चिमेकडे कोंकणांत पसरल्या आहेत. त्यांच्याही सर्व शिखरांचा उपयोग केलेला दिसतो. कोंकणपट्टींतील रांगा बहुतेक समांतर अशा आहेत. पण देशावरील रांगा त्याचे उलट म्हणजे खोडापासून फांद्या फुटल्यासारख्या आहेत. यामुळें किल्ल्यांची रचनाही निराळ्या स्वरूपाची झाली आहे. मुख्य सह्याद्रीचे पलीकडे कोंकणपट्टींत किल्ल्यांच्या तीन रांगा दिसतात. एक अगदीं समुद्रांतील जंजिऱ्यांची—अरनाळा, खांदेरी, उंदेरी, कुलाबा, जंजिरा, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, सिंधुदुर्ग वगैरे; दुसरी किनाऱ्यावरील भुईकोट व डोंगरांच्या टोंकांवरील—दमण, उंबरगांव, डहाणू, तारापूर, माहीम, वसई, चौल, कोर्लई, बाणकोट, गोपाळगड, जयगड,

रत्नागिरी, देवगड वगैरे; तिसरी किनारा व सह्याद्री यांचें मध्यें. ही सरळ नाहीं परंतु यांत मध्यंतरींचे बरेच डोंगरी व इतर किल्ल्यांचा समावेश होतो. उ. दिंडू, बहुलगड, भूपाळगड, माहुली, कल्याण, ठाणें, मलंग, करनाळा, बिरवाडी, घोसाळगड, तळेगड, मंडणगड, पालगड वगैरे पूर्वेकडील रांगा सहज दिसण्यासारख्या आहेत. नाशिक किल्ह्यांत—अचला, अहिवंत, मार्किंडा, कान्होरा, धोडप, कोळधैर ही रांग पूर्वपश्चिम आहे. नगर जिल्यांतील रतनगड ते पेमगिरि ही एक रांगही तशीच आहे. पुणें जिल्ह्यांतील चावंड, जुन्नर, आणि सिंहगड, पुरंदर ह्या जोड्या उघड दिसतात. साताऱ्यामध्यें केंजळगड, पांडवगड, चंदनवंदन, संतोषगड, वारुगड ही रांग उत्तरेस आहे. दक्षिणेला कऱ्हाडजवळ अशीच एक गुणवंतगड, वसंतगड, सदाशिवगड अशी रांग आहे. खालीं वाडी बेळगांवाकडे अशीच एक रांग आहे. असे हे सर्वत्र पसरलेले दुर्ग महाराष्ट्राचे राज्यरक्षणाला सदैव तत्पर होते.

या रांगांची फळी फोडणें शत्रूला फार कठीण जाई. या रांगांतून विस्तवाचे साह्यानें बातमी पोंचविण्याची युक्ति सुलभ पडत असे. डोंगरांचे बाजूला अरण्यें असत. रस्तेही हल्लींसारखे नव्हते. यामुळें रानांतून लपून शत्रूवर छापा घालतां येत असे. निरनिराळ्या मोहिमांतील सैन्यांच्या हालचाली तपासून पाहिल्या, म्हणजे या किल्ल्यांची कामगिरी लक्षांत येते.

( ६ ) वरील पांच प्रकारांवरून नैसर्गिक परिस्थितीचा शक्य तितका फायदा घेण्यामध्यें त्या वेळच्या कल्पकांनीं मोठीच धूर्तता दर्शविली, यांत संशय नाहीं. डोंगरी किल्ल्यांचा परस्पर संबंध झाडांच्या फांद्यांप्रमाणें असे. या फांद्यांचे गुंतागुंतींत बहुधा शत्रु गुरफटत असे. सपाट जागेवरील मुख्य किल्ल्यांचें रक्षण करण्याकरितां समंताद्भागीं छोटे किल्ल्यांचें एक मंडळ बनविणें, या युक्तीचा अवलंबही शिवाजीचे वेळीं होत असल्याचें दिसतें. रायगडचे बंदोबस्ताची योजना कशा तऱ्हेची होती, हें नकाशावरून स्पष्ट होईल. परंतु अशा तऱ्हेची योजना सुवर्णदुर्ग, सिंधुदुर्ग यांचे बाबतींतही केल्याचें आढळून येतें. पाण्याचे बाजूनें आरमारी शत्रूला तोंड देण्याची तयारी आरमारानेंच करावी अशी बुद्धि होती. परंतु किनाऱ्याकडून थेट मारा करितां येऊं नये, म्हणून आंगऱ्यांनीं अलीबागेंत किनाऱ्यावर हिराकोटाची योजना केली. हर्णैच्या सुवर्णदुर्गाचे रक्षणार्थ किनाऱ्यावर कनकदुर्ग, फत्तेगड व गोवागड असे तीन किल्ले आहेत. सिंधुदुर्गाचे बंदोबस्ताकरितां किनाऱ्यावर लगतच पद्मगड, राजकोट व सर्जेकोट यांची योजना केलेली आहे. ही गडमंडळाची तटबंदी युरोपांतही मैदानी स्थलांस दिसून येते. तेथें डोंगरी किल्ल्यांना तर अवसरच नाहीं म्हटलें तरी चालेल.

सपाट जागेवर शहरांचे रक्षणाकरितां जो मुख्य किल्ला बांधतात. त्यापासून कांहीं विशेष अंतरावर दुय्यम महत्वाचे किल्ले मुख्य किल्ल्याचे संरक्षणार्थ म्हणून युरोपांत बांधतात. या दोन पद्धतींतील रचनासाम्य व उद्देशसाम्य लक्षांत घेण्यासारखें आहे.

**७. ऐतिहासिक परंपरा.**—येथपर्यंतचें विवेचन किल्ल्यांचें राजकारणांतील व युद्धशास्त्रांतील महत्त्व दर्शविण्याकरितांच झालें. आतां थोडक्यांत युद्धकला आणि राज्यरक्षण यांचे दृष्टीनें त्यांचा प्रत्यक्ष उपयोग कसा झाला, याचें दिग्दर्शन करावयाचें आहे. महाराष्ट्राचे इतिहासांत सर्व काळीं किल्ले अस्तित्वांत होते. महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या राजसत्ता पाहिल्या तर इ. स. पूर्वीचे अशोक, नंतरचे आंध्र, अर्धा शतक पर्यंतचे शक, अभीर, राष्ट्रकूट, उत्तरेकडून आलेले चालुक्य असा पहिला क्रम आहे. या काळांतील बरींच वर्षे हा देश दंडकारण्याचे स्वरूपांत होता. म्हणजे त्या वेळीं गडकिल्ल्यांचें राजकारण तितकें महत्त्वाचें नव्हतें. शालिवाहनांची राजधानी पैठण होती. त्या वेळीं किल्ल्यांचें महत्त्व फारच अल्प असावें. उत्तरचालुक्य ( ९७३-११८६ ) यांचे वेळींही हीच परिस्थिति होती. एवढेंच नव्हे तर कोल्हापूरचे शिलाहार ( ११।१२ वें शतक ), यादव राजे ( ११८९–१३१२ ), त्यापुढील दिल्लीचे सुलतान, तसेंच बहामनी किंवा तिचे झालेले विभाग यांचे वेळींही हा सह्याद्रीचे आसपासचा मुलूख कोणत्याही राजसत्तेच्या संपूर्ण ताब्यांत आल्याचें दिसत नाहीं. राजसत्तांनीं किल्ले बांधावे, ते अरण्यांतील पाळेगारांनीं, वगैरे जिंकून घ्यावे व आपली सत्ता पूर्ण बसली नाहीं तर त्यांचेशीं सामोपचारानें वागून आपलेपणा राखावा, असें धोरण या सर्व राजसत्ता राखीत होत्या. त्या सर्वांच्या राजधान्या पूर्वेकडील सुपीक मुलुखांत होत्या. त्यांचे सामर्थ्य, त्यांचें उत्पन्न, त्यांचे कामाचे हितसंबंध सर्व पूर्वेकडे होते. पश्चिमेची सरहद्द संभाळण्याकरितां ते थोडे बहुत यावच्छक्य प्रयत्न करीत. सह्याद्रीचे पलीकडे कोंकणपट्टीची तर त्यांनीं फारशी काळजी कधीं केली नसावी. उत्तरे कडील मोगल सम्राट किंवा गुजराथचा सुभेदार आपल्या सवडीप्रमाणें व सोईप्रमाणें कोंकणाकडे लक्ष देत. मक्केला जाणारे मुसलमानी यात्रेकरूंची सोय ठेवण्याकरितांच ते किनाऱ्यावरील बंदरांची काळजी घेत. शिवाय १६ वे शतकापासून पोर्तुगीज, डच, इंग्रज व्यापाराकरितां येऊं लागले; ते वखारी बांधावयास परवानगी मागत त्यावेळीं त्यांचेकडून जकात वसूल करण्याची किंवा नजराणे बळकावण्याची काळजी हे सत्ताधीश करीत. बाकी व्यापारी लोकांचे जुलमाचा, चांचे लोकांनीं किनाऱ्यावर जाळपोळ केल्याचा किंवा अरब, पोर्तुगीजांचे युद्धाचा प्रजेला त्रास होतो किंवा काय, याची ते पर्वा करीत नसत. यामुळें त्यांना किल्ले-कोटांकडे लक्ष देण्याचें कांहींच कारण

नव्हतें. १६ वे १७ वे शतकांतील कोंकणपट्टीची ही अशी व्यवस्था होती. ह्मणून सह्याद्रीचे पूर्वेकडील राजसत्ता बरेच प्रसंगीं उदासीन असल्यास नवल नाहीं. तात्पर्य, शिवाजीनें स्वराज्य म्हणून ज्या मुलुखाची जोपासना केली, तो मुलूख त्याचे पूर्वी हीनावस्थेंत होता. येथेंच त्याला स्वराज्य निर्माण करावयाचें होतें. लोकबळ, सैन्य-बळ, द्रव्यबळ, सर्व याच ठिकाणीं पैदा करावयाचें असल्यामुळें पूर्वी कधींही नव्हतें असें महत्व या स्थानिक किल्ल्यांना आलें आणि इतिहासांत प्रथम 'गडकोट म्हणजे राज्याचे मूळ, गडकोट म्हणजे खजीना, गडकोट म्हणजे सैन्याचें बळ, गडकोट म्हणजे राजलक्ष्मी, **गडकोट म्हणजे आपलीं वसतिस्थलें; गडकोट म्हणजे सुखनिद्रागार,** किंबहुना गडकोट म्हणजे आपलें प्राणरक्षण' ( आज्ञा-पत्र पृ. २८ ) असें मानण्यांत येऊं लागलें. किल्ल्यांचे महत्त्व परिस्थितीनें निर्माण केलें असें आरंभीं लिहिलें आहे त्याचा अर्थ हाच होय.

हें महत्त्व दीर्घकाल राहणें राजकारण दृष्टीनें अशक्य आहे. गडकोटाची काम-गिरी राज्यविस्ताराचे दृष्टीनें मर्यादित असते. राजारामाचे कारकीर्दीचे अखेरपर्यंत परचक्रापासून रक्षणाचें काम या किल्ल्यांनीं अप्रतिम बजावलें. परंतु स. १७०८ पासून महाराष्ट्रांतील राजसत्तेचा चित्रपट बदलला. पूर्वेकडील नगर, विजापूर, गोवळ-कोंडा या प्रबळ सत्ता नामशेष झाल्या. शेजारीं प्रथम औरंगाबादेस व पुढें हैद्रा-बादेला दुबळ्या मोंगलसत्तेचा सुभेदार येऊन राहिला. सह्याद्रीचे दोन्ही अंगांला मरा-ठ्यांची प्रबल सत्ता प्रस्थापित झाली. पुढें बाजीराव वगैरे दिल्लीकडे घोडे फेकूं लागले व राज्यविस्ताराचे क्षितिज प्रसरण पावूं लागलें. त्यावेळीं एका जागीं बसलेले किल्ले आणि चोरून छापा घालणारें पायदळ सर्व हिंदुस्थानभर संचार करण्यांत अपुरें होऊन घोडेस्वारांची दौड कामाला येऊं लागली. रायगडची डोंगरी राजधानी मराठ्यांच्या वाढत्या वैभवाला तोकडी होऊन, तिनें प्रथम मैदानांत साताऱ्यावर व नंतर पुण्याकडे धांव घेतली. पेशवाईच्या उत्तरार्धांत गडकोटांचें महत्त्व कमी होऊन त्याबद्दल उदासीनता उत्पन्न झाली. शेवटच्या बाजीरावाच्या कारकीर्दीच्या अखेरीला ह्या किल्ल्यांची डागडुजी किंवा शिबंदी यांकडे कोणीही ढुंकून पाहीना; आणि किल्ला व त्याचे सभोंवतालची मामलत हा प्रधान उद्देश केवळ नांवानें शिल्लक राहिला. शिवाजीचे एवढे मोठे प्रचंड किल्ले इंग्रजांच्या तोफा फिरकतांच शरण येऊन अनायासें जिंकले गेले. ( नेर्न—कोंकणचा इतिहास. )

पण ही गोष्ट क्रमप्राप्त होती. महाराष्ट्राचे इतिहासाचे नव्हे, पण जगाच्या इतिहासाचे दृष्टीनेंही किल्ल्याचें महत्व आतां नष्ट होत आहे. म्हणून पेशव्यांनीं शेवटीं किल्ल्यांचें

उत्तम रक्षण केलें नाहीं याबद्दल त्यांस दोष देण्याचें कारण नाहीं. त्यांनीं सर्व गोष्टी **पूर्वीसारख्या** उत्तम संभाळल्या असत्या तरी त्यांना यश आलें असतें किंवा नाहीं याची शंकाच आहे.

हें किल्ल्यांचें चरित्र पुरें करण्यास निराळा उपसंहार नको. इंग्रजांचे ताब्यांत मराठ्यांचें राज्य गेल्यावर त्यांनीं बऱ्याच महत्त्वाच्या किल्ल्यांची तटबंदी पाडून टाकली व संस्थानिकांनाही तसें करण्यास भाग पाडलें.

---

ही यादी तयार करितांना गॅझेटियर्सचा उपयोग मुख्य होय. त्यांशिवाय ज्ञानकोश, व गोगटेकृत महाराष्ट्रांतील किल्ल्यांचें वर्णन भाग पहिला, तसेंच वि. ज्ञा. वि., लोक शिक्षण, मनोरंजन वगैरे मासिकांतील प्रवासवर्णनें व भा. इ. मं. च्या ग्रंथांतील संशोधनाच्या हकीकती वगैरे साधनें उपलब्ध आहेत, हें वाचकांस माहितीसाठीं सांगून ठेवणें अवश्य आहे.

## परिभाषा.

जं.=जंजिरा, सर्व बाजूंनीं पाण्यानें वेष्टित खडकावर बांधलेला.

डों.=डोंगरी किल्ला, उंच पर्वताच्या आश्रयानें बांधलेला, मग तो सह्याद्रीवर असो, किंवा समुद्रकांठच्या डोंगरावर असो.

भु.=भुईकोट, सामान्यतः शहरांचे संरक्षणासाठीं बांधलेला, सोलापुर, अहमदनगर, बेदर, वगैरे. यांससुद्धां टेंकडीचा आश्रय घेतलेला असतोच.

छा.=नदीच्या वांकणांत किंवा अन्य ठिकाणीं छावणीच्या किंवा बचावाच्या गढीवजा बांधलेल्या तटबंदीच्या जागा, बहादुरगड, ब्रह्मपुरी वगैरेंसारख्या. कित्येक स्थलांत वरील अनेक प्रकारांचें मिश्रणही आहे.

---

# महाराष्ट्रांतील किल्ल्यांची यादी.

**अकलूज**—छा. सोलापूर, माळशिरसचे ई. ६. दक्षिणच्या स्वारींत औरंगजेबाची कांहीं काल छावणी.

**अक्किवत**—छा. बेळगांव, चिकोडीच्या नै. १२.

**अंकोलें**—भु. उत्तर कानडा, कारवारच्या आ. १५, गोकर्णाचे उ. १०, किनाऱ्यावर. सन १५४० पासून हा पोर्तुगीजांच्या ताब्यांत होता. सन १६७६ त शिवाजीच्या ताब्यांत आला.

**अचला**—डों. अचलागड, अचलगिरी; नासिक, दिंडोरीच्या उ० २०.

**अंजनवेल** ऊर्फ **गोपाळगड**—डों. रत्नागिरि, वासिष्ठी नदी म्ह० दाभोळच्या खाडीच्या दक्षिण मुखावर. १६ व्या शतकांत विजापूरच्या शहानें बांधिला, सन १६६० शिवाजीनें त्याची दुरुस्ती करविली. सन १६९९ त जंजिरेकर खैरतखान यानें ताब्यांत घेऊन पडकोट बांधिला. फिरून सन १७४४ त तो मराठ्यांकडे आला. तुळाजी आंग्रे यानें बालेकिल्ला बांधून त्यास गोपाळगड हें नांव दिलें.

**अंजनेरी**—डों. नासिक, आनंदवल्लीजवळ, सन १७६४ त प्रथम राघोबानें हें आपलें राहण्याचें ठाणें केलें, तेव्हां राघोबाचें थंड हवेचें ठिकाण म्हणून या डोंगराची प्रसिद्धि झाली. 'ध्यान' नांवाचें एक छोटें मंदिर वर सांप्रत असून त्याच्या पश्चिमेकडील गवाक्षांतून मावळता सूर्य स्पष्ट दिसण्याची सोय केलेली आहे.

**अजमगड**—पुरंदर पहा.

**अजिमतारा**—सातारा पहा.

**अजिमनगर**—बेळगांव पहा.

**अणकाई-टणकाई**—डों. नासिक, येवल्याचे उ. ६. मनमाड-अहमदनगर रस्त्यावर. अलकापालका डोंगर जवळच आहेत.

**अंबोलगड**—डों. रत्नागिरी, जैतापर खाडीच्या उत्तर मुखावर.

**अमिनाबाद**—पाली पहा.

**अर्क**—भु. विजापूर लगतचा किल्ला, स. १५०९ त युसुफ आदिलशहानें बांधिला.

**अर्जुनगड**—डों. दमणजवळ, पुणें बडोदें रस्त्यावर. बारभाईच्या कारस्थानामुळें सन १७७६ त राघोबानें या किल्ल्याचा आश्रय करून गोंवेकर फिरंग्यांशीं संधान बांधण्याचा प्रयत्न केला.

**अरनाळा**—जं. ठाणें, आगाशीच्या प. वैतरणा नदीचे दक्षिण मुखावर. मूळचें मुसलमानी बांधकाम पाडून फिरंग्यांनीं नवी बांधणी केली. सन १७३७ त पहिल्या बाजीरावानें जिंकून पुनः बांधिला. त्यावर शिलालेख आहे. वा. इ. व्ह. १८३८ पृ. १२९.

**अलंग-कुलंग**—डों. नगर व नासिक जिल्ह्याच्या हद्दीवर. आकोल्याचे प. २५. कळसूबाईच्या टेंकडीजवळ दोन मैलांच्या अंतरानें हे जोड किल्ले आहेत.

**अलबारी**—( १ ) औरंगजेबाशीं झालेल्या तहांत ( स. १६६५ ) शिवाजीकडे राहिलेल्या १२ किल्ल्यांपैकीं एक.

**अलीबाग**—छा. ठाणें, केळवें माहीमच्या बुरुजांपैकीं एक.

**अवचितगड ऊ० मेढें**—डों. कुलाबा. रोह्याचे उ० ३. कुंडलिका नदीच्या उत्तर कांठीं. शिवाजीनें बांधिला. बाजीरावानें स. १७३३ त हबशांपासन जिंकून घेतला.

**अशेरी**--डों. ठाणें, माहीमच्या ई. २०. स. १६५८ त " अशेरी किल्ला शिवाजीनें वसविला. " ( जे. क. पृ. ४२ ) शहाजहान बापाविरुद्ध बंड करून उठला, तेव्हां राजा गोपाळदास गोर यास अशीरचे किल्ल्यांत ठेवून त्याच्या ताब्यांत आपली सर्व मत्ता व नोकर देऊन, स्वत: बंधू पर्वीझबरोबर लढण्यास गेला, ( स. १६२३ ). गोपाळदासानें दोन वर्षेंपावेतों या किल्ल्यांतून पर्वीझशीं टक्कर दिली. या कामगिरीबद्दल त्यास पंचहजारी मनसब व ' मानधाता ' असा किताब शहाजहाननें दिला. स. १६५२ त गोपाळदासाचा मुलगा मनोहरदास ह्यास किल्लेदारी मिळाली. हाच पुढें स. १६६५ त माहुलीचा किल्लेदार झाला. शहाजहान व औरंगजेब यांची या घराण्यावर बहाल मर्जी होती.

मनोहरदासानें माहुली येथें कोरलेला ता. ८–२–१६६८ चा एक फारसी शिलालेख सांपडला आहे. या लेखाचा दगड कांहीं वर्षांपूर्वी रा. के. आ. पाध्ये हायकोर्ट वकील यांना ठाणें येथील जज्ज कोर्टाच्या इमारतींत सांपडला. त्याचें वर्णन डॉ. जी. ज. मोदी यांनीं केलें आहे. ( J. R. A. S. 1915. )

**असावागड**—डों. ठाणें, पालघर स्टेशनचे ई० ५.

**अहमदनगर**—नगर पहा.

**अहिवंतगड ऊ० सर्प किल्ला**:--डों. नासिक दिंडोरीच्या उ० १५. स. १६७१ त शिवाजीनें घेतला ( जे. श. )

**आगरकोट**—जं. कुलाबा, चौल येथील पोर्तुगीजांचा किल्ला. कुंडलिका नदीच्या उत्तर तीरावर.

**आर्काटगड**--भू. मद्रास.

**आंवढा**--नगर, पट्टा किल्ल्याचे उ० ४.

**आवरा**—रत्नागिरि, सावंतवाडीचे आ० १४, भेडशीजवळ.

**इंद्रागिरि**—ऊ० इंद्राई—डों. नासिक, चांदवडच्या वा. ४.

**इंदुरी**--भु. पुणें, तळेगांव–दाभाड्याचे ईशान्येस, इंद्रायणी नदीचे कांठीं.

**इंद्रगड**—डों. ठाणें. उंबरगांवच्या उ० १५, किनाऱ्यापासून ३ मैलांवर.

**इस्लामगड**—डों. रायगडाचें मुसलमानी नांव.

**उचितगड** ऊ० प्रचितगड—डों० सातारा, वाळवें तालुका, पेठच्या वा.

**उदयदुर्ग**—( ? ) औरंगजेबाशीं झालेल्या पुरंदरच्या तहांत ( १६६५ ) शिवाजीकडे राहिलेल्या १२ किल्ल्यांपैकीं एक.

**उंदेरी** ऊ० जयदुर्ग—जं. मुंबई बंदराचे दक्षिणेस, खांदेरी उंदेरी या जोड नांवानें प्रसिद्ध आहे. स. १६७९ त हबशानें बांधिला.

**उंबरगांव**—छा. डहाणू तालुक्याच्या पश्चिम किनाऱ्यावर.

**एकदरा**—डों. नगर, आकोल्याचे वायव्येस २१ मैल. पट्टा किल्ल्याचे द. ५.

**ऐरणी**—डों. धारवाड, राणीबेन्नूरच्या पू. १२.

**कंकराळा**—डों. नासिक, मालेगांवच्या वा० १२.

**कंचनगड** ऊ० **काचनागड** ऊ० **काचना**—डों. नासिक, चांदवडच्या वा. १०.

**कठोरगड**—( बखर ) ?

**कडवाड** ( कारवार )—भू० उत्तरकानडा, किनाऱ्यालगत.

**कणेरा** ऊ० **कान्हेरा**—डों. नासिक, चांदवडच्या डोंगरांत, धोडपचे वा० ७.

**कंत्रागड**--डों. नासिक, अंकाईच्या पू० ४.

**कथारीगड**—छा. बेळगांव, सौंदत्तीच्या वा० १२.

**कनकगिरि**—भू० रायचूरच्या द., तुंगभद्रा कांठीं.

**कनकदुर्ग**—डों. रत्नागिरि, हर्णैनजीक, सुवर्णदुर्गाजवळ.

**कनकाद्रि** ऊ० **कांत्रा**---डों. नासिक, अंकाईच्या पू. ४.

**कनकेश्वर**—छा, कुलाबा, अलिबागच्या ई० ८, या नांवाचा डोंगर आहे.

**कपालदुर्ग**—( कब्बालदुर्ग )–छा० म्हैसूर, श्रीरंगपट्टणजवळ खडकावर, राजकीय कैद्यांसाठीं हैदरानें ठरविलेला तुरुंग. येथेंच मुरारराव घोरपडे हैदराचे कैदेंत मृत्यु पावला.

**कमळगड**—डों. सातारा, महाबळेश्वराच्या उ.

**कमानदुर्ग**—डों. ठाणें, माणिकपूरच्या पू० १०. (माणिकपूर वसईरोड स्टेशनच्या दक्षिणेस).

**कमालगड**—डों. सातारा, वाईच्या प. १०

**कराड**—छा. सातारा शहरच्या आग्नेयीस प्रतिनिधींच्या आश्रयाची जागा.

**कर्नाटक गड**–( बखर ) ?

**कर्नाळा**—डों. कुलाबा. कर्जतच्या प. १५ आणि पनवेलच्या द. ६; स. १६७० त शिवाजीनें घेतला.

**कलदुर्ग**—डों. ठाणें, पालघरजवळ, माहीमच्या ई० ८.

**कलानिधिगड**—कालानंदीगड पहा.

**कल्याणगड** ऊ० **नंदगिरि**—डों. सातारा, कोरेगांवच्या उ० ८

**कंसगड**—?

**कळसूबाई**—डों. नासिक, इगतपुरीच्या आ. १०, सह्याद्रीचें सर्वोच्च शिखर, ५४२७ फूट.

**कांगोरी** ऊ. मंगळगड—डों. कुलाबा, महाडचे आ. २१, सन १६४८ त शिवाजीनें घेतला.

**काचनागड** ऊ० **काचना**—कंचनगड पहा.

**कांत्रा**—कनकाद्रिगड पहा.

**कानवई**—डों. नासिक, इगतपुरीचे उ० ७.

**कान्हेरा** ऊ० **कण्हेरगड**—कणेरा पहा. कान्हेरी डों. ठाणें, उंबरगांवच्या आ. १५.

**कामतें कोट**—छा. रत्नागिरि, ता० देवगड, कामतें गांवाजवळ.

**कालानंदीगड** उ० कलानिधिगड—डों. बेळगांव, चांदगडजवळ.

**कांसे** ऊ० पद्मदुर्ग—जं. कुलाबा मुरूडजवळ, राजापुरी खाडीच्या मुखावर.

**काळदुर्ग**—छा. ठाणें, पालघर स्टेशनचे पू. २.

**कित्तूर**—छा. बेळगांव, संपगांवचे द. १४. याचें जुनें नांव गिजगनहल्ली.

**किरवलेगड**—छा. बेळगांव खानापूरचे प. ८.

**कुंजरगड**—( बखर ) ?

**कुंजाळगड**—डों. नगर, आकोल्याच्या नै. १८. हरिश्चंद्रगडाच्या पूर्वेस. ( कुंजरगड ? )

**कुडाळ**—भू. सावंतवाडी राज्य.

**कुर्डूगड** ऊ. विश्रामगड—डों. कुलाबा, माणगांवच्या ई. १३.

**कुलंग**—डों. अलंग-कुलंग पहा.

**कुलाबा**—जं. अलीबागेजवळ 'नऊघर' येथें खडकावर, स. १६८० त शिवाजीनें बांधिला.

**कुवारीगड**—डों. पुण्याच्या प. ४० मुळशी परगणा. खंडाळा घांटाचे द. १५. आंबवणें घांटास रोखतो.

**कुसूंगड**—छा. धारवाड, हुबळीच्या ई. ६.

**कूर्मगड**—जं. उ. कानडा, कारवारचे उ. २. बेटावर. शिवाजीनें अर्धवट बांधून सिद्धगड असें नांव दिलें होतें, असें म्हणतात.

**कंजळगड** ऊ. **घेराखेळंजा** ऊ. **खेळंजा**—डों. सातारा, वाईच्या वा. ११. भोज राजानीं बाराव्या शतकांत बांधिला, अतिशय दुर्गम मांढरदेवाचे डोंगरावर.

**केंवळगड**—( वेटवल )?

**केरूर**—डों. विजापूर, बदामीच्या वा. ११ हुबळी-सोलापूर रस्त्यावर.

**कृष्णागिरिगड**—( जिंजी )?

**केवळगड**—( बखर ? )

**केळंजा**—डों. मनमोहनगड पहा.

**केळवें**—डों. ठाणें, माहीमचे द. ३.

**कैलासगड**—( बखर–कोटवें ? )

**कोज** ऊ. **कोहोज** ऊ. **कोइज**—डों. ठाणें, वाड्याच्या प. १०.

**कोटलीगड** ऊ. **कोथळा**—डों. ठाणें, कर्जतच्या ई. १४.

**कोंडाणा** ऊ. **सिंहगड**—डों. पुण्याच्या नै. १२. स. १६४७ त शिवाजीनें घेतला. स. १७०२ त औरंगजेबानें जिंकून 'बक्षिंदाबक्ष' (God's Gift) हें नांव दिलें.

**कोथळा**—कोटलीगड पहा.

**कोपलगड**—छा. बेळगांव, गदगच्या पू. २०

**कोर्लई**—डों. कुलाबा, रोह्याच्या खाडीच्या दक्षिण काठावर, रेवदंड्यासमोर.

**कोळधैर**—डों. नासिक, चांदोरच्या वा. ७

**कौलागड** ऊ. **कोंवळा**—डों. कुलाबा, महाडच्या ई. १५, महाडभोर रस्त्यावर. वरंध्या घांटांत.

**खांदेरी**—जं. मुंबई बंदराचे दक्षिणेस, मुखाशीं. स. १६७८ च्या ऑगस्टांत शिवाजीनें बांधण्यास सुरुवात करून मजबूद आरमारी ठाणें केलें.

**खारबाव**—छा. ठाणें, वसई तालुक्यांत, समुद्रकिनाऱ्यावर.

**खारेपाटण**—छा. रत्नागिरि, देवगड तालुक्यांत.

**खेडदुर्ग**—सागरगड पहा.

**खेळणा** ऊ. **विशाळगड**—डों. कोल्हापूरच्या वा. ४५ राजापूर नांवाच्या डोंगरावर. याची उंची ३३४८ फूट, लांबी ३२०० फूट व रुंदी १०४० फूट. शिवाजीनें स. १६५९ घेतला. विस्तृत व मोठ्या वस्तीचा किल्ला.

**खोलगड**—( बखर ) ?

**गगनगड** ऊ. **बावडा**—डों. कोल्हापुरच्या नै. ३६. पन्हाळयाच्या भोजराजाच्या कारकीर्दींत ( स. ११७८–१२०९ ) बांधलेल्या १५ किल्यांपैकीं एक. पंत अमात्यांचें ठिकाण. शिवाजीनें स. १६५९ त घेतला.

**गजेंद्रगड**—छा० विजापूर, बदामी द. २८.

**गडइंग्लज**—डों. कोल्हापूरच्या आ. ४५.

**गडागड** ( बखर. ) ?

**गणेशगड** ( बखर. ). ?

**गदग**—छा. धारवाड, बंकापूर टापूंतील महत्वाचें ठाणें.

**गंधर्वगड**—छा. बेळगांवचे प. २०. वाडीच्या नागसावंतानें स. १७२४ त बांधिला.

**गंभीरगड**—डों. ठाणें, डहाणूच्या पू. २२.

**गर्वगड**-( जिंजी )—( बखर. ) ?

**गाविलगड**—डों. मध्यप्रांत, बऱ्हाणपूरच्या ई० ५०.

**गहनगड** ( बखर ) घनगड ?

**गाळणा**—डों. नासिक, मालेगांवच्या उ. १४.

**गुणवंतगड** ऊ. **मोरगिरी**—डों. सातारा, पाटणच्या नै. ६.

**गुमतारा** ऊ. **गोतारा**—डों. ठाणें, भिवंडीच्या उ. १२ दुगाडजवळ.

**गोकाक** ऊ. **पंचमीगड**—छा. बेळगांव, गोकाकजवळ.

**गोपाळगड** ऊ. **अंजनवेल**—अंजनवेल पहा.

**गोरखगड**—डों. ठाणें, मुरबाडचे आ. १२ खोपोलीजवळ. मच्छिंद्रगड, सिद्धगड आणि गोरखगड हे तीन खडक जवळजवळ आहेत.

**गोवळकोट**—मु० रत्नागिरि, चिपळूणजवळ; दाभोळखाडीवर स. १६७० त शिवाजीनें दुरुस्ती केली.

**गोवळकोंडा**—हैद्राबादचे नै० ७ डोंगराच्या आश्रयानें बांधिलेली कुत्बशाहीची राजधानी.

**गोवागड**—जं. रत्नागिरि, हर्णैजवळ.

**घनगड**—डों. पुणें, मुळशीपासून ६ व पुण्याच्या प० ३०.

**घारगड**—डों. नासिक, त्रिंबकचे पू० ६.

**घेराखेळंजा**—केंजळगड पहा.

**घेरिया** ऊ. **विजयदुर्ग**--जं. रत्नागिरि, राजापूरच्या नै. १२. हें मुसलमानी नांव आहे.

**घोसाळगड ऊ. वीरगड**—डों. कुलाबा, रोह्याचे द. ६ कोठूनही पाहिलें तरी एकांत एक असे चार किल्ले निरनिराळ्या उंचीचे दिसतात. स. १६४८ त शिवाजीनें घेतला. मध्यंतरीं जंजिरेकर हबशांकडे होता. स १७३३ त बाजीरावानें परत जिंकून घेतला.

**चंदन-वंदन**—डों. सातार्‍याच्या ई० १० चंदन आणि वंदन असे जोड किल्ले आहेत. पैकीं वंदन मोठा व अधिक उंच आहे. वंदनावर तुळाजी आंगरे कैदेंत होता.

**चंदा ऊ. चांदगड**—डों. बेळगांवच्या प० २२.

**चंदेरी**—डों. कुलाबा, पनवेलच्या ई० १०.

**चंद्रगड**—डों. कुलाबा, महाडचे आ. १५. ढवळ्या घाटांत.

**चाकण ऊ० मोमिनाबादः**—मु० पुणें, पुण्याच्या उत्तरेस १८ स. १२९४ त एका हबशी सरदारानें बांधिला, स. १६४७ त शिवाजीनें घेतला.

**चांदगड ऊ० चंदाः**—नागपुरच्या आग्नेयीस १०० मैल.

**चांदवड**—डों. नासिक, लासलगांवचे उ० १४; स. १६६४-६५ त शिवाजीनें सर केला.

**चांभारगड**—डों. कुलाबा, महाडच्या जवळ उ०.

**चावंड ऊ० जुंडः**—डों. पुणें, जुन्नरचे वा० १०. वरघाट आणि कोंकण यांमधील दळणवळणास नाणेंघाटांतील रस्ता मुख्य असून त्यावर चावंड, हडसर, जीवधन व शिवनेर हे चार किल्ले संरक्षणाच्या दृष्टीनें महत्त्वाचे होते.

**चित्रदुर्ग**—भू० कर्नाटक, हरिहरच्या आ० ४०.

**चिदाहार कोट**—( बखर ) ?

**चेलगड**—( जिंजी ? )-( बखर ) ?

**चौल**—छा० कुलाबा, रोह्याच्या खाडीच्या उत्तर किनार्‍यावरील बंदरचा किल्ला. "चौल गावांत खासगी अली मुसलमानाची निवारशी जागा होती. तेथें दोन बुरूज बांधून संभाजीनें त्यास राजकोट असें नांव दिलें होतें. स. १६८२." राजकोट नांवाचा दुसरा एक किल्ला आहे. राजकोट पहा.

**चौलेर**—डों. नासिक, सटाण्याचे नै० ९.

**जगदेवगड**—( बखर ) ?

**जंगली जयगड**—डों. सातारा, पाटणच्या वा. १२. ताई तेलिणीच्या ताब्यांत हा किल्ला होता.

**जंजिरा**:—जं. कुलाबा, राजापुरीच्या खाडीच्या मुखाशीं. सीद्दीच्या ताब्यांतील प्रसिद्ध जलदुर्ग. जंजिरा हस्तगत करण्याचे मराठ्यांनीं पुष्कळ प्रयत्न केले पण केव्हांही त्यांचे हातीं गेला नाहीं.

**जयगड ऊ० जयदुर्ग**:—रत्नागिरि, शास्त्री नदीच्या दक्षिण मुखावर. आंतील छोटा किल्ला शिवाजीनें बांधविला.

**जरंडा**—साताराच्या पू०; डोंगर.

**जवळा ऊ० जवळेगड**—( जावळी ? ),—( बखर ) ?

**जांबा**—डों. रत्नागिरि, बाणकोटच्या पू० १२. डोंगराच्या दोन टोंकांवर दोन किल्ले आणि त्या दोन्ही किल्ल्यांस जोडणारा भक्कम तिहेरी तट बांधिला आहे. पैकीं दक्षिण टोंकावरील किल्ल्यास जांबा हें नांव आहे; आणि उत्तर टोंकावरील किल्ल्यास मंडणगड असें नांव आहे. जांबा आंगऱ्यांनीं बांधिला आणि मंडणगड शिवाजीनें बांधिला. मधील पडकोट हबशानें बांधिला असें म्हणतात.

**जिवधन**—डों. पुणें, जुन्नरच्या प० १६. नाणें घांटाचे माथ्यावर.

**जिवधन**—छा. ठाणें, विरार स्टेशनच्या पू० २.

**जुंड**—चावंड पहा.

**टकमक**- डों. ठाणें, माहीमच्या आ. १५.

**ठकरीगड**—( बखर ) ?

**ठाणें ऊ० साष्टी**—डों. ठाणें, पोर्तुगीजांनीं तटबंदी केली. स. १७३० त बांधण्यास आरंभ.

**डंबळ**—धारवाड, गदगच्या आ. १३.

**डहाणू**—छा. ठाणें, डहाणूनदीच्या उत्तर तीरावर. स. १७३९ त चिमाजी आप्पानें घेतला.

**डोंगरगाव गुड्ड**—छा. बेळगांव, भमिगडाचे आ. १०, भीमगड पहा.

**ढोलागड**—( बखर ) ?

**तळेगड**—डों. कुलाबा, माणगांवचे वा. ११. तळें गांवाजवळ.

**ताठोरा ऊ. ताथवडा ऊ. संतोषगड**—डों. सातारा, दहिवडीच्या वा. २० शिवाजीनें बांधिला.

**तांदुळवाडी**—( केळवा ) डों. ठाणें, माहीमच्या आ. १०.

**तारापूर**—छा. ठाणें, डहाणूच्या द० १०. पोर्तुगीजांचें आश्रयस्थान.

**तिकोना ऊ० वितंडगड**—डों. पुणें, पुण्याच्या नै. २०. मांडवीच्या नै. २. तुंगच्या आ. ३. पवन मावळांत. पवना व मुळा यांचे खोऱ्यांत कल्याण खजिना मारून परत येतांना शिवाजीनें स. १६४८ त घेतला.

**तुंग ऊ० कठिणगड**—डों. पुण्याच्या नै. २० डेऱ्यासारखा गोल आकार आहे. स. १६४८ त शिवाजीनें घेतला. तुंगतिकोना जोडी.

**तुंगार**—डों. ठाणें, वसईचे ई. १५.

**तुंगी**—डों. कुलाबा, नेरळच्या पू. १२, नैसर्गिकच दुर्गम.

**तेरदाळ**—छा. सांगलीचे आ० ४१.

**तोरगल**—भु. कोल्हापुरच्या नै० १००. तट आणि बुरूज चिखलांनीं बांधिलेला आहे. भूतांकुश नांवाच्या कोणी राजानें ११०० त बांधिला.

**तोरणा ऊ० प्रचंडगड**—डों. पुण्याच्या नै० २०. वेल्हें बुद्रुकजवळ.

**त्रिंगलवाडी**—डों. नासिक, इगतपुरीच्या वा. ६. थळघांटाचे माथ्यावर.

**त्रिंगळवाडी किल्ला**—डों. नासिक, इगतपुरीच्या वा० ६.

**त्रिंबक ऊ० श्रीगड**—डों. नासिक, नाशकाच्या वा० २०.

**दर्ग्याचा किल्ला**—बद्रुद्दिन पहा.

**दहिगड**—( बखर ) ?

**दातिवरा ऊ. दातेगड**—डों. ठाणें, माहिमच्या द. १०.

**दातेगड ऊ. सुंदरगड**—डों. सातारा पाटणचे वा. ३.

**दारुल जफर ऊ. विजापूर**—अर्क पहा.

**दिंडू**—डों. ठाणें, डहाण तालुक्यांत उत्तर किनाऱ्याजवळ उंबरगांवचे उ. १३.

**देइरीगड**—डों. कुलाबा, पेण तालुक्यांत.

**देवगड**—डों. रत्नागिरि, देवगड बंदरच्या द.

**देवगड ऊ० हरेश्वर**—डों. कुलाबा, श्रीवर्धनच्या द० ३.

**देवगड**—छा. मध्यप्रांत, नागपूरचे उत्तरेस. गोंड राजांचा प्राचीन किल्ला. नागपुरकर भोसल्यांनीं हस्तगत केला.

**दोडवाड**—छा. कर्नाटक, धारवाडच्या उ० १४.

**दौलत मंगळ ऊ० भुलेश्वर**—डों. पुणें, जेजुरीजवळ भुलेश्वरचे डोंगरावर. सं. १६२२ त मुरार जगदेव ह्या विजापुरच्या सरदारानें किल्ला बांधिला, आणि रायाराव हा आपल्या तर्फेचा हवाल नेमिला.

**दौलताबाद**—आसपास मैदान असून मध्येंच दुर्गम डोंगराच्या आश्रयानें बांधलेले जे कांहीं थोडे मजबूद व इतिहासप्रसिद्ध किल्ले आहेत, त्यांत दौलताबादची गणना आहे. याचें प्राचीन नांव देवगड ऊ० देवगिरि. ही यादवांची राजधानी होती. ती अलाउद्दीननें जिंकिली. महंमद तुघ्लखानें याच ठिकाणीं दक्षिणची राजधानी केली होती. स० १६०९ अकबरानें अहंमदनगर जिंकिलें, तेव्हां मलिकंबरानें या किल्ल्यावर निजामशहास ठेवून शेजारींच एक शहर वसविलें, त्यास पुढें औरंगाबाद नांव मिळालें. स. १७६० त हा किल्ला निजामाकडून पेशव्यांकडे आला.

**द्रोणागिरि**—छा. ठाणें, धरमतर खाडींतील करंज्याजवळ. पोर्तुगीजांची निवाऱ्याची जागा.

**धकगड**—डों. कुलाबा, भिवगडचे नैर्ऋत्येस.

**धारवाड**—भू. धारवाडजवळ. स. १४०३ त बांधिला.

**धारावी**—छा. ठाणें, वसईच्या खाडीच्या मुखाशीं बेट.

**धैरगड ऊ० भोरगड**—डों. नासिक, दिंडोरीच्या द० ९. रामसेजगडाच्या प० २.

**धोडप**—डों. नासिक, चांदवडच्या नै० १५. चांदवड डोंगराच्या रांगेतील अत्युच्च शिखर–येथें स. १७६८ त रघुनाथरावास माधवरावानें पकडिलें.

**नगर**—भू० अहंमदनगर. 'बागनिजाम' हें किल्ल्याचें मूळचें नांव. यास २४ बुरुज असून 'शिरामीर' बुरुज भिंगारच्या रोखें आहे. (इ. सं. ऐ. च.) मलीक अहंमद बहिरी (दौलताबादच्या निजामशाहीचा पहिला सुलतान) यानें हा किल्ला स. १४९४ त बांधिला. पूर्वी बिंकर नांवाचें खेडें होतें तेथें शहर वसवून अहमदनगर असें नांव ठेविलें. (साने, चि. व. टीप.) शहाजादा मुराद यानें १५९६ त वेढा दिला आणि मुरादच्या मृत्यूनंतर स. १५९९ त दानियलनें किल्ला घेतला. चांदबिबीचें अद्भुत शौर्य आणि तिचा खून हे प्रसंग याच ठिकाणीं घडून आले. या वेढ्यांत झालेली पडझड पुढें औरंगजेबानें (स. १६३६–१६४४) दुरुस्त केली. ता. ९ नोव्हेंबर १७५९ रोजीं हा किल्ला सदाशिवरावभाऊनें घेऊन तेथील किल्लेदार कविजंग यास पन्नास हजारांची जहागीर दिली. उत्तर पेशवाईंत नामांकित राजकीय कैदी या किल्ल्यांत ठेवीत.

**नंदगड**—बेळगांव, खानापूरचे आ. ७.

**नंदीगड**—( बखर ) ?

**नंदोस**—डों. रत्नागिरि, मालवण तालुक्यांत नंदोस गांवाजवळ.

**नरगुंद** ऊ. **महंतगड**—छा. धारवाड, हुबळी विजापूर रस्त्यावर, नवलगुंदाचे उ० १२ स. १६७४ त शिवाजीनें नवीन तटबंदी करविली. यास '**महत्‌गड**' असें दुसरें नांव आहे.

**नरनाळा**—डों. मध्यप्रांत, बऱ्हाणपूरचे पू. ५०.

**नवरसतारा**—सज्जनगड ऊ. परळी पहा.

**नवलगुंद** ऊ० **नाचनागड**—जि० धारवाड.

**नळदुर्ग** ऊ० **मिरागड**—डों. ठाणें, मुरबाडचे आ. ६

**नंदगिरि** ऊ० **कल्याणगड**—डों. सातारा, कोरेगांवच्या उ. ८. शिवाजीनें स. १६७३ त घेतला.

**नारायणगड**—डों. पुणें, जुन्नरचे आ. ९. नारायणगांवच्या पू. ३. बाळाजी विश्वनाथानें बांधिला असें म्हणतात.

**नारायणगड**—डों. कोल्हापुरराज्य, मनोहरगडाजवळ.

**निवटी**—डों. रत्नागिरि, मालवणच्या द. ६. वेंगुर्ल्याच्या उत्तरेस किनाऱ्यावर.

**नौबतगड**—( बखर ) ?

**पंचमीगड**—गोकाकगड पहा.

**पट्टा** ऊ. **विश्रामगड**—डों. नगर, आकोल्याचे वा. १६.

**पंडुगड** ऊ. **पांडवगड**—डों. सातारा, वाईच्या वा. ५. सन १६७३ त शिवाजीनें घेतला.

**पद्मगड**—छा. रत्नागिरि, सिंधुदुर्गाजवळ लहान बेटावर. यास '**पांडवगड**' असेंही म्हणतात. येथें शिवाजी गलबतें बांधवीत असे.

**पद्मदुर्ग** ऊ. **कांसे किल्ला**—कांसे पहा.

**पन्हाळा पर्णालपर्वत**—डों. कोल्हापुरच्या वा. १२. स. ११९० चे सुमारास भोजराजानें बांधिला. स. १६५९ त शिवाजीनें घेतला. हा राजधानीच्या सोयीचा जलधान्यानें समृद्ध व विस्तृत आहे.

**पर्वतगड**—( बखर ) ? ऊ. **नवरसतारा.**

**परसगड**—?

**परळी** ऊ. **सज्जनगड**—डों. सातारा, साताऱ्याच्या प. ६० फूट. शिवाजीनें स. १६७३ त घेतला. शिवाजीनें रामदासास राहण्यास हा किल्ला देऊन त्यास सज्जनगड असें नांव दिलें. स. १७०० त औरंगजेबानें काबीज करून 'नवरसतारा' असें नांव दिलें.

**परिंडा**—भु. सोलापूरच्या उ. ५० बहामनी राज्याचा सरदार ख्वाजेजहान यानें स. १४८२ त बांधिला.

**पवित्रगड** ऊ. **पैझरगड** ऊ. **हुनूर**—भु. बेळगांव, हुनूरजवळ.

**पांडवगड**—पद्मगड पहा. ( रत्नागिरि )

**पांडवगड**—पंडुगड पहा. ( सातारा )

**पाणबुरूज**—छा. ठाणें, केळवें माहीम किल्ल्यापैकीं एक जंजिरा छोटा बुरूज.

**पाबर**—छा. नगर, आकोल्याचे आ. १५.

**परकोट** ऊ. **पारगड**—डों. रत्नागिरि, जांबा आणि मंडणगड पहा.

**पारगड**—डों. बेळगांवच्या प. ३० चांदगडाजवळ सह्याद्रीवर.

**पारसगड**—छा. बेळगांव, सौंदत्तीच्या द. १. सन १६७४ त शिवाजीनें बांधिला.

**पारसिक**—छा. ठाणें, कल्याण खाडीचे मुखाशीं दिवा आणि ठाणें यांमध्यें.

**पालगड**—डों. रत्नागिरिं, खेडच्या वा. ८. शिवाजीनें बांधिला.

**पाली** ऊ० **सरसगड** ( सुरंजगड ? ) ऊ० **अमिनाबाद**—डों. कुलाबा, ( भोर संस्थान ). पालीजवळ.

**पावनगड**—डों. कोल्हापूर, पन्हाळ्याच्या पू० १. खिंडीपलीकडे. तट १८४४ त पाडून टाकले.

**पिसोळगड**—डों. नासिक, सटाणा तालुका, जयखेडाच्या उ० ४.

**पुणें**—बारिया आरब नांवाचा पठाण स० १२४६ त पुण्यावर चालून आला. कुंभारी व कासारी हीं दोन गांवें नदीकांठीं होतीं, आणि यासच त्यावेळीं पुणें म्हणत. या गांवांत पुणेश्वर ऊ० केदारेश्वर आणि नारायणेश्वर हीं दोन देवळें होतीं. कदाचित् पुणेश्वरावरून पुणें हें नांव अस्तित्वांत आलें असावें. बारिया आरबानें हीं देवळें पाडून त्या जागीं मशिदी उभारल्या व देवळांचीं उत्पन्नें मशिदीस लावून दिलीं. त्या मशिदी थोरला शेकसल्ला व धाकटा शेकसल्ला या नांवानें प्रसिद्ध आहेत. पुढें मराठशाहींत या नारायणेश्वराची स्थापना पुरंदरच्या पायथ्याशीं नारायण पेठ वसवून झाली. बारियानें पुण्यास कोट बांधिला ( स. १२९० ). कुंभारवेशीजवळ त्याच्या

खाणाखुणा दिसतात. निजामशहाकडे पुणें असतां मुरार जगदेवानें पुण्यावर स्वारी करून पुणें जाळलें, लुटलें, गड उध्वस्त केला आणि पांढरीवर गाढवांचा नांगर फिरविला ( स. १६२२–२३ ). स. १६३६ नंतर दादाजी कोंडदेवानें तेथें वस्ती करविली आणि शिवाजीसाठीं ' लालमहाल ' वाडा बांधविला.

**पूर्णगड**—डों. रत्नागिरि, रत्नागिरीच्या द० १२. मुचकुंदी नदीच्या उत्तर मुखावर.

**पुरंदर ऊ० अजमगड**—डों. पुणें, सासवडच्या नै० ६. भुलेश्वर, रुद्रमाळ वज्रगड, मोरगिरि आणि केळणा हे सारे पुरंदरचे पोटभाग होत. स. १६४६ त शिवाजीनें घेतला.

**पेठ**—डों. सातारा, वाळवें तालुक्याचा पेटा. जिल्ह्याचा नैर्ऋत्य कोंपरा.

**पेब ऊ० विकटगड**—डों. कुलाबा, पनवेलचे ई० ९, मालडुंग गांवच्या हद्दींत.

**पैझरगड**—पवित्रगड पहा.

**प्रकाशगड ऊ० पिपला**—( बखर ) ?

**प्रचंडगड**—तोरणा पहा.

**प्रचितगड**—डों. रत्नागिरि, ता० संगमेश्वर, शृंगारपुराजवळ, मळेघांटानजीक.

**प्रचितगड ऊ० उचितगड**—डों. सातारा, ता. वाळवें पेठच्या वा० ४०.

**प्रचितगड**—डों. कोल्हापुरहद्दींत, मनोहरगडाजवळ.

**प्रतापगड**—डों. सातारा, महाबळेश्वराचे प० ८. पारघांटाचें नाकें. स. १६५६ त मोऱ्यांकडून जावळी काबीज केल्यावर शिवाजीनें मोरोपंत पिंगळ्याकडून बांधविला. स. १६५९ तील अफजलखानवधाचा प्रसंग याच गडाखालीं घडला.

**प्रबळगड**—डों. कुलाबा, पनवेलच्या पू० ८.

**प्रवाळगड**—डों. कुलाबा, पनवेलच्या पू० ८ व माथेरानच्या प० ४.

**प्रसन्नगड**—( बखर ) ?

**प्रसिद्धगड ऊ० रांगणा**—डों. कोल्हापुरच्या नै० ५५ व भूधरगडापासून ३०. स. १६५९ त शिवाजीनें घेतला. स. १८४४ त सरकारचे सल्ल्यावरून जमिनदोस्त करण्यांत आला. शिवाजीच्या आवडत्या किल्ल्यांपैकीं एक.

**प्राणगड**—( बखर ) ?

**पेमगिरि** ऊ० **पेमगड**—डों. पेमगिरि नांवाचा डोंगर नगर जिल्ह्यांत आकोलें तालुक्यांत मुळा व प्रवरा या दोन नद्यांच्या मधील बालेश्वर रांगेवर आहे. त्याजवरच पेमगिरि ऊ० पेमगड किल्ला असून स. १६३३ त शहाजीनें येथें बाल निजामशहाची स्थापना केली. गिरि हें डोंगराचें नांव आणि गड हें किल्ल्याचें नांव. यालाच शहाजीनें '**शहागड**' हें नांव दिलेलें आढळतें;

**प्रौढगड**—( बखर ) ?

**फत्तेगड**—डों. रत्नागिरि, हर्णै बंदराजवळ. सुवर्णदुर्गासमोर.

**फोंडा**—डों. सावंतवाडी, स. १६७५ त शिवाजीनें घेतला.

**बंकापूर**—धारवाडचे द० ४०.

**बक्षिंदाबक्ष**—कोंडाणा पहा.

**बद्रुद्दीन** ऊ० **सांक्षी** ऊ० **दर्ग्याचा किल्ला**—छा. कुलाबा, पेणच्या ई. ५.

**बदामी**—भू. विजापूर, दोन बाजूंस दोन डोंगरी किल्ले, एक भांडेकोट आणि दुसरा रणमंडळकोट, मध्यें मुख्य किल्ला भुईकोट. पराक्रमी चालुक्य राजा दुसरा पुलकेशी याची विस्तीर्ण राजधानी येथें होती, चिनी प्रवाशी हुएन्त्संग वर्णन देतो. स. १३४० त बांधला गेला.

**बलवंतगड**—डों. ठाणें, शहापुरच्या ई० २५.

**बल्लाळगड**—डों. ठाणें, उंबरगांवचे पू० १०.

**बस्तीगड**—छा. बेळगांव, गोकाकचे उ० २.

**बहादुरगड**—छा. नगर, श्रीगोंदें तालुक्यांतील पेडगांवाजवळ भीमानदीच्या वळणावर. स. १६७२ त बहादुरखान कोका यानें बांधिला.

**बहिरवगड** ऊ० **सारंगा**—डों. ठाणें, मुंब्र्याचे पू० २२, नाणें घांटांत. यास "**भाई रामगड**" असेंही नांव आहे.

**बहिरवगड**—डों. रत्नागिरि, चिपळूणजवळ सह्याद्रीचे माथ्यावर.

**बहिरवगड**—छा. रत्नागिरी, देवगड तालुका, डिगवळें गांवांत.

**बहुला** ऊ० **बहुलगड**—डों. नाशिकचे नै० १०.

**बागलकोट**—भू० विजापूरचे द० ४५. पेशवाईत येथें टांकसाळ होती.

**बाणकोट**—( फोर्ट व्हिक्टोरिया ) छा. रत्नागिरि सावित्री नदीच्या दक्षिण मुखावर. स. १७३३ त बाजीरावानें हबशांपासून जिंकून घेतला. इंग्रजांनीं फोर्ट व्हिक्टोरिया नांव दिलें.

**बांदें**—छा. सावंतवाडीचे द० ६. तेरेखोल नदींवर.
**बावडा ऊ. गगनगड**—डों. गगनगड पहा. कोल्हापुरला लागूनच दुसरें एक बावडा गांव आहे, तेथें किल्ला नाहीं.
**बावधन**—डों. सातारा, वाईचे द० २.
**बाहें**—डों. सातारा, पेठच्या ई० ५.
**बिजगरणीगड**—हनुमंतगड पहा.
**बिरवाडी**—डों. कुलाबा, रोह्याचे नै० ६. सीदीच्या बंदोबस्ताकरितां शिवाजीनें स. १६४८ त बांधिला. स. १७३३ त बाजीरावानें हबशांपासून जिंकून घेतला.
**बेदर**—भु. स. १३९३ त अहमदशहा बहामनीनें बांधिला.
**बेलापूर**—डों. ठाणें, पनवेल खाडीचे मुखाशीं पनवेलचे प० ५. बेट व किल्ला.
**बेलूर**—भु. विजापूर, बदामीचे आ० ९.
**बेळगांव ऊ० अजिमनगर**—भुईकोट. इंग्रजसरकारनें मुंबई इलाख्यांत मुद्दाम राखून ठेविलेल्या ६ किल्ल्यांपैकीं एक. असदखान लहरीनें स. १४८१ त बांधिला. पण गॅझेटियरकार याकुबअलीनें स. १५३० त बांधिला असें म्हणतात. सन १६७३ त हुबळीच्या स्वारींत शिवाजीनें घेतला.
**बैराम** किंवा **भाईराम**—**बहिरवगड** ऊ० **सारंगा** पहा.
**बोरगांव**—डों. सातारा, ता० वाळवें, इस्लामपूरच्या ई० ५.
**ब्रह्मगड**—( बखर ) ?
**भगवंतगड**—डों. रत्नागिरि, ता० मालवण फोंड सावंताचे प्रतिस्पर्धी बावडेकर यांनीं स. १७०१ त बांधिला, भगवंतगड आणि भरतगड हे दोन किल्ले कालावली नदीच्या तीरावर समोरासमोर आहेत.
**भरतगड**—डों. रत्नागिरि, भगवंतगडासमोर मसुरें गांवानजीक. स. १६७० मध्यें शिवाजीनें पाहणी केली, पण पाण्याचे अभावीं किल्ला बांधण्याचें रद्द केलें. फोंड सावंतानें स. १७०१ त विहिरीस पाणी लागल्यामुळें किल्ला बांधला.
**भवनगड**—डों. ठाणें, केळवें माहीमचे द० ४ किनाऱ्यालगत.
**भवाळगड**— ?
**भवानगड**—छा. रत्नागिरि, संगमेश्वरचे ई० ६. चिखली गांवाजवळ.
**भास्करगड**—नासिक, इगतपुरीचे द० ८.

**भीमगड**—डों. बेळगाव, खानापूरचे नै० १६. तनाली गांवांत गोंव्याच्या हद्दीवर. खेळे घाटावर मारा होतो. सभोंवार ३०० फूट खोल कडे तुटलेले आहेत. स. १६८० त शिवाजीचे ताब्यांत होता.

**भीमगड**—शहागड पहा.

**भीवगड ऊ० भीमगड** डों. कुलाबा, कर्जतचे पू० ४.

**भुलेश्वर**—दौलतमंगळ पहा.

**भूधरगड ऊ० भुजबळ**—डों. कोल्हापूरच्या द० ४० व आजऱ्याच्या उ० १५. स. १६६७ त शिवाजीनें दुरुस्ती केली.

**भूपतगड**—डों. ठाणें, माहुलीचे उ० २५.

**भूपतगड**—डों. ठाणें, जिल्हा आणि जव्हार संस्थानचे सरहद्दीवर जव्हारच्या आ. ८.

**भूपाळगड**—डों. सातारा, खानापूरचे पू० १५. स. १६७९ त संभाजीनें बंड-खोरपणा करून हा किल्ला बळकावला होता.

**भूमंडनगड**—( बखर ) ?

**भूषणगड**—डों. सातारा, औंधच्या आ० ६. सिंहराज ऊ. सिंघण ( स. १२१०–१२४७. ) यानें बांधिला.

**भैरवगड**—डों. सातारा, पाटणचे नै. २०. सह्याद्रीचे माथ्यावर.

**भैरवगड**—डों. कोल्हापूर, बावड्याचे द. १५.

**भोरगड**—धैरगड पहा.

**भोरप ऊ. सुधागड**—डों. भोर संस्थान पालीच्या पू. ४. सन १६४८ त नारो मुकुंदानें मर्दुमीनें घेतला.

**मकरंदगड**—डों. सातारा, महाबळेश्वरचे नै० ७. स. १६५६ चे सुमारास शिवाजीनें बांधिला. वासोट्यापासून प्रतापगडपर्यंतच्या रांगेंत.

**मकराणगड**—डों. रत्नागिरि, खेडजवळ.

**मंगळगड**—कांगोरी पहा.

**मंगळवेढा**—भु. सांगोलें पंढरपूरचे द. १३. स. १६८६ पर्यंत विजापूरकराचे ताब्यांत होता.

**मंचनगड**—( बखर ) ?

**मच्छिंद्रगड**—गोरखगड पहा.

**मच्छिद्रगड**—डों. सातारा, कऱ्हाडच्या आ. ११. स. १६७६ त शिवाजीनें बांधिला.

**मंडणगड**—डों. रत्नागिरि, बाणकोटच्या पू० १२. ' जांबा ' पहा.

**मंदरगड**—( बखर ) ?

**मजारी**— ?

**मदगिरि**—भु. म्हैसूर, हरिहरच्या द०

**मदगिरि ऊ० मादगड**—डों. कुलाबा, जंजिऱ्याचे द० १२. स. १७३३ त बाजीरावानें हबशांपासून जिंकून घेतला.

**मदनगड**—डों. नासिक व ठाणें या जिल्ह्यांच्या सरहद्दीवर. अलंगकुलंग या किल्ल्यांचे दरम्यान.

**मनमोहनगड ऊ० केळंजा**—डों. भोरचे द० रायरेश्वरच्या डोंगरासमोर स. १६७४ च्या एप्रिलांत शिवाजीनें घेतला. प्रथम कान्होजी जेध्यानें मलिकंबरास घेऊन दिला.

**मनरंजनगड**—राजमाचीचा पोटभाग, राजमाची पहा.

**मनरंजन**—डों. कुलाबा, धरमतर खाडीच्या रेवस बंदरचा किल्ला, स. १६५८ त शिवाजीनें बांधिला.

**मनसंतोषगड**—डों. कोल्हापूर राज्य, मनोहरगडाजवळ. या दोन किल्ल्यांमध्यें २०० यार्डांची खोल दरी आहे.

**मनोर**—डों. ठाणें, पालघरचे पू० ५.

**मनोहरगड**—डों. सावंतवाडीचे ई. १५. रांगण्याच्या द. पांडवांच्या वेळचा आहे, अशी आख्यायिका सांगतात. अतिशय मजबूद आणि म्हणून दुर्गम आहे.

**मनोळी**—छा. बेळगांव, सौंदत्तीच्या उ. ६. मलप्रभा नदीच्या वळणावर. मनोळी व चिकोडी या दोन तालुक्यांचा वाद पेशवे व कोल्हापूरकर यांजमध्यें सुमारें ५०।७५ वर्षे चालू होता.

**मयूरखंडी**—मार्किंडा पहा.

**मयूरगड ऊ. नवलगुंद**—भु. धारवाडचे दक्षिणेस.

**मर्दनगड**—( बखर ) ?

**मलंगगड**—डों. ठाणें, कल्याणचे द. १०.

**मल्लिकार्जुन**, डोंगर—सातारा, कऱ्हाडचे नै. १२. देवस्थान आहे.

**मल्हारगड ऊ. सोनोरी**—डों. पुणें, सासवडचे उ. सोनोरी गांवच्या हद्दींत, दिवेघांटाचे पूर्वेकडील अत्युच्च शिखरावर. भिंवरावप्रभृति पानशे बंधूंनीं स. १७७५ त आपला कुलस्वामी मल्हारी याच्या नांवें बांधिला.

**मसूरगड**—छा. धारवाड, राणीबेन्नूरचे द. २०. स. १६३६ मध्यें आदिलशाहीं-तील एका सरदारानें बांधिला.

**महत्गड**—नरगुंद पहा.

**महादेवगड**—डों. रत्नागिरि, आंबवलीपासून १॥ मैल. सावंतवाडीचे ईशान्येस, पारपोळी घांटावर.

**महाराजगड**—( बखर ) ?

**महिपतगड**—डों. रत्नागिरि, खेडच्या ई० १२. हातलोट घांटावर. नैसर्गिकच मजबूद. शिवाजीनें या किल्ल्याचें बांधकाम अपुरेंच ठेविलें असें म्हणतात.

**महिपालगड**—डों. बेळगांवच्या प० १०.

**महिमंडनगड**—डों. सातारा, जांवळी ता०, मेढ्याचे प०

**महिमानगड**—डों. सातारा, दहिवडीच्या प० ५. शिवाजीच्या राज्याची पूर्वसीमा.

**महिमतगड**—डों. रत्नागिरि, देवरुखच्या पू०, निगुडवाडी गांवाजवळ, कुंडी-घाटापासून अडीच मैल.

**महीन्द्रगड**—( बखर ) ?

**माइनगड**—छा. सोंधें संस्थानांत.

**माचाळ**—डों. रत्नागिरि, संगमेश्वर ता. देवरुखचे आ० १२. या टेकडीवर मुचकुंद ऋषींची गुहा आहे. विशाळगडास लागून हा पश्चिमेस डोंगर आहे.

**मांचीगड**—हनुमंतगड पहा.

**मांढरदेव**—डोंगर—सातारा, वांईच्या उ० ६; शंभु महादेव डोंगरांतील शिखर.

**माणिकगड**—डों. कुलाबा, पनवेलच्या आ० १५.

**माणिकपुंज**—डों. नासिक, नांदगांवचे द० ६.

**मादगड**—मदगिरि पहा.

**मानगड**—डों. कुलाबा, माणगांवचे ई० ८. शिवाजीनें बांधिला अशी आख्यायिका आहे.

**मार्कंडा ऊर्फ मयूरखंडी**—डों. नासिक, ता. कलवण सप्तशृंग ऊ० चतुःशृंगीचे डोंगरासमोर कळवणचे नै. १२. रावळ्याजावळ्या डोंगराजवळ स. १६७१ त शिवाजीनें घेतला. ( जे. श. )

**मार्तंडगड**—( बखर ) ?

**मालवण ऊ० सिंधुदुर्ग**—जं. रत्नागिरि, मालवणजवळ सिंधुदुर्ग पहा.

**मालेगांव**—भु० नासिक, नांदगांवचे द. ६. गिरणा व मोसम अथवा मोक्षगंगा या नद्यांच्या संगमापासून १ मैल. यास तीन कोट असून अगदीं बाहेरचा नदीच्या बाजूनें दगडी आणि शहरच्या बाजूनें मातीचा होता. कोट पडून सध्यां मातीचे बुरूज दिसतात. हा किल्ला बांधण्यास १० वर्षे लागलीं व दिल्लीच्या कारागिरानें काम केलें असें म्हणतात. एका काळीं "खानदेशाची किल्ली" अशी याची ख्याति होती. नारो शंकर राजेबहाद्दरनें स. १७६५ त बांधिला. ( इ. सं. जु. गो. १–२० )

**माहीम**—डों. ठाणें, पोर्तुगीजांनीं आरमारी बंदोबस्ताकरितां तटबंदी केली. वसईपासून डहाणूपर्यंत पुष्कळ ठिकाणीं अशी तटबंदी केलेली आहे.

**माहुली**—डों. ठाणें, शहापूरचे वा. ४. किल्ल्यास तीन शिखरें आहेत. उत्तरभागीं पलासगड, मध्यभागीं माहुली आणि दक्षिणेस भंडारगड. शिवाजीनें स. १६६५ त औरंगजेबास दिलेल्या किल्ल्यांपैकीं एक. स. १६६५ त मनोहरदास किल्लेदारानें याची नवीन बांधणी केली.

**मिरज ऊ० मूर्तुजाबाद**—भु. मिरज, आसदखान लहरीनें स. १४८१ त बांधिला. पटवर्धन सरदारांचें मुख्य ठिकाण.

**मिरा ऊ. मुडा,** डोंगर—पेणच्या पू. स. १६६२ त येथें नामदारखान या मोगल सरदारावर शिवाजीनें हल्ला केला.

**मुद्गल**—छा. रायचूरच्या प. ५०.

**मुंदर्गी**—छा. धारवाड, गदगचे आ. २५.

**मुरगोड**—छा. बेळगांव, सौंदत्तीचे वा. २५.

**मुरुमदेव**—राजगड पहा.

**मुल्हेर**—डों. नासिक, सटाणा ता. मालेगांवचे वा. ४०. पश्चिमेस हातगड व पूर्वेस मोरा आणि मध्यभागीं मुल्हेर असे हे तीन किल्ले जवळजवळ आहेत. साल्हेर–मुल्हेरची प्रसिद्ध लढाई स. १६७१ त झाली.

**मृगगड**—बखर ( ? )

**मैमतगड**—महिमतगड पहा.

**मोमिनाबाद**—चाणक पहा.

**मोरगिरि**—गुणवंतगड पहा.

**मोरा**—मुल्हेर पहा.

**मोहनगड**—( मनमोहन ? )—( बखर ) ?

**यमकनमर्डी**—छा. बेळगांव, चिकोडीचे द. २०. स. १७८० त कोल्हापूरकरांचे मामलतदार वीरपंत अंबाजी यांनीं लगतचें शहर वसविलें, असें म्हणतात.

**येलूरगड**—डों. बेळगांवच्या आ. ७.

**यवतेश्वर,** डोंगर—साताऱ्याचे प. २. देवस्थान.

**यशवंतगड ऊ. रेडी**—डों.—रत्नागिरि, स. १६६२ त शिवाजीनें बांधिला. जैतापुराजवळ रेडी नांवाचा दुसरा डोंगर व किल्ला आहे.

**यादवाड**—छा. बेळगांव, ता० गोकाक.

**येळवत्ती**—छा. सांगली, शिरहट्टीचे वा० ७. शिरहट्टीच्या देसायानें १७ व्या शतकाच्या सुरुवातीस बांधिला.

**रखसगी**—छा. विजापूर, हुनगुंदचे प० ५. तटबंदी गांव; हें व तंगडगी या दोन नांवांवरून ' राक्षसतागडी ' हें नांव तालीकोटच्या लढाईस मिळालें.

**रंजनगड**—( बखर ) ?

**रतनगड**—डों. नगर, आकोल्याचे प० १८. स. १७६३ मध्यें राघोबापक्षाच्या जावजी कोळ्यानें हस्तगत केला होता.

**रतनगड ऊ० न्हावी किल्ला**—डों. नासिक, मुल्हेरच्या पू० ६. सटाण्याच्या वा० १५.

**रतनगड**—छा. कुलाबा, पेणचे आ० ६.

**रत्नागिरि**—डों. रत्नागिरि बंदराचें संरक्षण करतो. बहामनी अंमलांतील. शिवाजीनें स. १६७० त दुरुस्ती केली.

**रवळागड ऊ. रावळ्या-जावळ्या**—डों. नासिक, दिंडोरीच्या ई० १५.

**रसाळगड**—छा. रत्नागिरि, खेडच्या ई० ७.

**रहिमतपूर**—छा० सातारा, कोरेगांवच्या द० ८. रणदुल्लाखानाची मृत्युभूमि.

**रांगणा**—प्रसिद्धगड पहा.

**राग्वा**—प्राचितगड ( रत्नागिरि ) पहा.

**राजकोट**—छा. रत्नागिरि, सिंधुदुर्गाचे संरक्षणार्थ किनाऱ्यावरील किल्ला. मालवणचे हद्दींत आहे. तिन्ही बाजूंनीं समुद्र आहे.

**राजकोट**—छा. कुलाबा, चौलबंदरचा किल्ला. हा संभाजीनें स. १६८२ त बांधिला.

**राजगड ऊ० किल्ले मुरुमदेव**—डों. पुणें, भोरचे वा० २०. दुरजा देवीच्या डोंगरावर पहाडच्या तीन सुळक्यांवर ( " सोंडा " ) सुवेळा, संजीवनी व पद्मावती या तीन माच्या बांधिल्या. " मुरबाद म्हणोन डोंगर होता त्यास वसविलें. त्याचें नांव राजगड म्हणोन ठेविलें " ( १६४६ ) सभासद बखर.

**राजमाची**—डों. पुणें, बोरघांटाचे उ० ६. याचीं दोन शिखरें श्रीवर्धन (आंतील), मनरंजन ( बाहेरील ). पैकीं श्रीवर्धन पूर्वेकडचें. दोहोंसही तटबंदी आहे. कोंकणच्या बाजूनें उंची २००० फूट.

**राजापूर**—छा. रत्नागिरि, येथें इंग्रज व फ्रेंच यांचीं व्यापाराचीं ठाणीं होतीं. शिवाजीनें राजापूरची पेठ स. १६६१ त लुटली.

**रामगड ऊ. रामदुर्ग**—छा. रत्नागिरि मालवणचे ई० १५. बेलें बुद्रुक जवळ.

**रामदुर्ग**—भु. बेळगांवच्या आ. शिवाजीनें बांधिला असें म्हणतात. स. १६९२ त औरंगजेबानें घेतला होता. तो पुढें रामराव भावे यांनीं परत मिळविला. नरगुंदकर भाव्यांचा हा मूळपुरुष होय.

**रामदुर्ग ऊ. भुजबळ**—भु. रायचूरच्या वा० २०.

**रामसेजगड**—डों. नासिक, दिंडोरीच्या द० ७.

**रायगड ऊ. रायरी**—डों. कुलाबा, महाडच्या उ. १६. रायरी शिवाजीनें प्रथम जंजिऱ्याचे सीदीपासून स. १६४६ त घेतली. त्यानंतर मोऱ्यांनीं रायरीचा आश्रय केल्यामुळें स. १६५६ त मोऱ्यांस काढून शिवाजीनें डोंगर आपल्या ताब्यांत घेतला. स. १६६२ त शहाजी व शिवाजी या दोघांनीं दक्षिणेंतील किल्ले तपासले. त्यांत हा डोंगर मजबूद पाहून व " गड ब्रहुत चखोट, चौतर्फा गडांचे कडे ताशिल्याप्रमाणें, दीड गांव उंच, पर्जन्यकाळीं कडियावर गवत उगवत नाहीं, आणि धोंडा तासीव एकच आहे. असें देखोन बहुत संतुष्ट जाले आणि बोलिले, तक्तास जागा गड हाच करावा."

( सभा. पृ. ७१ ) असा उभयतांनीं निश्चय करून वाडे, सदरा, चौसोपे वगैरे इमारती बांधिल्या आणि राजगडाहून रायरीस राजधानी नेली. सुरतेची लूट तेथेंच आणली. औरंगजेबाचे भेटीस शिवाजी तेथूनच गेला आणि सुटकेनंतर पुण्याहून समारंभाची स्वारी काढून मातु:श्रीस भेटण्यास रायरीस आला. भूषण कवीची भेट याच वेळीं झाली. सुप्रसिद्ध राज्याभिषेकोत्सवही याच स्थळीं झाला. स. १६८९ त झुल्फिकारखाननें हा किल्ला पाडाव केल्यानंतर ' **इस्लामगड** ' असें नांव ठेवण्यांत आलें.

**रासुबाईगड**—छा. बेळगांव, चिकोडीच्या नै० १५.

**रुद्रमाळ**—पुरंदर पहा.

**रेडी**—डों. रत्नागिरि, वेंगुर्ल्याचे द० ८.

**रेडी**—यशवंतगड पहा.

**रेवदंडा**—जं. कुलाबा, रोह्याचे खाडीच्या मुखाशीं उत्तरेस.

**रोहणगड**—डों. औरंगाबादेहून बाळापुरास जाणाऱ्या घांटांतील खिंडीचे द्वारावर. येथें शहाजहान आजारी पडून स. १६२५ त येऊन राहिला. ( बेणीप्रसाद–जहांगीर )

**रोहिडा ऊ० विचित्रगड**—डों. पुणें, भोरच्या नै० ४, हिरडसमावळचे देशमुख बांदल यांच्या ताब्यांतील किल्ला. शिवाजीचें व बांदलांचें युद्ध झालें. स. १६४६ त किल्ला घेतला. त्याच वेळीं बाजी देशपांडे प्रसिद्धीस आला.

**लिंगाणा**—डों. कुलाबा, महाडच्या ई. १४. रायगड व तोरणा यांच्या मधोमध रायगडच्या पू. ४. हें सह्याद्रीचें शिखर लिंगाच्या झ० पिंडीच्या आकृतीचें असल्यामुळें शिवाजीनें लिंगाणा असें नांव ठेविलें, ( स. १६४८ ). मराठशाहींत या किल्ल्यांत कैदखाना असे. खडकांत कोठड्या खोदल्या असून प्रत्येकांत ५० कैदी राहण्याची सोय होती.

**लोहगड**—डों. पुणें, खंडाळ्याचे आ. ८, व कार्ल्यांचे द. ४. शिवाजीनें स. १६४८ त घेतला. नांवाप्रमाणेंच मजबूद आणि बांका. उत्तरपेशवाईत नाना फडणिसाकडे असे.

**वज्रगड**—पुरंदर पहा.

**वजीरगड**—डों. ठाणें, वसईरोड स्टेशनच्या प० ३. माणिकपुरचे पश्चिमेस किनाऱ्यालगत.

**वणी**—छा. नासिक, दिंडोरीचे उ. १३.

**चंदनगड**—डों. साताऱ्याचे प. १५. चंदनवंदन पहा. या किल्ल्यावर कांहीं दिवस तुळाजी आंग्रे कैदेंत होता.

**वनगड**—( बखर ) ?

**वर्धनगड**—डों. सातारा, कोरेगांवच्या ई. ७. स. १६७३ त शिवाजीनें बांधिला.

**वल्लभगड**—डों. बेळगांव, चिकोडीच्या नै. १५. हरगापूर असेंही नांव आहे.

**वसई**—छा. ठाणें, खाडीचे मुखावर. गुजराथच्या सुलतानानें ( महंमूद बेगडा, स. १४५८–१५११ ) चांचे व पोर्तुगीज यांच्या बंदोबस्तासाठीं बांधिला. पोर्तुगीजांनीं चढाई करून मूळच्या तटाची पाडापाड केली व स. १५३६च्या सुमारास नवीन बांधकाम केलें. स. १७३९ त चिमाजी आपानें काबीज केला.

**वसंतगड**—डों. सातारा, कऱ्हाडच्या वा. ५. स. १६५९ त शिवाजीनें घेतला.

**वाघेडा**—छा. नासिकचे वा. २३.

**वारुगड**—डों. सातारा, दहिवडीच्या वा. १२. शिवाजीनें बांधिला.

**वासोटा** ऊ. **व्याघ्रगड**—डों. सातारा. तांबीगांवाच्या प. ५. फार जुना आणि दुर्गम. स. १६६० मध्यें शिवाजीनें घेतला.

**विकटगड**—पेब पहा.

**विचित्रगड**—रोहिडा पहा.

**विजयगड**—डों. रत्नागिरि, शास्त्री नदीचे उत्तर तीरावर, जयगडसमोर.

**विजयदुर्ग**—घेरिया पहा.

**विजापूर**—अर्क पहा.

**वितंडगड**—तिकोना पहा.

**विशाळगड**—खेळणा पहा.

**विशाळगड**—डों. ठाणें, कर्जतच्या वा. १० व चौकच्या उ. ३.

**विश्रामगड** ऊ. **कुर्डुगड**—छा. कुलाबा, माणगांवचे ई० १३.

**विश्रामगड**—पट्टा पहा.

**विसापूर**—डों. पुणें, कार्ल्याचे द. ३. लोहगडजवळ. हा किल्ला बाळाजी विश्वनाथानें बांधिला.

**वीरगड**—घोसाळा पहा.

**व्हिक्टोरिया**—बाणकोट पहा. हें नांव इंग्रजांनीं दिलें.

**वेंगुर्लें**—छा. रत्नागिरि, पोर्तुगीज व्यापाऱ्यांचें तटबंदीचें ठाणें.

**वेताळगड**—छा. रत्नागिरि, मालवणचे पूर्वेस पेंडूरनजीक.

**वेरसावें**—छा. ठाणें, मालाडचे नै० ३. समुद्रकिनाऱ्यावर.

**वैराटगड**—डों. सातारा, वांईच्या द० ६.

**व्यंकटगड**—व्यंकटगिरि ?

**व्याघ्रगड**—वासोटा पहा.

**शहागड**—छा. नगर, ता० शेवगांव, गोदावरीचे उत्तरतीरीं राक्षसभुवनचे समोर निजामशाही हद्दींत हा किल्ला आहे. औरंगाबादचे द० ४०. शहाजी भोसल्यानें ' शहागड ' असें नांव दिलें, अशी आख्या आहे. दुसरा शहागड प्रेमगिरि पहा.

**शार्ङ्गगड**—( जिंजी ? )—( बखर ) ?

**शिंगणापूर ऊ० शिखर शिंगणापूर**—डोंगर, सिंघणराजाच्या कारकीर्दींत यास महत्त्व प्राप्त झालें. जैत्रपाळाचा मुलगा सिंहराज ऊ० सिंघण ( स.१२१०-१२४७ ) यानें सिंघणापूर गांव वसविलें. कोल्हापूरच्या भोजराजाशीं लढत असतां त्याची छावणी या प्रदेशीं होती. सिंघणापूर अथवा सिंगणापूरचा महादेव हें अनेक मराठ्यांचें कुलदैवत आहे. खुद्द शिवाजीचें म्हणजे भोसले कुळाचेंही हेंच कुलदैवत असून मालोजीनें याच स्थळीं यात्रेकरूंसाठीं तलाव बांधून देवालयाचा जीर्णोद्धार केला. ( स. १६०० ) बजाजी निंबाळकराचें शुद्धीकरण जिजाबाईनें येथें सन १६५१ नंतर म्हणजे बजाजी विजापुराहून सुटून आल्यानंतर थोड्या दिवसांनीं केलें.

**शिरगड**—छा. ठाणें, माहीमचे उ० ३. किनाऱ्यालगत.

**शिरहट्टी**—भु० सांगली, गदग स्टेशनचे द. १२. सभोंवतीं खंदक आहे.

**शिवगड**—डों. कोल्हापूर, बावड्याच्या द. १०.

**शिवनेर**—डों. पुणें, जुन्नरचे प. अर्धा मैल. शिवाजीचें जन्मस्थान मलिक-उल-तुजारनें स. १४३६ त बांधिला. शिवाजीच्या अमलानंतर बरेच दिवस मोगलांकडे होता. पेशवाईत हा किल्ला घेण्याची खटपट बरेच दिवस चालू होती. लढून हस्तगत होण्यासारखा नाहीं असें पाहून उद्धव वीरेश्वर चितळे याचे विद्यमानें किल्लेदार महमद आलमखान याजकडून विकत घेतला.

( स. १७५६ ) त्याच्या वंशजाकडे बेल्हे हा गांव इनाम आहे. शिवनेर, पारनेर वगैरे मावळांप्रमाणेंच बारा नहरें म्हणजे खोरीं असून त्याचेंच शिवनेर नांव तेथील किल्ल्यास पडलें. जवळ जुन्नरास शहाजहानचा मुक्काम स. १६२७ च्या सबंध सालीं होता.

**शिवेश्वर**--उत्तर कानडा, कारवारचे उ. ७.

**शेगवा, सेगवा**--डों. ठाणें, डहाणूचे पू. १६.

**श्रीगड**--त्रिंबक पहा.

**श्रीमंतगड** ऊ. **सीमांतगड**--भु. सांगली, शिरहट्टीचे द. १०.

**श्रीवर्धन**--राजमाची पहा.

**श्रीवर्धन**--डों. कुलाबा, उरणच्या खाडीच्या मुखाशीं मांडवें बंदरचा किल्ला स. १६५९ त शिवाजीनें बांधिला.

**संजाण**--डों. ठाणें, उंबरगांवचे पू० २.

**सज्जनगड** ऊ० **नवरसतारा**--परळी पहा.

**संतोषगड**--ताथवडा पहा.

**सदाशिवगड**--डों. सातारा, कऱ्हाडचे ई० ४.

**सदाशिवगड**--डों. उत्तर कानडा, कारवारचे उ० २.

**संपगाव**--भु. बेळगांवच्या आ० १८.

**सप्तशृंग**--डो. नासिक, दिंडोरीचे उ० १५.

**समशेरगड**--डों. बेळगांव, खानापूरचे द० ७.

**सर्जेकोट**--डों. रत्नागिरि, राजकोटचे ( रत्ना० ) उत्तरेस किनाऱ्यालगत. उत्तर बाजूस समुद्र व अवशिष्ट तीन बाजूंनीं खंदक आहे.

**सरसगड**--पाली पहा.

**सरसगड**--( बखर, कर्नाटक )

**सहजगड**--( बखर ) ?

**सांक्षी** ऊ० **सांकशी**--बद्रुद्दिन पहा.

**सागरगड**--डों. कुलाबा, अलीबागच्या पू० ६. शिवाजीनें 'खेडदुर्ग' हें नांव बदलून सागरगड ठेविलें.

**सांगली**--भु. जुन्या शहरांत सभोंवार खंदक असून भुईकोट आहे.

**सातारा**--ऊ. **अजिमतारा**--डों. सातारा, भोज शिलाहारानें बांधिला. मुसलमानी अमदानींत राजकीय कैद्यांची जागा. पुढें शाहूनगर राजधानी.

**सामानगड**—डों. कोल्हापूर, गडइंग्लंजचे द. ३॥. स. १६७७ त अण्णाजी दत्तोनें बांधिला.

**सारंगा** ऊ. **सारंगड**—बहिरदगड पहा.

**साल्हेर**—डों. नासिक, सटाण्यापासून २० मैल. बडोदें नासिक रस्त्यावर सोनगडचे जोडीचा अत्यंत मजबूद किल्ला. हे दोन्ही किल्ले डांग देशांतील भिल्लांनीं बांधिले. एकाचें नांव गवाळगड व दुसऱ्याचें सलूरा. सुरत दुसऱ्यांदा लुटून शिवाजी साल्हेरच्या रस्त्यानें परत आला. साल्हेर–मुल्हेरची प्रसिद्ध लढाई व मोरोपंत, प्रतापराव, आनंदराव वगैरेंचें शौर्य हे प्रसंग शिवाजीच्या चरित्रांत महत्त्वाचे आहेत.

**सावंतवाडी**—भु० शहरसंरक्षणार्थ तटबंदी.

**साष्टी**—ठाणें पहा.

**सिद्धगड**—छा. रत्नागिरि, मालवणचे ई० १६.

**सिद्धगड**—ठाणें, मुरबाडचे आ०१०.

**सिंधुदुर्ग** ऊ० **मालवण**—जं. मालवण बंदरांत ' कुरटें ' नांवाच्या बेटांत, किनाऱ्यापासून एक मैलावर. ता० २५ नोव्हेंबर १६६४ रोजीं मुहूर्त करून भूमींत चिरा बसविला. " मार्ग कठीण सर्पाकार, तरांडी होडी मात्र चालते. सभोंवते सारे खडक, दुसरीं तरांडीं तीन कोशपर्यंत यावयास अगदीं गति नाहीं, " अशी बुलंद जागा पाहून दुर्ग बांधिला. बांधकाम गोविंद विश्वनाथ प्रभूनें केलें. " चौऱ्यांशीं बंदरांत हा जंजिरा मोठा " व " अठरा टोपीकरांचे उरावर " अजिंक्य दुर्ग झाला म्हणून मराठ्यांनीं मोठ्या अभिमानानें ' शिवलंका ' असें नांव ठेविलें होतें. या किल्ल्यांत शिवाजीची मूर्ति व देऊळ आहे.

**सिंहगड**—कोंडाणा पहा.

**सुंदरगड** ऊ० **हातगड**—डों. सातारा, पाटणचे. वा० ३.

**सुदर्शनगड**—( बखर ) ?

**सुधागड**—भोरप पहा.

**सुभानमंगळ**—डों. भोर संस्थान. मुसलमानी अमदानींतील शिरवळचा किल्ला.

**सुमारगड**—डों. रत्नागिरि, खेड ता० महिपतगडाचे द० ४. त्याच टेकडीवर.

**सुरंजगड**—( बखर ) ?

**सुरगड**--डों. कुलाबा, रोह्याचे पू० ८

**सुवर्णदुर्ग** ऊ० **सुवर्णगड** ऊ० **सोनगड**--जं. रत्नागिरि, हर्णैच्या उत्तरेस बेटावर, किनाऱ्यापासून पाव मैल आंत विजापूरकरांनीं बांधिला. तो शिवाजीनें स० १६६० त दुरुस्त केला.

**सेगवा**—शेगवा पहा.

**सोनगड**—डों. कुलाबा, महाडचे प० २।३.

**सोनागिरि**—डों. कुलाबा, पेणचे आ० ८.

**सोनोरी**—मल्हारगड पहा.

**सोलापूर**—भु० हसन गंगूनें स० १३१३ त बांधिला. किल्ल्याच्या भोंवतीं सिद्धेश्वर तळें व खंदक आहे. स० १५४४ तील एक शिलालेख हनुमान बुरुजासमोरील तटाच्या आंतील बाजूस आहे. आंत एक " बाळंतिणीची विहीर " आहे. अली अमीनशहानें वेशीचे दोन दरवाजे बांधिले. हा कोट आदिलशाही व निजामशाही सत्तेखालीं आलटून पालटून कैक वर्षें होता. स० १६७१ त दिलेरखान व इलाचीखान या मोगल सरदारांनीं हस्तगत केला. अलंगज कोट औरंगजेबानें स० १६८० त पक्का केला. पुढें स० १७५८ व खल्लेलुद्दीन किल्लेदाराकडून पेशव्यानें रु० २५००० स विकत घेतला. येथें कांहीं दिवस तुळाजी आंग्रे कैदेंत होता; आणि येथेंच तो स० १७८६ त मृत्यु पावला. मराठशाहीच्या अंतकाळीं स० १८१८ त मंडरोल साहेबानें सहा दिवस लढून किल्ला परत घेतला. इंग्रजी अमलांतील पहिला मामलेदार भगवंतराव नांवाचा होता.

**सौंदत्ती**—छा. बेळगांवच्या आ० ४०.

**स्वरूपगड**—( बखर ) ?

**हडसर**—डों. पुणें, जुन्नरचे वा. ८ शहाजीच्या जाहागिरींतील किल्ला स. १६३६ त निजामशाहीच्या अंताबरोबर मोगलांच्या ताब्यांत केला.

**हनुमंतगड**—डों. बेळगांव, खानापूरचे दक्षिणेस, गुंजीजवळ ‘ माचीगड ’ किंवा ‘ बिजगरणीगड ’ अशीं दुसरीं नांवें आहेत.

**हरगापूर**—वल्लभगड पहा.

**हरिश्चन्द्रगड**—डों. नगर, आकोल्याचे नै. १८.

**हरिष, हर्षगड**—डों. नासिक, त्रिंबकचे प. ४. अतिशय दुर्गम. स. १६३६ त मोगलांच्या ताब्यांत गेला.

**हरेश्वर**—देवगड पहा.

**हातगड**—डों. नासिक, मुल्हेरजवळ कलवणचे प० २०. ' मुल्हेर ' पहा.

**हातेगड**—सुंदरगड पहा.

**हानगल**—छा. धारवाडचे द० ५०.

**हिंदोळा**—डों. कुलाबा, मढेघांट उतरून महाडास जातांना वाकी गांवाजवळचा गढीवजा किल्ला. प्रतापगड व राजगड यांवरील संदेश रायगड येथें पोंचविण्यास या ठाण्याचा फार उपयोग होई.

**हिंमतगड**—बाणकोट ( फोर्ट व्हिक्टोरिया ). यासच पुढें मराठशाहींत हिंमतगड असें नांव पडलें.

**हिराकोट**—छा. कुलाबा, अलीबागचे वायव्येस समुद्रालगत. कान्होजी आंगऱ्यानें बांधिलेली किल्लेवजा इमारत.

**हुनूर**—छा. बेळगांव, पवित्रगड, पैझरगड हीं दुसरीं नांवें आहेत. स. १५५० मध्यें कोल्हापूरच्या शिलाहारांनीं बांधिला.

**हुबळी**—भु. धारवाड, जुना व नवा असे दोन कोट आहेत. स. १६७३ त शिवाजीनें हुबळी लुटली.

**हुली**—डों. बेळगांव, सौंदत्तीचे पू. ५. स. १६७४ त शिवाजीनें बांधिला.

**हेळवाक**—कऱ्हाडहून चिपळुणास जाणाऱ्या कोयना कांठच्या रस्त्यावर पाटणच्या पलीकडे कुंभारली घाटाच्या तोंडाशीं हेळवाक गांव आहे. येथें कोयना पूर्ववाहिनी होते. हेळवाकच्या दक्षिणेस कोंढवळें खेडें व त्याच्या पलीकडील अरण्यांत रामदासांची घळ आहे. घळीची लांबी ९८ हात व रुंदी १५ हात. रामदास येथें स. १६७४ च्या पावसाळ्यांत राहिले होते.

# शिवजन्म-तिथि खरी कोणती ?

( ले. प्रो. चिं. गं. भानु. पुणें. )

**नका वाद घालूं फुका वेळ जातो,**
**नको वाद सारा श्रम व्यर्थ होतो ।**
**शिवाजी महात्मा जयें तुष्ट व्हावा,**
**तसा मार्ग संशोधकीं आदरावा ॥ १ ॥**

महाराष्ट्रीय ' स्वराज्याचे संस्थापक ' आणि ' महाराष्ट्र-धर्माचे प्रणेते ' शिवाजी महाराज यांचा जन्म कोणत्या शकांत, कोणत्या महिन्यांत, कोणत्या तिथीला व कोणत्या वारीं झाला, हा प्रश्न आज सुमारें सत्तावीस वर्षे महाराष्ट्रांतील इतिहासप्रेमी लोकांचे व भक्तांचे अंतःकरणांत गोंधळ माजवीत आहे. प्राचीन ग्रीस राष्ट्रांतील आद्यकवि होमर हा कोठें जन्मला, याबद्दल सात शहरांमध्यें स्पर्धा चालली होती, असें म्हणतात. तसेंच तो जन्मला केव्हां, निदान तो हयात तरी कोणत्या शतकांत होता, यासंबंधें इतिहासज्ञांत अद्यापि एकवाक्यता नाहीं. आमच्या मराठ्यांच्या सुदैवानें शिवाजीचा जन्म ' शिवनेरीस ' झाला, यासंबंधें सर्वत्र एकवाक्यता आहे. आतां वाद फक्त शिवाजीच्या जन्मातिथीबद्दल आहे. यद्यपि जन्मस्थान आणि जन्मकाळ कळणें अगत्याचें आहे, व काळस्थलांचा स्पष्ट व बिनचूक निर्देश झाल्याखेरीज ऐतिहासिक प्रसंगाला स्थैर्य येत नाहीं, हें प्रत्येक इतिहास-भक्ताला कबूल असलेंच पाहिजे, तथापि शिवजन्मासारखे कित्येक ऐतिहासिक प्रसंग असे निरुपद्रवी असतात कीं, या जन्मादि प्रसंगांत निरुपायामुळें दोन तीन वर्षांचा फरक पडल्यास इतिहासाची, त्याच्या अभ्यासाची आणि तदभ्यासकांची फारशी मोठी हानि होते, असें मला वाटत नाहीं. आतां खरें आहे कीं, खात्रीचा निःसंदेह प्रमाणशुद्ध बलवत्तर पुरावा मिळालाच, तर आजपर्यंत पौराणिक पद्धतीनें चालत आलेला व मान्य असलेला जन्मादि प्रसंगांचा काल हट्टानें उराशीं धरून बसणें केव्हांही न्याय्य, समंजस व विवेकान्वित होणार नाहीं. मात्र जो पुरावा पुढें येईल, तो अस्सल, खात्रीचा आणि संशयाला थारा न देणारा असला पाहिजे. असला अस्सल पुरावा पुढें आला आहे किंवा कसें याचा विचार मी यथामति, पण प्रांजल बुद्धीनें करणार आहें. 'ही असली रिकामी

उठाठेव कशाला ?' असे प्रश्न टाइम्स ऑफ इंडियाचे संपादक व वऱ्हाडांत नामांकित असलेले माझे एक अत्युदार स्नेही करतात. ह्या व इतर पृच्छकांस माझें एकच उत्तर आहे. तें हें कीं, ज्याप्रमाणें रामशास्त्र्यांसारखा न्यायाधीश जुन्या व नव्या पुराव्यांचा चिकित्सापूर्वक विचार करून आपला अभिप्राय देतो, त्याप्रमाणेंच प्रत्येक विमर्शी इतिहासाभ्यासी विद्यार्थ्यानेंही नवीन सांपडलेला पुरावासुद्धां पारखणें हें त्याचें कर्तव्य आहे. मात्र, पाठीमागून चालत आलेल्या पुराव्याचा सर्वस्वी बाध करण्याला नवीन पुरावा जोंपर्यंत समर्थ नाहीं, तोंपर्यंत रूढ झालेला सिद्धांत अथवा समजूत बहिष्कृत करणें अथवा बहिष्कृत करण्याचा प्रयत्न करणें केव्हांही न्याय्य व लोकसंमत होणार नाहीं. पतिनिधनानंतर त्याच्या स्त्रीनें सती जाणें किंवा त्या स्त्रीला जबरीनें सती घालविणें हें अवैदिक धर्मीयांना कितीही घातुक व अमानुषी वाटत असलें, तरी जावत्कालपर्यंत 'सती जाणें व घालविणें' हा गुन्हा आहे, असें सरकारनें कायदा करून ठरविलें नाहीं, तोंपर्यंत 'सती' निघाली कीं 'घाल तिला तुरुंगांत' असें कोणत्याही राजाला, व्हाइसरॉयाला किंवा मिशनऱ्याला किंवा ब्रह्मोला म्हणतां येणार नाहीं व करतांही येणार नाहीं. तात्पर्य, अस्सल पुराव्याच्या साह्यानें इतिहासज्ञांची व सामान्यतः समंजस जनांची खातरी पटवून दिल्याशिवाय रूढि-प्रणीत कालस्थलप्रसंगांमध्यें क्रांति करणें आततायीपणाचें होईल.

२ आतां, जुन्या व नवीन पुराव्यांचें तारतम्य पाहण्याचे अगोदर जुने पुरावे कोणते व नवे कोणते, यांचा निर्देश करितों.

## जुने पुरावे; बखरी अगर यादी

| | श. | इ.स. | | श. | इ. स. |
|---|---|---|---|---|---|
| १ सभासदी बखर | १६१९, | १६९७ | १० नागपूर० भोसले | १७४४, | १८२२ |
| २ चित्रगुप्त व. | १६८१, | १७५९ | ११ छे. व. यादी | ,, ,, | ,, ,, |
| ६ ९१ (९६ ?)कलमी व. | १७८२, | १७८० | १२ शिवप्रताप | १७५१, | १८२९ |
| ४ राजवाडे खं. ४ व. | १७०४, | १७८२ | १३ रामदास शकावली | १७५३ | स.१८३१ |
| ५ प्रभानवल्ली | १७२०, | १७९८ | १४ विजयदुर्ग ,, | ,, १७५७, | ,,१८३५ |
| ६ धडफळे यादी | १७२९, | १८०७ | १५ पंतप्रतिनिधी व. | ,, १७६६, | ,,१८४४ |
| ७ मल्हाररावकृत | १७३२, | १८१० | १६ पंडितराव ब. | ,, १७७०, | ,,१८४८ |
| ८ म. साम्रा. छो. | १७३९, | १८१७ | १७ शेडगांवकर व. | ,, १७७६, | ,,१८५४ |
| ९ शिवदिग्विजय | १७४०, | १८१८ | | | |

## नवे पुरावे; बखरी व यादी.

| | शक | सन | | शक | सन |
|---|---|---|---|---|---|
| १ शिवभारत | १५९६, | १६७४ | ६ थेव्हेनो प्रवासवृत्त. | १५८९, | १६६७ |
| २ राज्याभिषेक, शकावली | ,, , | १६७४ | ७ ऑर्मचा इतिहास | १७०५, | १७८३ |
| ३ फोर्ब्स् कलेक्शन | ,, , | ,, | ८ स्प्रिंजलचा ,, | १७०४, | १७८२ |
| ४ **जेधे शका०** | १६१९, | १६९७ | ९ तंजावर शिलालेख | १७२५, | १८०३ |
| ५ दासपंचायतन श० | १६१८, | १६९६ | | | |

३ वर उल्लेखित केलेले सर्व जुने व नवे पुरावे इ. स. १९२५ मध्यें 'भारत–इतिहास–संशोधक–मंडळ'पुरस्कृत 'शिवचरित्रप्रदीप' नामक ग्रंथ मोठे परिश्रम करून तयार केला व प्रसिद्ध केला, त्याच्या मात्र आधारानें घेतले आहेत.

(अ) जुन्या पुराव्यांच्या संग्रहांत अंक ५, ६, ११, १२ व १४ खेरीज करून बाकी सर्व बखरी आहेत हें वाचकांनीं विसरून चालणार नाहीं. त्यांतही अंक १ ची सभासदी बखर ही मात्र 'शिवकालीन' म्हणजे, श्री. द. वि. आपटे यांच्या म्हणण्याप्रमाणें, इ. स. १७०८ च्या आधींची आहे. बाकीच्या सर्व बखरी, यादी, शकावल्या शिवनिधनोत्तर ८० पासून १७४ वर्षांनीं लिहिलेल्या आहेत; अर्थात् 'शिवकालीन' जुना पुरावा एकच म्हणजे 'सभासद' बखरीचा आहे आणि ती बखर शिवजन्माचा साक्षात् उल्लेख न करितां 'वयाच्या बाराव्या वर्षीं राज्यसाधनाच्या कार्याला शिवाजीनें आरंभ केला' अशा अर्थाचें वाक्य उपयोजिते!

(आ) नव्यानेंच श्री. द. वि. आपटे व त्यांचे साह्यकारी यांनीं पुढें आणलेल्या पुराव्यांतील इतिहास, शकावल्या वगैरे लेख १—७ श्री. आपट्यांच्या लक्षणान्वयें 'शिवकालीन' आहेत. स्मरणार्थ अथवा व्यावहारिक उपयोगासाठीं 'शिवकालीन' व पेशवेकालीन कित्येक लोक मोठमोठ्या प्रसंगांचे 'शक' टिपून ठेवीत, ही गोष्ट आमच्या पूर्वजांस भूषणावह होय. 'हिंदू लोकांस इतिहासाचें व राजकीय घडामोडींचें महत्त्व मुळींच कळत नाहीं,' असें म्हणणाऱ्या वावदुकांचें 'मुखविधान' करण्याला 'जेधे शकावली,' 'राज्याभिषेक शकावली,' प्रभृति टिप्पणें, हीं उत्कृष्ट साधनें होत.

४. 'जेधे शकावली' उजेडांत आली, तेव्हांपासून शिवजन्मतिथीची ऐतिहासिक चर्चा जोरानें सुरू झाली. त्यापूर्वीं 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' उजेडांत आणणारे निर्भीड व निर्भीक कै० श्री. राजवाडे यांनीं बखरींतील ऐतिहासिक प्रसंगांची पूर्वापरता पारखून पाहतांना कित्येक ऐतिहासिक तिथींची शास्त्रोक्त चर्चा

केलीच होती. कै० लो० मा० टिळक यांनींही इ. स. १९०० च्या एप्रिल महिन्यांतील तारिख २४ च्या केसरींत या प्रश्नाचा तात्पूर्तिक निर्णय देतांना " ता. ६ एप्रिल १६२७ ही ' शिवजन्मतिथि ' असावी " असा ' श्री शिवदिग्विजयां'तील श्लोकांची संगति लावून शेरा दिला आहे आणि शालिवाहन शकाच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे शके १५४९ प्रभवनाम संवत्सर वैशाख शु॥ प्रतिपदा, गुरुवार, उत्तर रात्र, अश्विनी नक्षत्र, असा दिवस येतो, असा निर्णय केला आहे. अर्थात् शके १५४९ वैशाख शु॥ ५ सोमवार रोहिणी नक्षत्र ही श्री. राजवाड्यांची तिथि 'वारानें व नक्षत्रानें जुळत नाहीं' असा लो. मा. चा अभिप्राय पडला. परंतु 'राधामाधव विलास चंपू ' नामक काव्य संपादितांना यद्यपि ' जेधे शकावली ' श्री. राजवाड्यांच्या दृष्टीस पडली होती, तथापि तिचा इनकार त्यांनीं केला आणि १५४९ चा वैशाख ( इ. स. १६२७ चा वैशाख ) हीच मित्ती कायम ठेविली. जेधे शकावली प्रसिद्ध झाल्यावर कै. वासुदेवशास्त्री खरे यांनीं मात्र १५५१ फाल्गुन वद्य तृतीया ( इ. स. १६३० मार्च ) ही तिथि प्रमाण मानली आहे. तसेंच इतिहाससंशोधक-मंडळांतील श्री. सरदार मेहेंदळे, प्रो० पोतदार, श्री. द. वि. आपटे, श्री. स. म. दिवेकर, श्री. शं. ना. जोशी, प्रभृति ठळक सभासद आणि श्री. ज. स. करंदीकर, ठळक इतिहासज्ञ आणि फलज्योतिषी यांनीं १६५१ फा० व० ३ हीच खरी तिथि, असा निर्णय करून ' शिवजयंति ' फा० व० ३ लाच पाळावयाची असें ठरवून तदनुसार अंमलबजावणीही सुरू केली आहे. ज्योतिर्गणित आणि फलज्योतिष, या शास्त्रांच्या सहाय्यानें हीच तिथि खरी ठरते, असें ( फलज्योतिष न मानणारे कांहीं गृहस्थ खेरीज करून ) निश्चित मत आहे; नव्हे, सिद्धांत आहे.

५. आतां पुराव्याच्या दृष्टीनें असा एक प्रश्न उत्पन्न होतो कीं, बहुतेक बखरकारांनीं १६२७ चा एप्रिल ( १५४९ वैशाख ) असें एकमुखानें ह्मटलें आहे, याची उपपात्ति कशी लावावयाची ? तसेंच, यद्यपि ' शिवकालीन ' सभासदी बखर शिवजन्मतिथि सांगत नाहीं, तथापि ती शिवकालीन—ह्मणून प्राय: खरी असें मानल्यास ' त्यांनीं १२ व्या वर्षीच मावळें काबीज केलीं ' असें ह्मटलें आहे, त्यावरून असें दिसतें कीं, जुन्या पुराव्याप्रमाणें मावळें काबीज करण्याचें साल इ. स. १६३९ हें येतें. वस्तुत: येथें थोड्याशा अतिशयोक्तीचा प्रकार सभासदी बखरकारानें केला असावा. कारण शिवाजीचें दुसरें लग्न १६४० च्या वैशाखामध्यें विजापुरास झालें व त्यानंतर शिवाजी, मातु:श्री जिजाबाई, दादाजी कोंडदेव प्रभृति मंडळी पुणें प्रांतीं पुन: परत आली. आल्यानंतर एसाजी कंक, तानाजी

मालुसरे, बाजी फसलकर वगैरे मावळांतील घरंदाज मावळ्यांशीं स्नेह करण्यांत व त्यांच्याबरोबर संगनमत करून मावळांत आपला स्वतंत्र अंमल बसविण्याचा संकल्प करून तो अमलांत आणण्यास कमींत कमी पांच वर्षें तरी खर्च झालीं असलीं पाहिजेत. म्हणजे १६४५ च्या सुमाराला मावळें काबीज होऊन कित्येक बिकट जागा शिवाजीच्या ताब्यांत आल्या असें होतें. या सालीं शिवाजीला ( १६२७ जन्मसाल धरून ) १८ वर्षें ˙ लीं होतीं. तो वयांत आल्यामुळें दादाजीसारख्या इमानी, शाहण्या, लोकप्रिय पण अतिप्रसंग–भीरू, सर्वाध्यक्षाचेंही त्यापुढें कांहीं चालत नसे. शहाजी महाराजांकडे कागाळ्या दादाजीनें नेल्या. परंतु उपयोग झाला नाहीं; कारण महाराजांनीं कित्येकांस हुसकून दिल्यामुळें वरपांगी नाखुष झालेल्या स्वातंत्र्येच्छु शहाजीराजांस ‘ शिवबा करतो ’ तें ठीक आहे, असें वाटलें म्हणून दादाजीच्या तक्रारीकडे त्यांनीं कानाडोळा केला असला पाहिजे. १६४५ मध्यें शिवाजी १५–१६ वर्षांचा असतां ( १६३० मध्यें जन्म धरल्यास ) प्रत्यक्ष शिवाजीच्या मानवी दृष्टीनें ‘ कार्यारंभाचें ’ ( मावळ्यांच्या नायकांशीं स्नेह करून, मावळयांची सहानुभूति मिळवून, सैन्याची जमवाजमव करण्याचें ) कोडें ठीक उलगडत नाहीं, म्हणून १६२७ हेंच जन्मसाल संभवनीय दिसतें, १६३० हें असंभवनीय दिसतें.

६. शिवाय, मल्हारराव रामराव हे चिटणीस घराण्यांतील व म्हणून माहितगार लेखक असलेच पाहिजेत. सुप्रसिद्ध बाळाजी आवजी ( चिटणीस घराण्याचे मूळ संस्थापक ) शिवाजी महाराजांच्या अंतर्खासगींतील एकनिष्ठ सेवक, त्यांच्यावर शिवाजीमहाराजांचा अत्यंत विश्वास होता. राजकीय ( सरकारी ) लिखाण लिहून ते महाराजांचीं खासगी कामेंही करीत. अर्थात् त्यांस ‘ शिवजन्मातिथि ’ माहिती असण्याचा संभव जास्त. ही त्यांची माहिती वंशपरंपरेनें चिटणीस घराण्यांत जागरूक असली पाहिजे, हें संभाजी, राजाराम, शाहु, प्रभृति राजपुरुषांचे जन्मशक त्यांनीं बरोबर दिले आहेत, त्यावरून स्पष्ट दिसतें. असो; तेव्हां तत्कालीन पुराव्याच्या दृष्टीनें ( १६२७ ) जन्मवर्ष जास्त संभवनीय दिसतें. पुनः साताऱ्यासच उपलब्ध झालेली ‘शेडगांवकर’ बखरही तेंच वर्ष देते. ही बखरही ‘ कायस्थ प्रभूनेंच ’ लिहिली असली पाहिजे, असें अंतःपुराव्यावरून केव्हांही सिद्ध करून देतां येण्यासारखें आहे. सभासद, चित्रगुप्ती, प्रभृति कित्येक बखरी ‘ प्रभुकृत ’ आहेत. एवंच प्रभूंच्या घराण्यांतील मुख्य कुटुंबांत ( चिटणीस घराण्यांत ), जी जन्मातिथि उपलब्ध होती, तीच सर्व बखरकारांनीं अनुकारली असली पाहिजे. येथें ती बखर केव्हां लिहिली गेली, हा प्रश्नच अप्र-

स्तुत होतो. श्री. सवाई माधवरावसाहेब करितां म्हणून जी लहानशी बखर नानाफडणिसांनीं ' माहितगार ' माणसाकडून लिहविली तींत ही १६२७ विभव, हेंच वर्ष दिलें आहे. तात्पर्य, बहुतेक सर्व बखरकारांनीं सातारा, रायरी, नागपूर प्रभृति निरनिराळ्या ठिकाणीं उपलब्ध झालेल्या बखरीच्या लेखकांनीं १६२७ सालाचाच अंगीकार केला आहे. याची उपपत्ति ' खरा शक पहिल्यापासूनच उपलब्ध होता ' असें म्हटल्याखेरीज सुसंगत होत नाहीं. शिवाजी महाराजांच्या पदरीं बाळाजी आवजी बरेच पुढें आले, ही तकरार जमेला धरतां येत नाहीं. कारण खासगीमध्यें प्रमुखत्वानें वागणाऱ्या ' बाळाजीला ' महाराजांचे जन्मादि प्रसंग बिनचूक माहित असणें जास्त संभवनीय आहे. आतां हें खरें आहे कीं, शिवाजी महाराजांचा जन्म ज्या तिथीला झाला त्याच दिवशीं विश्वासु उपाध्यानें तयार केलेलें जन्मटिपण आजला ' **विद्यमान** ' असतें, तर ह्या वादग्रस्त प्रश्नाचा आपोआपच निकाल लागता. पण तसा संभव सध्यां तरी प्राय: अशक्य कोटींतील आहे. ' जेधे शकावली, ' ' शिवभारत ' या संबंधानें माझें ह्मणणें मी याच लेखांत नमूद करणार आहें; तेव्हां या ही नवीन पुराव्याचा विचार तेथेंच करीन. ' १६२७ हें जन्मसाल दुसऱ्या एकाद्या मृत पुत्राचें असावें ' अशी एक वकिली शक्कल वादाच्या भरांत पुढें आली आहे. शक्कलच ही ! चिटणिसांच्या घराण्यासंबंधें ' गोषा ' न ठेवणाऱ्या मातु:श्री जिजाबाईस यद्यपि नक्षत्र, गण, संवत्सर इत्यादींचें ठाम स्मरण नसलें तरी शकाचें साल व तिथि, यांचें विस्मरण होणें, बाळाजीस त्यांनीं भलताच शक देणें, अथवा प्रामाणिक बाळाजीनें मृताचें टिपण ' शिवजन्माचें टिपण ' असें ह्मणणें, ह्या गोष्टी मानवी दृष्टीला तरी संभावनाक्षेत्राच्या पलीकडच्या दिसतात. उपरिनिर्दिष्ट बखरकारांनीं पुष्कळसे ' शिव-प्रसंग ' उल्लेखित केले नाहींत, कांहीं प्रसंगांच्या मित्या चुकल्या आहेत, हें जरी अस्सल पुराव्यानें शाबीत करतां आलें, तरी ' शिव-मृत्यु-तिथी ' विषयांत जशी सर्वत्र एकवाक्यता आहे, तशीच शिवजन्माचा उल्लेख करणाऱ्या सर्व बखरींत **सालाच्या व महिन्याच्या विषयांसंबंधेंही एकवाक्यताच आहे.** " तिथि, वार यांचा मेळ बसत नाहीं " असें नवपक्षाचें ह्मणणें आहे. नवपक्षानें अश्रांत श्रम करून गणित दृष्टीनें ' मेळ बसत नाहीं ' असें पाहिलें आहे, हें संशोधनाच्या चौकस दृष्टीला भूषण आहे, हें मला कबूल केलेंच पाहिजे. तथापि मी असें ही ह्मणण्याचें साहसी धाडस करितों कीं, ' तिथि, वार, नक्षत्र, साल, संवत्सर ' हीं सर्व ठाकसे ठीक जमूं लागलीं कीं, जन्मानंतर बरेच वर्षांनीं उमगून प्रसिद्ध झालेलें टिपण बहुधा ' बनावट ' असण्याचा

संभव जास्त असतो; हें मीं कां ह्मणतों, याचा उलगडा मीं ' जेधे शकावली ' व 'शिवभारत, यांचा परामर्श घेतांना याच लेखांत करीत आहें. सध्यां माझ्या ह्मणण्याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं, दक्ष, प्रामाणिक, स्वामिनिष्ठ, अंतर्बाह्य वृत्तांत (मग तो सरकारी असो, या खासगत असो ) खडान् खडा माहित असणाऱ्या बाळाजी आवजींनें जें टिपण टांचून ठेवलें असेल, किंवा जी माहिती खंडोबल्लाळासारख्या शूर पुत्रांस दिली असेल व ज्या माहितीची परंपरा चिटणीस घराण्यांत अखंड चालत आली असेल व असली पाहिजे, त्या सर्वथा विश्वासाला पात्र असणाऱ्या चिटणीस घराण्यानें बनावट माहिती सजवून प्रसिद्ध केली किंवा मृताची पत्रिका पुढें आणली, अशी शंका घेणें म्हणजे पावकांस ( अग्नि प्रभृतींस ) ही पावन करणाऱ्या सीता माउलीसारख्या शुद्ध सतीवर बालंट घेणाऱ्या कैकेयीच्या किंवा रजकाच्या ( परटाच्या ) म्हणण्या-प्रमाणें धाडसाचें आहे.

७. आतां नव्या पक्षाला ज्या नवीनच सांपडलेल्या ' जेधे शकावली ' वरून इतिहास-संशोधन करण्याची सुप्रेरणा झाली, तिचा मी यथामति विचार ' नवीन पुरावा ' या दृष्टीनें करतों.

( अ ) ही शकावली कै. दाजीसाहेब जेधे देशमुख यानीं शके १८२८ ( इ. स. १९०६ सालीं ) कै० लोकमान्यांच्या हवाली केली. कित्येक अडचणींमुळें ही महत्त्वाची शकावली इ. स. १९१६ पर्यंत गुप्तस्थितींत ( अज्ञातवासांत ) होती. याचवेळीं यद्यपि श्री. सरदार मेहेंदळे प्रभृति सत्यचिकित्सा करण्यामध्यें पटाईत असणाऱ्या चौकस चोखंदळांस जेधे शकावलींतील शिवजन्मतिथि ' विश्वसनीय ' वाटली, तथापि प्रत्यंतराच्या व गणिती कोष्टकांच्या अभावीं या इतिहास-विषयक-दक्षता-खंबीर असणाऱ्या गृहस्थांनीं विशेष बोलबाला न करितां इतर पुरावे व गणिती कोष्टकें जमविण्यांत आपलें श्रम-सर्वस्व विनियुक्त केलें आणि सर्वप्रकारची यथास्थित तयारी करून इतिहास-संशोधक-मंडळांतील श्री. आपटे व श्री. दिवेकर यांच्या मार्फत ही जेधे शकावली शके १८४७ (इ. स. १९२५)मध्यें प्रसिद्ध करण्याची सुसंधि गांठली. इतिहासाची सत्यता राखण्यासाठीं सदैव दक्ष असणाऱ्या कै. वासुदेव शास्त्र्यांसारख्या सत्यप्रेमी शिष्टाची मान्यता या जन्मतिथीला मिळाली आणि सुप्रसिद्ध ज्योतिर्विद्, श्री. ज. स. करंदीकर, यांनीं ' हीच जन्मतिथि ( श. १५५१ फाल्गुन वद्य ३ ) खरी आहे ' असें केसरींतून जाहीर केलें आणि ' यापुढें हीच तिथि खरी धरून उत्सव ( शिव-जयंतीचा उत्सव ) केला पाहिजे ' असें सुचविलें.

( आ ) येथपर्यंत झाला हा प्रकार ठीकच झाला. चिकित्सक बुद्धीविषयीं सुप्रसिद्ध असणाऱ्या पुण्यनगरीचा लौकिक या **नवीन** शोधामुळें वाढला, इतकेंच नव्हे, तर जगाचा, हिंदुस्थानचा व विशेषतः महाराष्ट्रांतील मराठ्यांचा इतिहास संशोधून शुद्ध करण्यासाठीं नवी नवी माहिती अविश्रांतपणें गोळा करणाऱ्या, विवेचक बुद्धीनें ती पारखणाऱ्या, पोक्त विचार दक्षतेनें करून जुने इतिहास–लेखक कसे व कोठें चुकले आहेत, हें उघड करून दाखविणाऱ्या इतिहास–संशोधक–मंडळाविषयीं जनश्रद्धाही वाढली. परमेश्वर करो आणि हें मंडळ चिरायु होऊन आपलें स्वीकृत महत्कार्य व त्याचा व्याप, या उभयतांची पुष्टि वाढविण्याचें श्रेय मंडळास लाभो !

( इ ) इतकी प्रस्तावना केल्यानंतर मला एक साहाजिक प्रश्न उत्पन्न होतो. इतरांच्या व विशेषतः बडोदेकरांसारख्या उत्साही, मेहनती व इतिहासप्रेमी अभ्यासकांच्या अंतःकरणांत हा प्रश्न उभा राहिलाच आहे कीं–' जेधे शकावलींतील मिती खरी कशावरून ? '

एखाद्या साक्षीदारानें दोनशें गोष्टी सांगितल्यावर त्या प्रत्यंतर पुराव्यानें खऱ्या ठरल्या, म्हणून, ज्या गोष्टीला कायम करणारा निःसंदेह अन्य पुरावा उपलब्ध होत नाहीं, ती गोष्ट–पुराव्याच्या अभावीं–न्यायाधीशान ' अवश्यमेव खरी ' असें ठरविलेंच पाहिजे कीं काय ? २०० गोष्टी खऱ्या ठरल्या, यावरून २०१ वी गोष्ट ' खरी असावी ' असें अनुमान विशेष संभवनीय होईल; परंतु त्याला सिद्धांताचें स्वरूप येणार नाहीं.

' **शिवापुरकर देशपांड्याच्या वहीलाच** श्री. आपटे ' राज्याभिषेक शकावली ' म्हणतात. या शकावलींत बहुतेक नोंदी अक्षरशः जेधे शकावलीची, किंवा दुसरी पहिलीची, बहुतेक हुबेहुब नक्कल आहे. मात्र जेध्यांचे व देशपांड्याचे खासगी संबंधीं उल्लेख, मोडी वाचनाच्या नक्कलकारांच्या चुक्या व एखादुसरा ऐतिहासिक प्रसंग, हीं वजा केलीं पाहिजेत. असो, बहुधा शब्द व वाक्यें व तिथिप्रायः एकच आहेत, म्हणून ही शकावली **स्वतंत्र प्रत्यंतर** नव्हे.

' **शिवभारत** ' स्वतंत्र प्रत्यंतर क्वचितच मानतां येईल. ' क्वचितच ' म्हणण्याचें कारण श्री. ज. स. करंदीकर यांनीं शिवचरित्र–प्रदीप ( पृ. १८२–१९२ ) मध्यें केलेल्या छाननींत मला सांपडतें. मी स्वतः ज्योतिषी नाहीं, इतकेंच नव्हे, तर फलज्योतिषाच्या साह्यानें जन्मतिथि ठरविणें धोक्याचें होईल, अशी माझी समजूत आहे. हें कसेंही असो. राज्याभिषेकाच्या शुभ प्रसंगीं ज्याला राज्या-

भिषेक व्हावयाचा त्याचे पूर्व पराक्रम पाहून; त्याची मातृवत्सलता, त्याचे कुटुंबसंबंध इत्यादि सर्व पाहूनच त्या पुरुषाची जन्मतिथि तत्कालीन ज्योतिष्यांनीं ठरविली असल्याचा व तिचाच अनुवाद नेवासकर परमानंद कवीनें केला असल्याचा बळकट संशय उत्पन्न होतो. तात्पर्य शिवजन्माची नोंद जन्म झाल्या दिवशींच केलेला अस्सल कागद ( किंवा त्या सालच्या पंचांगांत असलेला लेख क. होईना ! ) जोंपर्यंत पुढें येत नाहीं, तों पर्यंत 'शिवभारतांतील' काय, अथवा जेधे शकावलींतील काय, लेख स्वयंभू मोलाचे नव्हेत. शिवाय, शिवभारतांत शिवाजी हा विष्णूचा अंश होय (पहा, केसरी १५।३।२७) असें म्हटलें आहे. शिखर शिंगणापुरच्या शंकराची भक्ति करणाऱ्या मालोजीला 'आपणच भोसले कुलांत जन्म घेऊन स्वराज्य-स्वधर्मस्थापना करणार आहों' असें शंकरांनीं सांगितलें, असा अनेक बखरींत उल्लेख सांपडतो. असो; हा दैवी भाग सोडून दिला तरी या भारतांत ( श्लो. ३७-३८ ) **दर्याखाना**चा पराभव केल्याचा उल्लेख आहे, त्याचा निसुटता सुद्धां उच्चार कोणत्याही बखरीनें किंवा नव्या जुन्या शकावलींनीं केलेला मला आढळला नाहीं. फक्त कै० राजवाड्यांनीं आपल्या राधामाधव-विलासचंपूच्या प्रस्तावनेंत 'शके १५५१ च्या अश्विनपासून १५५२ च्या वैशाखापर्यंत शहाजीनें जुन्नर-संगमनेर पासून अहमदनगर व दौलताबाद पर्यंतचा निजामशाही मुलुख आटपला' असें म्हटलें आहे. यावेळीं दर्याखानाचा पराभव केला असा कोणी तर्क करतील तर तेथें मी निरुत्तरच होईन. तथापि कै. राजवाड्यांनीं १५४९ वैशाखच शिवजन्मतिथि ठेवली आहे व म्हटलें आहे कीं १५५१ च्या चैत्रापासून अश्विनापर्यंत जुन्नर माहुली प्रांतांत कोणी ही स्वारी केली नव्हती. अश्विनापासून फाल्गुनापर्यंत अथवा १५५२ च्या वैशाखापर्यंत शहाजीनें दर्याखानाचा गर्व हरण केला असता, तर त्या महापराक्रमाचा स्पष्ट उल्लेख, जेधे अथवा शिवापुरकर देशपांडे यांनीं इतर प्रसंगांचा केला तसा खास केलाच असता. आणखी श्रुतिस्मृति...राजनीति...शस्त्रयुद्ध... इत्यादि विषयांत १२ वर्षांच्या आंतच शिवाजीनें प्राविण्य मिळविलें ( केसरी पहा ) असें भारतकार म्हणतात, हें वाचून माझ्या सारख्याला काय, पण हें ऐकून प्रत्यक्ष शिवाजी महाराजांस सुद्धां आचंबा वाटला असता ! असो; कविसंप्रदायाला अनुरूप अशा कल्पना सृष्टींत स्वैर विहार करणाऱ्या परमानंदानें 'शहाजी मेल्यानंतर व **राज्याभिषेक होण्याच्या आधीं** शिव-आज्ञेनें लिहिलेल्या भारतांत **नमूद केलेली ( आणि ज्योतिर्दृष्टीनें मात्र** सर्व शिवपराक्रमाला **पटणारी** ) जन्मतिथि 'खरी'च असली पाहिजे, असें अनुमानणें ठीक नव्हे, असें मला वाटतें. सारांश 'भारत'ही **स्वतंत्र प्रत्यंतर नव्हे.**

श्री. आपट्यांनीं कित्येक युरोपियनांचे उतारे घेऊन त्यांस ही १५५१ सालच मान्य होतें, असें ( त्यांचे उतारे देऊन ) सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. इ. स. १६६४ सालीं शिवाजीनें सुरत लुटली, त्यावेळीं त्याचें वय ३५ वर्षांचें होतें, असें थेव्हेनाला कसें समजलें ? १६६६ मध्यें थेव्हेनाला 'शिवाजी १६६४ मध्यें ३५ वर्षांचा' ही खबर काय कोणी गुजराथ्यानें दिली ? किंवा लुटले गेलेल्या युरोपियनांनीं दिली ? अमक्या माणसाला ३५ वेंच वर्ष आहे, असें ठासून कोण सांगूं शकेल? अजमासच तो ! ३५ चें अनुमान ३४ होईल वा ३७ ही होईल. ऑर्मी मोठा चिकित्सक असेल. पण इ. स. १७८३ मध्यें त्याला असें सांगणारा कोण भेटला किंवा ग्रांटडफला व बहुतेक बखरकारांनाही न उमगलेला कोणता विश्वसनीय लेख त्याला सांपडला, कीं जो 'शिवाजी आपल्या वयाच्या ५२ वे वर्षीं मेला' असें निभ्रांतपणें सांगता झाला ?

तंजावरचा शिलालेख तर 'शिवाजी व्यंकोजीपेक्षां धाकटा, निदान धाकट्या बायकोच्या पोटीं झालेला शहाजीचा मुलगा' हें सिद्ध करण्यासाठीं तयार केला होता, हें प्रसिद्ध आहे.

एतावता **स्वतंत्र असें साक्षात् प्रत्यंतर असें** नाहीं कीं जें जेधे शकावलींतील तिथीला उपोद्बलक होईल.

ओझासाहेब यांस चमत्कारिक योगानें सांपडलेली शिवजन्मपत्रिका एक अद्भुत गोष्ट आहे खरी, परंतु प्रश्न असा कीं महाराष्ट्रांत आजपर्यंत अज्ञातवासांत राहिलेली जन्मपत्रिका राजपुतान्यांत जाऊन कशी प्रगट झाली ? शिवाजीमहाराजांच्या काय, प्रत्यक्ष श्री रामचंद्राच्या हजारों पत्रिका हजारों ज्योतिष्यांच्या संग्रहीं आहेत पण त्या खऱ्या कशावरून ? कोणी म्हणेल, भोसले कुळाचें मूळ शोधण्याकरितां येथून मंडळी गेली—या मंडळींत बाळाजी आवजी होते असा लोकसमज आहे—त्यांनीं अस्सल पत्रिकेची खरी नक्कल तिकडे नेली असली पाहिजे. 'वदतो व्याघाता' चा दोष येथेंच होतो. कुलशीलांच्या शोधार्थ बाळाजी सारखा विश्वासु स्वामिनिष्ठ तिकडे जाऊन हीं पत्रिका प्रसिद्ध करितो व महाराष्ट्रांत भलतीच पत्रिका फैलावतो, याचा अर्थ काय ? शिवाय शिवभारतकार तर भोसले—शिशोदे—घराण्यांचा कूटस्थ पुरुष एकच असें मुळींच म्हणत नाहीं ! सारांश, सर्वत्रच गडबड व गोंधळ आहे.

गणितानें संवत्सर, शकवर्ष, महिना, पक्ष, तिथि, वार, वेळ, नक्षत्र हीं खरी ठरतील. कबूल. पण तोच शिवजन्मदिवस याला गमक काय ? आणखी; थोर ब्राह्मण घराण्यांत व कुलीन मराठ्यांत आपली खरी पत्रिका केव्हांही प्रकट करीत नाहींत,

प्रकट होणारी पत्रिका त्यारीच दाखविण्याचा प्रघात आहे म्हणतात; हें खरें असेल तर जेध्यांच्या, शिवापुरकरांच्या, परमानंदाच्या, मेवाडी ज्योतिष्याच्या हातीं पत्रिका पडणें अशक्यच हें कोणासही सांगणें नलगेच. तात्पर्य, जेधे यांचें ह्मणणें निःसंशयतः सिद्ध होत नाहीं.

८. आतां, जेधे शकावलीचा अंतःप्रमाणानें विचार करूं.

( अ ) कान्होजी जेधे व त्यांचे वडील नाईकजी, हे निजामशाहींतील कर्ते देशमुख इ. स १६२६ नंतर विजापुरचे नोकर झाले व रणदुल्लाखानानें त्यांस आपल्या जवळ ठेविलें. पुढें १६३५–३६ सालीं शहाजी राजांनीं विजापुरकरांची सरदारकी पतकरिली आणि त्यांनीं जेधे कर्ते, इमानी, शूर, मर्दाने देखन त्यांस आपल्या दिमतीस रणदुल्लाखानापासून मागून घेतलें. ते १६४७–४८ पर्यंत शहाजी राजांजवळच होते. नंतर शिवाजीच्या साह्यप्रीत्यर्थ शहाजी राजे यांनीं जेध्यांस आपल्या कर्त्या पुत्राकडे ( शिवाजीकडे ) पाठविलें. आतां प्रश्न असा कीं, ( १ ) निजामाची सेवा करणाऱ्या जेध्यांच्या टिपणांत शिवाजीच्याच जन्मतिथीची नोंद कां व्हावी आणि त्याचा वडील भाऊ संभाजी, त्याची जन्मतिथि जेध्यांच्या बाडांत कां नसावी ? दुसरा प्रश्न असा कीं, शिवाजी ज्या दिवशीं जन्मले, तेव्हां तर त्यांचें 'शिवाजी' असें नांव ठेवलें नसलेंच पाहिजे. आमचा हिंदुरिवाज म्हणजे बारशादिवशीं नामकरणविधि होतो. शिवाजी वद्य ३ स जन्मले, तेव्हां त्यांचें बारसें १५५१ च्या फाल्गुन अमावास्येला किंवा १५५२ च्या पाडव्याला होऊन त्यांचा नामकरणविधि झाला असला पाहिजे. तेव्हां अमावास्येला किंवा पाडव्याला नोंद न होतां फाल्गुन व॥ ३ लाच कशी झाली ? 'शिवाईला नवस केला, तो फळला म्हणून 'शिवाजीच' नांव ठेवावयाचें, हा शिवनेरीस झालेला बेत निजामशाहींतील जेध्यांना कळणें शक्य नव्हतें. शिवाय, १५५१ शके हें साल असें आहे कीं त्या वेळीं शाहजीराजे शहाजानासारखे प्रबळ होते ! तेव्हां ही नोंद मागाहूनच झाली असली पाहिजे. तात्पर्य, ज्या दिवशींची त्या दिवशीं झालेली ही नोंद नाहीं.

पुनः, जेधे शकावली, राज्याभिषेक शकावली, यांत असा एक चमत्कार आहे कीं, या दोन्हींमध्यें मला 'मुसुलमानी शक' कोठेंही प्रायः आढळला नाहीं. बहुतेक कावेरीच्या उत्तरेकडे मुसुल्मानी राजसत्ता म्हणून मुसुल्मानी शक सरकारी व व्यवहारी अप्रतिहत चालत असतां व केवळ धार्मिक कृत्यांत मात्र शालीवाहनाचा उच्चार होत असतां, व्यवहाराला व सरकारी कामाला उपयोगी पडणाऱ्या शकावल्यांत मुसुल्मानी शक इ. सनाच्या १७ व्या शतकांत

प्राय: दिसूं नये, हें आश्चर्याहून ही आश्चर्यकारी आहे. प्रत्यक्ष शिवाजी महाराजसुद्धां सरकारी व व्यवहारी कागदपत्रांत राज्याभिषेकाच्या आधीं मुसुल्मानी शक वापरीत व अभिषेकानंतरच्या कांहीं कागदांत त्यांनीं मुसुल्मानी शक उपयोगिला आहे, हें सुप्रसिद्ध आहे. मग स्वधर्म-स्वभाषादिकांचा मूर्तिमंत अभिमान असणारे महाराज ही राहिले नाहींत, इतके सोवळे जेधे प्रभृति शकावलीकार प्राय: कसे व कां राहिले, याचा उलगडा होणें अगत्याचें आहे. मला तर वाटतें कीं सर्व हिंदूंची स्वतंत्रता व मोगलेतर सर्व मुसुल्मानी राज्यें पालथीं घालण्याला बद्धपरिकर झालेल्या औरंगझेबनें संभाजीचा वध केला, सर्व मराठ्यांस गांजून सोडलें, त्यांस भ्रष्ट करण्याचीं अभेद्य अस्त्रें सोडलीं, तेव्हां शिवरायाच्या हयातींतही प्रकट झाला नाहीं असा परसत्तेविषयींचा, परधर्मी शकाचा उद्भट संताप मराठ्यांस आला. आणि त्यांनीं संताजी घोरपडे, धनाजी जाधव, रामचंद्र निळकंठ यांच्या प्रोत्साहनानें परसत्ता उलथून पाडण्याचें कार्य स्वीकारलें व मुसुल्मानी शकाचें नांव बहुधा सोडून दिलें. या मन्वंतरांत म्हणजे इ. स. १६९० ते १७०८ या वर्षांतल्या शकावल्या मराठे सरदारांच्या घरीं तयार झाल्याअसल्या पाहिजेत व त्यांचें लिखाण त्या त्या सरदारांच्या ब्राह्मण अथवा प्रभु दिवाणांनीं शिवजन्मानंतर पुष्कळ मागाहून केलें असलें पाहिजे.

९. हा माझा तर्क खरा असावा, असें जेधे शकावलींतील उदाहरणासाठीं घेतलेल्या अंत:पुराव्यांवरून मला वाटतें. तसेंच 'जेधे यांचा करीना' ( श्री. शि. प्रदीप पृ. ३९–४८) हा बहुधा वतनाच्या अथवा भाऊबंदकीच्या वादामध्यें गोतापुढें अथवा पंचाच्या पुढें आला असावा. हा करीना श. १६११ (इ. स. १६८९–९०) पर्यंतची जेधे कुळाची व त्यांच्या पराक्रमांची हकीकत सांगतो. या हकीकतीस धरूनच प्राय: शकावली सजविली आहे. मात्र ही शकावली १६१९ ( इ. स. १६९७ ) पर्यंतची आहे. श. १६११ मध्यें ' औरंगजेबनें संभाजीच्या पुत्रास हफ्तहजारी केलें व ' शाहु ' हें नांव ठेविलें असें शकावली म्हणते, ही गोष्ट चिंत्य ( अथवा शंकास्पद ) आहे, असें मला वाटतें. आणखी १६१२ सालच्या नोंदींत ' रामचंद्र पंत पंडित **सचिव** व शंकराजी पंडित **राजाज्ञा** ' असें म्हटलें आहे, तें बिनचुक नाहींसें वाटतें. रामचंद्रपंत **अमात्य** होते व शंकराजीपंत **सचिव** होतेसें वाटतें. कारण १६१५ च्या नोंदींत मी म्हणतों तशीं हुद्याचीं नांवें दिलीं आहेत. १६१२ ची नोंद चुकते, तर १५५१ ची नोंद ही चुकणें संभवनीय आहे. आणखी; या ' प्रदीपांत ' ज्या कांहीं शकावल्या उद्धरल्या आहेत, त्यांत शहाजी राजे शिवरायास

भेटावयास आले, पितापुत्रांचा भेटीचा मोठा अपूर्व समारंभ झाला, महापराक्रमी पित्याहून महत्तर पराक्रम करून स्वतंत्र राज्य स्थापणाऱ्या अद्वितीय पुत्राच्या लोकोत्तर भेटीचा अपूर्व योग जुळून आला, त्याचा ओझरता सुद्धां उल्लेख या शकावल्यांत होऊं नये, हें महदाश्चर्य होय. जेधे तर शहाजी राजे यांच्या आज्ञेनें शिवरायाच्या मदतीला आले होते ना ? ते नेहमीं शिवरायासंनिध असता ना ? करीन्यांत व जेधे शकावलींत असे किती तरी मर्दुमकीचे प्रसंग आहेत कीं, ज्यांत जेध्यांनीं आपलें वचन सर्वस्वी पाळलेलें दिसतें. असा कोणताही महत्त्वाचा प्रसंग नाहीं कीं ज्यांत जेध्यांची विजयी समशेर चमकली नाहीं. तेव्हां असे सर्वथा विश्वासाला पात्र झालेले व उभयता पितापुत्रासाठीं आपले पंचप्राण ही अर्पण्यास सदैव एका पायावर तयार असणारे जेधे या पितापुत्रांच्या प्रेमळ भेटीच्या प्रसंगीं हजर असलेच पाहिजेत. मग ह्या भेटीचा उल्लेख जेधे आपल्या करीन्यांत किंवा शकावलींत कां करीत नाहींत ? शिवापुरकर देशपांड्यांची शकावली म्हणजे बहुतेक जेधे शकावलीची नक्कल आहे. यांत वादविषयक उल्लेख नाहीं, हें विलक्षण नव्हे. पण जेघे स्तब्ध कां ? याला एकच उत्तर मला सुचतें. आणि तें हें कीं, करीन्यासह ही शकावली वतनाच्या किंवा भाऊबंदकीच्या खटल्यांत 'पुरावा' अगर साधनात्मक दस्तऐवज म्हणून हजर केलेले कागद आहेत. आपल्या पक्षाला उपयोगी पडेल, इतकी व आणखी कांहीं माहिती सजविणारे हे कागद आहेत. शके १५७१ म्हणजे इ. स. १६४९ मध्यें कान्होजी नाईक जेधे कर्नाटकांतून पुणें प्रांतीं आले, तेव्हां शिवरायाचें वय होतां होईल तितकें कमी दाखविणें कज्जाचे दृष्टीनें किफायतशीर आहे, असें त्यांस वाटलें असावें. यद्यपि त्यांच्या स्वामिनिष्ठेंत त्यांनीं बालाग्रही अंतर केलें नाहीं. तथापि खोपड्याची त्यांनीं रदबदल केली ( करीना पहा ) तेव्हां शिवरायानें त्यांचें ह्मणणें मान्य केलें नाहीं, ह्मणून व " बांदलास 'पान' पहिल्यांदा द्यावयाचें, जेध्यांस मागाहून " असें शिवरायानें ठरविलें ह्मणून ते थोडेबहुत घुश्शांतच असावेत. त्यांची समशेर युद्धप्रसंगीं सदैव जय्यत असे, हें खरें; परंतु आपल्या सेवेचा मजुरा होत नाहीं, हें पाहून ते खिन्न होते असले पाहिजेत, असें मला वाटतें. असो; शिवराय कमी वयाचे दाखविण्याचा हेतु स्पष्ट आहे कीं, वेळ प्रसंग पडल्यास आपण शहाजीचे अथवा पर्यायानें 'इदलशाहीचे' नोकर होतों, सरदार होतों, असा गोताचा ( पंचाचा ) समज व्हावा. ही गोष्ट त्यांनीं मुद्दाम केली, असें ह्मणेल, तो पापी ! त्यांच्या ऐकण्यांत १५५१ फाल्गुन वद्य ३ ही तिथि आली आणि फारशी चौकशी न करितां त्यांनीं आपल्याला पथ्यंकर असणारी ही तिथि आपल्या शकावलींत कायम केली.

१०. याप्रमाणें जेधे शकावली ' शिवप्रसंग ' झाले, तेव्हांची नव्हे, शिवराय आपल्या धूर्त वडिलांपासून पडत्या फळाची आज्ञा घेऊन पुणें प्रांतांत कधीं आले, हें न सांगणारी, शिव-शाहांची भेट अजीबात गाळून टाकणारी, शिवरायाच्या वयासंबंधानें फारशी चिकित्सा न करणारी आणि जेथें तेथें आपल्या पराक्रमांची शेखी मिरविणारी, बाजी फसलकर प्रभृति कांहीं प्रसिद्ध योद्ध्यांचा उल्लेख न करणारी ही शकावली आहे. ' शिवभारत ' तर बोलून चालून काव्य ! हें मीं ' केसरीनें ' प्रसिद्ध केलेल्या श्लोकांतील दहापांच श्लोकांवरून म्हणत आहें, सबंध ग्रंथ प्रासिद्ध झाल्यावर कदाचित् माझें हें मत बदलेलही ! शिवाय, राज्याभिषेका-सारख्या अलौकिक प्रसंगाला अनुकूल होईल आणि शिवरायाचें शील व त्याचे अद्भुत पराक्रम यांस साजेल, अशी जी पत्रिका ज्योतिर्विदांनीं तयार केली होती असेल, तिचा कवि परमानंदानें उपयोग करून घेतलाच असला पाहिजे. युरोपियन लोकांची माहिती तर केवळ अनमान धक्क्याची दिसते. सारांश, सत्य मात्र निष्क-र्षून काढणाऱ्या निःष्पक्षपाती विमर्शीला हा नवीन पुरावा जन्मतिथीसंबंधानें विश्वासार्ह वाटणार नाहीं. पुनः; या जेधे शकावलीकारांनीं आदरलेली नोंदणीची पद्धति आदरणीय नाहीं असें मला कष्टानें म्हणावें लागतें. उदाहरणार्थ शके १५५१ हेंच साल घ्या. आम्हां दक्षिणी लोकांचा वर्षारंभ चैत्रापासून होतो, नव्हे ? पण या शकावलींत फाल्गुनांतील शिवजन्माची नोंद प्रथम, उजवे बाजूस चैत्र मास नंतर आणि श्रावणांतील नोंद फाल्गुनाच्या खालीं ! स्पष्टच पहा:—

## शके १५५१ शुक्ल संवत्सरे.

**डावी बाजू.**

फाल्गुण वद्य त्रितीया, शुक्रवार नक्षत्र हास्त, घटी १८ पळे ३१ गड ५ पळें ७ ये दिवसी राजश्री सिवाजी राजे सिवनेरीस उपजले.

श्रावणे पुर्णिमेस लुखजी जाधवराव नीजीमशाहानी मारिले.

**उजवी बाजू.**

चैत्रमासीं इभराम इदिलशहा परलोकास गेला. सुलन ( ? ) महमदशाहा तख्तीं बैसले खवासखान प्रधान झाला मुरार जगदेराव कारभारी जाला.

ही नोंदींची कोण विलक्षण तऱ्हा ? जेध्यांचें वर्ष फाल्गुनांत सुरू होत होतें, असें तर समजावयाचें नाहींना ?

११. शेवटीं वाद मिटविण्यासाठीं मी पुढील गोष्टी क्षणभर मान्य करितों व श्री. आपट्यांप्रमाणें म्हणतों कीं ( १ ) जेध्यांची शकावली प्रसंग घडत गेले तस-

तशी लिहिली गेली आहे ( २ ) ती बिनचुक असून व्यवस्थित आहे, शकावली सजाविणाराचा सत्य व्यतिरिक्त दुसरा कोणताही हेतु नाहीं, तथापि जोंपर्यंत शिवरायाच्या जन्मतिथीचें अस्सल ह्मणजे संदिग्ध टिप्पण ( किंवा जन्मपात्रिका ) पुढें येत नाहीं, तोंपर्यंत प्रसंगशतांचा, अपराधांचा, प्रामाणिकपणाचा, जन्मतिथि ठरविविण्याला कांहीं एक उपयोग पडावयाचा नाहीं. 'तारागणांना जो अंधःकार नाहींसा करितां येत नाहीं, तो एकटाच चंद्र अंधःकार विनाशाचें कार्य करितो.' खरें आहे. पण केव्हां ? त्याला स्वतःलाच खग्रास ग्रहण लागलें नसेल किंवा आर्द्र–महिषोदर तुल्य कृष्ण मेघानें तो आच्छादून टाकला नसेल, तेव्हां. जेथे शकावलींतील जन्मतिथी संशयमात्रांचा उच्छेद करील तेव्हां सर्व बखरकारांस मूगच गिळले पाहिजेत. हा संशयच्छेद होण्याला एकच उपाय आणि तो म्हणजे तत्कालिन अस्सल टिप्पण सांपडणें हा होय.

१२. अश्रांत श्रम करणारे श्री. आपटे व त्यांचे सहकारी अथवा कार्यभागी अशी प्रतिपृच्छा करतील कीं बखरकारांजवळ तरी हें साधन कोठें आहे ? त्यांनीं अस्सल पत्रिका पुढें आणली नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांनीं आदरिलेल्या तिथीला कोठें वाराचा मेळ नाहीं, तर कोठें नक्षत्राचा नाहीं अथवा कोठें कोठें संवत्सरही जमत नाहीं ना ? बखरकारांनीं उद्धरिलेले शिवप्रसंग थोडे आणि त्यांच्या मित्याही चुकलेल्या ? ही प्रतिपृच्छा न्याय्य आहे. म्हणून त्या त्या बखरकारांस व शकावलीकारांसही मी असेंच म्हणणार कीं जोंपर्यंत तुम्हाला विश्वसनीय असणारें तत्कालीन जन्माटिपण मिळत नाहीं, तोंपर्यंत तुमचा १५४९ वैशाख संशयितच राहणार. ' पुराणं इति एव न साधु सर्वं ' हा न्याय तुम्हांलाही पाळलाच पाहिजे. ' मल्हाराव रामरावांना खरी माहिती असेल कदाचित्, परंतु जोंपर्यंत ज्या कागदावरून ती माहिती उपलब्ध झाली, तो अस्सल कागद प्रकट होत नाहीं, तावत्काल चिटणीसासारख्या स्वामिनिष्ठ पुरुषाचें ही वचन संशयित आणि त्याला अनुसरणाऱ्या ' बहुसंख्य ' बखरकारादिकांचेंही म्हणणें संशयग्रस्तच असणार. मग करायचें काय ? संशयाकुल जन्मतिथिच पाळूं नये असेंच मी म्हणत नाहीं. जन्मतिथि पाळावी, उत्सव करावेच करावे. केव्हां ? सर्व शिवभक्तांनीं स्वतः किंवा प्रतिनिधिद्वारां ' भारत–इतिहास–संशोधक मंडळासारख्या अधिकारी मंडळांत एकत्र जमून शांत, निरभिमान मनानें ऊहापोह करावा आणि एकमतानें वैशाखाचा किंवा फाल्गुनाचा महिना ठरवावा. आधीं वाद मिटवावा. प्रामाणिक वादानें संशोधन होईल, हें खरें. पण अभिनिवेश नसेल तरच ' वादे वादे जायते

सत्यबोधः ' हा न्याय सार्थ होईल. प्रस्तुतचा वाद अभिमानसंवलित आहे. हा नको. आजला तर्कवितर्क, वकिली कोट्या, उपालंभ, द्वेष यांची गर्दी मला दिसते. काळाचा श्रमाचा अपव्यय होतोसें वाटतें. इतिहासाच्याच दृष्टीनें आपल्यास केवढालीं तरी मोठमोठीं कामें करावयाचीं आहेत? ' तुटे वाद संवाद तो आदरावा ' या अर्थाची समर्थोक्ति पूज्य मानून हितकर, पथ्यकर, लोकसंग्राहक, इतिहास-विषय हातीं घेणें आज अत्यंत आवश्यक आहे. फाल्गुन नको, वैशाख नको असेल तर शिवराज्यारोहण तिथि निःसंशय ठरली आहे, त्या दिवशीं किंवा शिवराय ज्या तिथीला निजधामास गेले, तो दिवस संदिग्ध तिथि घेऊन शिवाजी महाराजांची पुण्यतिथि साजरी करूं या. हेंही नापसंत असेल तर इंग्लंडच्या वर्तमान राजाचा दिवस जसा राजाज्ञेनें अमुक दिवशीं पाळावा, असें ठरतें, तसा एकमतानें दिवस ठरवावा व उत्सव साजरा करावा. शिवरायाचा जन्मोत्सव कोणत्याही तिथीला एकमतानें ठरविला गेला म्हणजे तोच दिवस पवित्र होईल. शिवरायाचें स्मरणच मंगलप्रद आहे. हेंही जमत नसेल ( परमेश्वर करो आणि असें न होवो ! ) तर ज्या पक्षाला जो दिवस 'खरासा' वाटेल, तो दिवस त्या त्या पक्षानें घ्यावा आणि उत्सव करावा. हल्लींच दोन पाडवे, दोन दसरे, दोन अधिक मास आपणां महाराष्ट्रीयांमध्यें रूढ होऊं पाहत आहेत ना? पण कसेंही करावें आणि विनाकारण लेखण्यांची झोंबाझोंबी होत आहे, ती गुण्यागोविंदानें मिटवावी. ' भांडून भांडून आपण या दशेला आलों!' हें सुप्रसिद्ध सखाराम बापु बोकील, पेशवाईंतलि पूर्ण शाहणे यांचें सुभाषित समजून घ्यावें आणि तदनुसार आचरण करावें. शुभं भवतु ! !

सरशेवटीं श्री. वि. आपटे यांनीं प्रेमभावानें मला हवी ती मदत दिली याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों, त्यांस व तत्सहकाऱ्यांस ' नमस्तेभ्यः' असें सविनय म्हणतों. या लेखांत कोठें कमी जास्ती अधिक उणा शब्द आला असेल, त्याबद्दल क्षमा मागतों आणि आपणां सर्वांस, महाराष्ट्रास व भारतवर्षास ' शांतिः पुष्टिस्तुष्टिश्च सन्तु ' असें प्रार्थून हा लेख पुरा करितों.

# शिवकालीन पत्रें व कागद.

( गो. स. सरदेसाई ).

इतिहासांत बाह्य वर्णनापेक्षां राष्ट्रपुरुषांनीं स्वत: लिहिलेल्या पत्रांची किंमत किती आहे, हें सांगण्याची अवश्यकता नाहीं. शिवपूर्वकालीन शेंपन्नास वर्षांचे निरनिराळ्या घराण्यांचे नानाविध कागद कै. राजवाड्यांनीं प्रसिद्धीस आणिले, परंतु त्यांतील सारभूत अंश सामान्य वाचकांपुढें अनेक कारणांस्तव अद्यापि आलेला नाहीं. सबब शिवजयन्ती–निमित्त निघणाऱ्या या ग्रंथांत शहाजी, जिजाबाई, व शिवाजी यांचीं कित्येक निवडक पत्रें मुद्दाम पुढें देण्यांत येत आहेत. यांपैकीं कित्येकांचीं इंग्रजी रूपान्तरें सुद्धां दिलीं आहेत. पहिलें पत्र शहाजीनें आदिलशहास लिहिलेलें असून, त्यांतील स्मरणीय भागांचें विवेचन पुढें स्वतंत्रच केलें आहे. त्याशिवाय अफझलखानास साह्य करण्याबद्दल आदिलशहानें मावळच्या देशमुखांस काढिलेलें फर्मान दिलें आहे, त्यावरून शिवाजीला तो प्रसंग किती आणीबाणीचा होता, तें स्पष्ट होईल. बाजी घोरपडे याच्या कारवाईसंबंधानें शिवाजीनें आपल्या बापास लिहिलेलें पत्र तसेंच महत्त्वाचें आहे. जिजाबाईचें एक इनामपत्र दिलें आहे त्यावरून दादाजी कोंडदेव कोणत्या प्रकारचा गृहस्थ होता तें अजमावतां येईल. शिवाजी व पोर्तुगीझ यांजमधील तह व इतर कागद तसेच महत्त्वाचे व शिवकालीन इतिहासाची स्पष्टता करणारे किती उपयुक्त आहेत याची कल्पना ते वाचल्यावर सहज होईल. प्रत्येक कागदास स्वतंत्र प्रस्तावनेची जरूर नाहीं. एक सांकेतिक पत्र रा. स. ग. जोशी यांनीं पैदा करून दिलें, तें येथें देण्याचें कारण इतकेंच कीं हल्लींप्रमाणें मराठशाहींत सुद्धां गुप्त बातमी पाठविण्याची योजना लोकांच्या उपयोगांत होती. या पत्रांतील व्यक्ति व संदर्भ यांचा बरोबर छडा संशोधकांनीं लावून द्यावा अशी नम्र विनंति आहे.

शिवछत्रपतीचे वडील शहाजी राजे यांनीं विजापुरच्या अली आदिलशहास (१६५६-७२) लिहिलेलें एक अपूर्व पत्र पुढें देण्यांत येत आहे. शिवाजीला स्वराज्य स्थापण्याची स्फूर्ति प्रथम कशी झाली, या प्रश्नाचें साधार संशोधन हल्लीं निरनिराळे विद्वान् करीत आहेत, त्या कामीं या पत्राचा पुष्कळ उपयोग होईल. हें पत्र प्रथम रा. राजवाडे यांस उपलब्ध झालें व त्यांनीं 'रामदास रामदासी' मासिकांत सन १९१६ त छापिलें. या मासिकांतील ऐतिहासिक कागदांचे खंड सत्कार्योत्तेजक सभा, धुळें, यांजकडे

विकृत मिळतात. त्यांतील श्रीसांप्रदायिक विविध विषय प्रथम खंड या पुस्तकांत पृ. २०९–१३ वर हें पत्र छापलेलें आहे. पत्र ता. ६–७–१६५७ नंतर थोड्याच दिवसांनीं लिहिलेलें आहे. " ४ सव्वाल रोजीं कंपली गांवाहून निघून हल्लीं आह्मीं बल्लारीनजीक आलों, कंपलीस चारा वगैरे कांहीं नाहीं, इकडे तामगौड तर्फे चारा वगैरे झाला आहे म्हणून इकडे आलों " असें शहाजी पत्रांत लिहितो. सन १६५७ च्या ४ सव्वाल रोजीं शके १५७९ ची अधिक श्रावण शु. ६ येते. त्यानंतर आठ चार दिवसांतील पत्र असल्यानें, नुकता पाऊस पडून चारा झाला होता हें ध्यानांत घेतां, ही पत्राची तारीख बिनचूक मानण्यास हरकत नाहीं. आंतील मजकुरावरून पत्राच्या खरेपणाबद्दल शंका घेण्यास यत्किंचित् जागा नाहीं. पत्र कसें उपलब्ध झालें यासंबंधानें रा. राजवाडे लिहितात, "भारतेतिहासमंडळाचे सभासद रा. अनंतराव फडणीस यांनीं गेल्या महिन्यांत जमखिंडींचा एक मराठा मजकडे आणिला; त्याजजवळ फाटके तुटके असे तीन कागद होते. ते वाचण्यास दुर्बोध असल्यामुळें कोणाकडून तरी वाचून घेण्यासाठीं तो मुद्दाम पुण्यास आला. कोर्टांत त्याची कांहीं फिर्याद होती, तींत हे कागद पुराव्यांत देण्याची त्याची इच्छा असल्यामुळें, ते वाचण्यासाठीं त्यानें मजकडे आणिले. तीनही कागद शिवाजीचे वडील शहाजीराजे यांच्या रियासतींतील आहेत. तीनही कागद देशी दौलताबादी असून त्यांच्या अगदीं जीर्ण वाकळा झाल्या आहेत. पैकीं एक कागद खुद्द शहाजीचें पत्र आहे. पत्र मोडींत मोठ्या वळणदार अक्षरांनीं लिहिलेलें असून, त्यावर शहाजीचा फारसी शिक्का आहे. पत्र विजापुरच्या आदिलशहाला लिहिलेलें आहे. पत्रांतील मायने व शब्द पुष्कळसे फारसी असले तरी भाषा मराठी आहे. आदिलशहाजवळ सावंतराव नांवाचा एक मराठा उमराव होता, त्याच्या मार्फत शहाजीनें शहाकडे शिफारस केल्याचा उल्लेख पत्रांत आहे. त्यावरून प्रस्तुत पत्र आदिलशहास वाचून दाखविल्यावर सावंतरावाचे दप्तरांत राहिलें, आणि पुढें तें जमखिंडीहून पुण्यास मजकडे आलें. "

पत्रांतील भाषा सहज समजण्यासारखी नाहीं. राजवाड्यांनीं तें छापून दहा वर्षें झालीं, तथापि त्याजकडे संशोधकांचें लक्ष जावें तितकें गेलेलें नाहीं. एक तर हे ऐतिहासिक साधनांचे ग्रंथ बरेच दुर्मिळ आहेत. तशांत रामदासी विषयांकडे अभ्यासकांचें चित्त कळकळीनें वेधलेलें नसल्यामुळें हें पत्र कोंपऱ्यांत पडून राहिलें. शिवाय तें सहज वाचून कोणाला कळण्याजोगेंही नाहीं. निम्मीअधिक भाषा फारसी स्वरूपाची आहे. " आपण रजपूत लोक बेअब्रू सहन करणार नाहीं, " असें

Shahaji Bhosle

Shaha Jahan

अरु उत्तर दच्छिन रच्छनकों इत साहजि हैं उत सा जिहां॥ रा. मा. वि. चं.

PHOTO PRINTED AT SHREE LAXMI-NARAYAN PRESS, BOMBAY NO. 2

शहाजी या पत्रांत ऐटीनें सांगत असल्यामुळें, ' छत्रपति भोसले हे मूळचे अस्सल क्षत्रिय होत ' हें सिद्ध करण्याकडे, आणखी इतर पुराव्याबरोबर, राजवाड्यांनीं शहाजीच्या या उद्गारांचा उपयोग केला आहे. तथापि याशिवाय आणखी पुष्कळ ऐतिहासिक महत्त्वाच्या गोष्टी या पत्रांत भरपूर असल्यामुळें, आणि त्या अभ्यासकांनीं अवश्यमेव ध्यानांत घेण्यासारख्या असल्यामुळें, मुद्दाम हें पत्र थोड्याशा आधुनिक स्वरूपांत वाचकांस सुलभ समजावें ह्मणून छापीत आहें. दोन तीन फारसी तज्ज्ञांच्या मार्फत हें सबंध पत्र शब्दशः समजून घेण्याचा मीं प्रयत्न केला. आरंभींच्या पांच सात ओळी—औपचारिक मायन्याच्या—छापण्यांत गाळल्या आहेत. पत्राचा शेवटचा भाग गहाळ आहे. पत्र महत्त्वाचें असल्यामुळें त्याचें या ' शिवाजी संस्मृति ' ग्रंथांत इंग्रजी भाषांतरही देत आहें. संशोधनाच्याच दृष्टीनें ज्यांना मूळ छापील पत्र पाहवयाचें असेल, त्यांनीं तें आरंभींच्या पुस्तकांतच पाहवें. मूळची भाषा बदलण्यांत बहुधा अर्थाचा विपर्यास न घडावा अशी खबरदारी घेतली आहे. शाळांत जाणाऱ्या मुलांमुलींनीं सुद्धां हें पत्र अवश्य वाचण्यासारखें आहे.

पत्रांत निर्देश केलेल्या मोहिमांचा संपूर्ण छडा लावण्यास पुष्कळ अडचणी आहेत. शहाजीचा आयुःक्रम निश्चित होईल तेव्हांच पत्रांतील या अनेक बाबती स्पष्ट होतील. यांत कनकगिरि, अनागोंदी, अकलूज, टेंभुर्णी, पेडणें, मुसलकल, बल्लारी, कुंद-गोळ व लक्ष्मेश्वर या प्रसिद्ध स्थलांचा उल्लेख आहे. त्यांशिवाय कदनवेली, तामगौड, वडेरू, कर्यात कारवें, भूतग्राम व दिलगोवा या स्थळांचा उल्लेख आहे, त्यांचा छडा लावणें जरूर आहे. बल्लारी जिल्ह्यांत तुंगभद्रेच्या दक्षिणकांठीं कंपली म्हणून गांव आहे तेथें शहाजीनें बागा व वाडे तयार केले होते. त्याचे जवळपासच तामगौड व मुसलकल हे परगणे असले पाहिजेत. वडेरू हास्पेट तालुक्यांत आहे.

" थोरले हजरत साहेबांचे पदरीं व आपले पदरीं नोकरी केली; " " मीर जुम्ला याजबरोबर बंडखोर लोकांचे वकील गेले आहेत; " असें शहाजी म्हणतो. त्यावरून महंमद आदिलशहा ४-११-१६५६ रोजीं मरण पावल्यावर त्याचा मुलगा अली आदिलशहा गादीवर बसला, त्यास हें पत्र १६५७ त लिहिलेलें दिसतें. कदाचित् एकादें वर्ष पुढचेंही असूं शकेल. अली आदिलशहा राज्य करूं लागल्यावर मोगलांनीं विजापुर राज्यावर चढाई केली, तींत मीर जुम्ला स. १६५७ च्या मार्चपासून पुढें एक वर्ष मोगलांचे बाजूनें लढत होता. या परिस्थि-तींत तो कर्नाटकांतील निरनिराळ्या बंडखोरांस उठवूं लागला असून, त्यांचा बंदोबस्त करण्याची आदिलशहाची कामगिरी शहाजी या वेळीं बल्लारीचे बाजूस करीत होता. यावरून पत्राची मिति निश्चित होते. सावंतरावाचा उल्लेख पत्रांत " बडे भाई " या

शब्दांनीं शहाजी करतो, तो कोण असावा हें ठरविलें पाहिजे. तसेंच शहाजीचा चुलतभाऊ त्रिंबकजी आणि सीदी अज्जम सीदी संबूल यांचा उल्लेख या पत्रांत केलेला आहे. जेधे शकावली, जेधे करीणा व दुसरीं कित्येक प्रस्तुत पत्राप्रमाणें महत्त्वाचीं पत्रें, जीं या पुस्तकांत मुद्दाम इंग्रजींत देण्यांत येत आहेत, त्या सर्वांचा उपयोग शहाजीची कामगिरी निश्चित करण्यास चांगला होईल, अशी धारणा आहे.

शिवाजीच्या वेळेस एकदम कांहीं अद्भुत शक्तीनें मराठ्यांच्या अंगीं स्वातंत्र्याचें नवीन वारें उत्पन्न झालें असा जो आरंभीं विशेषतः पाश्चात्य लेखकांचा ग्रह होता, त्याचें या पत्रानें चांगलें निरसन होतें. कै. राजवाड्यांचा मराठी इतिहासासंबंधीं मुख्य उद्योग हाच कीं, शिवपूर्वकालीन शेंपन्नास वर्षांतील असे जुने कागद उघडकीस आणून त्यांनीं मराठ्यांच्या या नवीन स्फूर्तीची संगति जुळवून दिली. शिवाजी, शहाजी, मालोजी, बाबाजी ही चौकडी एका बाजूस, तर औरंगजेब, शहाजहान, जहांगीर, अकबर ही चौकडी दुसऱ्या बाजूस मनांत ठेवून, त्या काळचा इतिहास लिहिला पाहिजे. बाबाजी भोसल्यानें दिलेल्या कित्येक सनदा उपलब्ध झाल्या आहेत. मालोजीनें तर जाधवरावाची मुलगी जिजाबाई हट्टानें आपल्या मुलास करवून जाधवांच्या बरोबरीनें आपला पराक्रम सिद्ध केला. तदुत्तर शहाजीनें केलेल्या पराक्रमाचे उडते उल्लेख आपणांस या पत्रांत पाहवयास मिळतात. त्यांत त्याचा तेजस्वी क्षत्रिय बाणा तर स्पष्ट रीतीनें त्यानें बोलून दाखविलाच आहे. दक्षिणेंतील तीन ब्राह्मणी राज्यें व उत्तरेंतील मोगल अशा चार राज्यांत आपण नोकरी केली, पण अपमान सहन केला नाहीं, असें तो सांगतो. त्यावरून त्याची योग्यता व्यक्त होते. रणशौर्य व राजकारण या दोनही बाबतींत त्याची बुद्धि सारखीच खेळे. पश्चिमेस कल्याण माहुलीपासून गोव्यापर्यंतचा किनारा, उत्तरेस तापी गोदावरीपर्यंतचा टापू, पूर्वेस नगर, बीड, परेंडा, गोवळकोंडा, कनकगिरी, अनागोंदीवरून थेट दक्षिणेस जिंजी, तंजावर, म्हैसूर, बेदनूर, एवढ्या विस्तीर्ण टापूंत शहाजीचे हे दोनही गुण गर्जतांना दिसतात. औरंगजेब, मीर जुम्ला वगैरेंचे कावे ओळखून त्यांस प्रत्युत्तर देण्याची धमक तो बाळगतो. या सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या म्हणजे शिवाजीनें पुढें केलेल्या उद्योगाची अर्धीअधिक सिद्धि शहाजीनेंच संपादिली होती, याबद्दल संशय राहत नाहीं. फरक फक्त शाब्दिक भावनेचा होता. शहाजीनें मुसलमानांच्या खिजमतींत म्हणजे सेवाधर्मात जीवितसाफल्य मानलें, तर शिवाजीनें एक पायरी पुढें जाऊन पूर्ण स्वातंत्र्याची जाहिरात फडकावून दिली.

वरील अनेक कागदांची सिद्धता करण्यांत ज्यांनीं ज्यांनीं मला साह्य केलें, त्यांचा मी फार फार आभारी आहें.

---

# शिवकालीन पत्रें.

## (१) शहाजी राजे यांचें पत्र.

(श्री सांप्रदायिक विविधविषय खंड १ पृ. २०९)

ता. ६–७–१६५७.

विजापुरचे पातशहा अली आदिलशहा यांसः—

महाराज शहाजी राजे यांची सलामपूर्वक विनंति कीं, पूर्वीं पातशहांचे दरबारांतून आमची रवानगी कनकगिरि परगण्यांत होऊन, ती कामगिरी सिद्धीस नेल्याबद्दल पातशहांकडून आम्हांस योग्य मोबदला मिळाला. तदुत्तर अनागोंदीची कामगिरी आम्हीं केली; त्यास महिना होऊन गेला, अद्यापि त्याचे मोबदल्याचा सरंजाम नेमून मिळाला नाहीं. तरी त्यासंबंधानें आमचे लष्कराची समजावीश झाली पाहिजे. कुंदगोळकर बंडखोरांनीं आपले परगण्यांत व तामगौड तर्फेंत बहुत उपद्रव मांडिला होता, त्यांस शिक्षा करण्यासाठीं पातशहांनीं आम्हांस फर्माविलें. त्या तर्फेस लागूनच म्हैसुरकरांची हद्दही नजीकच आहे. त्या बंडखोरांस तंबी दिल्याखेरीज पातशहांची इभ्रत राहणार नाहीं असें पाहून, हजार दीड हजार नवे शूर लोक ठेविले आहेत. त्यांनाही कांहीं जागीर–मुलूख दिल्यावांचून त्यांची समजावीश होणार नाहीं. म्हणून आपसाहेबांचे सेवेशीं हा अर्ज करीत आहों. परगणे अनागोंदीचे कामगिरीबद्दल आम्हांस नवीन सरंजाम असा जाला पाहिजे कीं, त्याचा ऐवज कर्यात अकलूज व तपे टेंभुर्णी अथवा भूतग्राम व पेडणें, यांत आमच्या पूर्वींच्या मुलुखास जोडून मिळावा. जुन्या मुलुखास जोडून हा नवीन सरंजाम द्यावयाचा नसल्यास, मामले पातशहाबादेंत सरंजाम व्हावा, आणि पातशहाबादेंत जागा नसल्यास परगणे वडेरू यांतला मुलूख चंजाउरकरांस दिला आहे, तो तरी आम्हांस या कामगिरीबद्दल आपण द्यावा. चंजाउरकर पुंडांचें शासन करून, आम्ही तो मुलूख सोडवून घेऊं. एकवार सुटलेला मुलूख फिरून त्या बंडखोरांसच परत देण्यांत काय फायदा ? सगळ्या बंडखोरांचे वकील मीर जुम्ल्याबरोबर गेले आहेत. परगणे मुसलकलही आमचीच जागीर आहे. मागें रुस्तुमजमां यांजबरोबर माहुलीहून आम्ही विसां रोजांत सरकारच्चरणीं दाखल झालों, त्या वेळीं चार लाखांची जागीर आम्हांस दिली. त्यामध्यें मुसलकलचें फर्मान आमचे नांवें पूर्वींच दिलेलें आहे. त्यावर दुसऱ्यानें मयत

खानेअज्जम आसदखान यांचे मार्फत लक्ष्मेश्वरचे प्रसंगीं आम्हांस फिरून फर्मान मिळालें आहे. त्यावर तिसऱ्यानें खान अहंमदखानाचे वेळींही तसेंच मिळालें आहे. असा तीन वेळ परगणे मजकूरचा फर्मान आमचेच नांवें मिळाला आहे. त्या फर्मानांच्या नकला सरकारी दप्तरांत असतील; त्या आपण काढून पाहिल्या पाहिजेत. असें असतां आमचे भाऊ व आप्तमंडळी यांचे समाधानासाठीं आपण त्यांचे नांवें निराळें फर्मान काय म्हणून दिलें? त्यांनीं भलभलताच मजकूर सरकारांत समजाविला, आणि कर्यात कारवें या आमच्या जागिरीपैकीं पंधरा गांवें मुसलकलचे मोबदल्यांत त्रिंबकजीस दिलीं; तर असें करावयास आपणांस गरज काय? हजरत साहेबांनीं हा कौल आमचे नांवें पूर्वींच दिलेला आहे, त्यांत करार आहे कीं, तुमच्या जागिरीपैकीं एक चाहूर जमीन सुद्धां परत घेण्यांत येणार नाहीं. पातशाही कामासाठींच तुमचे जागिरींत कांहीं कमी करण्याची जरूर पडल्यास त्याचा सवाई मोबदला दुसरीकडे देऊं, तेव्हांच कांहीं कमी करणें असेल तें करूं. असें आपलें आश्वासन असतां, अकर्तुकांचे सांगण्यावरून आमचे जागिरींत गैरहिशेबानें पातशहा आतां खलेल करतील, तर आम्ही रजपूत लोक आहों; आजपावेतों चार पातशाहींत नोकरी केली, परंतु गैरहिसाबी भलतेंच नुकसान सोसून बेअब्रूनें व गैर-मेहेरबानगीनें पूर्वींही नोकरी केली नाहीं, व पुढेंही करणार नव्हों. आज दीड वर्ष आम्हीं उमेद राखून नुकसान सोसलें, तें याच भरंवशावर कीं, पूर्वीं थोरले हजरत साहेबांचे मेहेरबानगीस आम्ही पात्र झालों, व आप हजरतसाहेबही आजपावेतों मेहेरबानगीच राखीत आले; आणि हल्लीं प्रसंगही अडचणीचा, हें मनांत आणून, आम्ही आतांपर्यंत सबूरी केली, सहनशीलता धारण करण्यास कमी केलें नाहीं. सबब, यापुढें हजरत साहेबांस आमची जरूर असेल तर हिशेबाचे राहे आमचा सरंजाम आपण पूर्वींप्रमाणें करून देविला पाहिजे, आणि आमची दरकार नसेल तर खुषीनें आम्हांस रजा दिली पाहिजे. इतउत्तर आम्हांस जास्त पराक्रमाचे मामले संपादण्याची हौस बिलकुल राहिली नाहीं. एकाद्या हिंदूंच्या तीर्थांत राहून परमेश्वराची सेवा करून, हजरतसाहेबांस दुवा देत राहूं. आमचे भाईबंद आहेत त्यांजपासून आपण सेवा घेतली पाहिजे, आणि त्यांजपासून सेवा घेणें नसेल तर त्यांसही रजा द्यावी. इतर भाईबंद जेथें आपलीं पोटें भरतात, तेथें हेही भरतील; परंतु आमची नाहक बदनामी करूं नये. याच हेतूस्तव हजरत साहेबांचे सेवेस ही अर्जदास्त पाठविली आहे. बडेभाई ( सावंतराव ) यांनींही आपल्या सेवेस अर्ज करून सदरीलप्रमाणें, अनागोंदीच्या कामगिरीचा मोबदला व

पंधरा गांवांचा ताजा फर्मान आमच्याच नांवें देववावा, अशी विनंति केली आहे. त्याप्रमाणें आपणांस करणें नसेल तर आह्मास राजीखुषीनें रजा दिली पाहिजे. तसेंच आह्मीं कनकगिरी व अनागोंदी हे परगणे घेऊन सरकारांत दिले, त्यांपैकीं एक गांव कंपली दीड दोन हजारांचा असून, तेथें आम्हीं राहत आहों. तेवढें एक गांव आपण आम्हांकडे राहूं द्यावें. या ठिकाणीं आम्ही बागबगीचा केला असून, जागाही हवाशीर आहे. तो गांव सरकारचरणीं अर्ज करून आमचे नांवें मुकर करून द्यावा, असें आम्ही मश्रुलदौला सावंतराव यांस लिहिलें होतें. त्याप्रमाणें मशारनिल्हे सावंतराव यांनीं आपणाकडे अर्ज केला, त्यावर हजरतसाहेबांनीं हुकूमही फर्माविला कीं, अनागोंदीच्या प्रकरणीं मेहनत केली त्याबद्दल कंपली गांव सोडून द्यावा. पुढें आपणास राहण्यास जागाही नव्हती, आणि तामगौड तर्फेहूनही ताजी खबर आली कीं, कुंदगोळकरांचा बंदोबस्त आपले लोकांनीं चालविला असतां त्यांनीं फिरून सावरासावर करून कोटास येऊन दिलगोव्याजवळ लढाई आरंभिली. ही खबर येतांच, अशा वेळीं मदत न केल्यास जागा हातची जाणार हें मनांत आणून, आणि पूर्वीं हजरत साहेबांनींही त्याबद्दल परवानगीच दिली होती म्हणून, छ ४ सव्वाल रोजीं कंपली गांव आपसाहेबांकडील लोकांचे व कदनवेलीकरांचे हवालीं करून, आम्ही स्वार झालों. एक मजल आल्यावर अनागोंदीकर व दुसरे आपले सेवक यांनीं नाना प्रकारें भलभलतेंच आपणांकडे समजाविलें. आमच्यावर ते जबरदस्तीनें चालून आले, आणि पातशाही लोकांबरोबर तंटा करून त्यांजपासून कंपला परत घेतली. अशी खबर आम्ही कंपलीहून आल्यावर प्रहररात्रीं आम्हांस आली, ती पूर्वीं आपणांस लिहून कळविलीच आहे. आतां पुढें सीदी अज्जम सीदी संबूल आल्यावर अनागोंदीस व कंपलीस व इतर मुलुखास उपद्रव देतील कीं न देतील तेंही पुढें दिसून येईल. आज शंभर वर्षें या मुलखांत बखेडा चालला आहे. बंडखोरांस चांगली शिक्षा देऊन, गाडून टाकिलें होतें. असें असतां तीं ठिकाणें ज्यांनीं पातशाही नोकरांचे हातून हिसकावून घेऊन, या थोड्याशा हरामखोरांस देवविलीं असतील, त्यांस त्याबद्दल आपसाहेबांनीं जाब विचारिला पाहिजे. हल्लीं आपसाहेब स्वार होऊन मजल दरमजल येतात, म्हणून आज महिना दीड महिना साहेबांचे येण्याची वाट पाहत राहिलों, परंतु साहेबांचे येण्यास विलंब झाला. सबब, पातशहांची पूर्वीं परवानगी झाली होती त्याप्रमाणें आम्हीं स्वार होऊन बल्लारीनजीक आलों आहों. पुढेंही मजल दरमजल तामगौड तर्फेस जात आहों. तरी आम्ही पूर्वीं लिहिलें आहे त्याप्रमाणें कुंदगोळकर बंडवाल्यांस परभारें फर्मान पाठवावें; आणि

आमचे नांवचे कागद असतील ते आम्हांस इकडे पाठविले पाहिजेत. कंपली गावांत चारा मुबलक नव्हता, घोडीं जायां झालीं, जास्त राहवें तर आणखी नुकसान होणार. तामगौड तर्फेस चारा झाला आहे असें पाहून, तेथें जाऊन हरामखोरांचें आम्ही स्वतः पारिपत्य करून, दोनही महालांची मजबुदी करून, पुढें येणाऱ्या मसलतीस तयार राहिलों आहों. किंवा, त्या मसलतीचें काम तहकूब ठेवून पूर्वींच्या कराराप्रमाणें जी कामगिरी हुजूर फर्मावितील ती उठविण्यासही आम्ही मजबूद आहों. ( अपूर्ण. )

---

## ( २ ) शिवाजीचें शहाजीस पत्र.

श्री

वडिलांचे शेवेसीं. शिवाजी राजे याणीं चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना ऐसीजे. ' बाजी घोरपडे मुधोळकर याणीं स्वधर्म साधनता सोडून यवन दुष्ट तुरुक ह्याचे कृत्यास अनुकूल होऊन दगाबाजीचे हुनरे करून विज्यापुरास येणें घडलें, तेथें गुजरला प्रकार निर्वाणचा तो तुम्ही समजलांच आहां. तोहि प्रसंग श्री तुमचा मनोरथ सिद्धीस नेणें व स्वधर्म राज्यवृद्धि करणें म्हणोन पार पडला. सांप्रत पुन्हा दुर्बुद्धि धरून खवासखान विजापुराहून फौजेसुद्धा रवाना जाहले. त्याची हरोळी बाजी याणीं व लखम सावंत व खेम सावंत याणीं प्रतिज्ञापूर्वक जत करून सेना समवेत निघाले, ते तिकडे येत आहेत. तुम्हांस श्रीसांब व अंबा यश देणार पूर्ण आहे. ये समयीं त्यांचें वेढें घ्यावें आणि, ' आमचे मनोदय शेवटास नेणार तुम्ही सुपुत्र निर्माण आहां,' म्हणोन आज्ञा केली. त्यास बाजी घोरपडे पुढें मुधोळास घरीं कांहीं जमेतनसीं आले हें कळतांच फौजेनसीं आम्ही तेच क्षणीं स्वारी केली. त्यांचा प्रांत लुटून तळपट जान करून ठाणियास जेरदस्तींत आणिलें. हें जाणोन त्याणीं सर्व जमेतनसीं लढाईस निघाले. युद्ध तारफेचें जाहालें. बाजी मारिले व कितेक खासे लोक पडले. या प्रकारें तो प्रसंग करून लुटून फस्त केले. मत्ता बहुत लागली. पुन्हा आपलेसे करून मुधोळ पंचमहाल आपला करून स्थापिले. यानंतर खवासखान पुढें आला पाहून त्याजवर चाल केली. ते मारीत लुटीत गर्दी केली. खटा होऊन पळूं लागले, ते विजापुरास पावविले. यानंतर सावंताचा निशाच करावा म्हणोन त्या प्रांतांत शिरलों. तेही येऊन पावले. मुलूख तळपट करीत चालिलों. ठाणीं व किल्ले तमाम घेतले. सावंत दमोन गेले. गोमंतकराचा आश्रय निघोन फोंड्याचा किल्ला भांडू लागला. त्यास सुरंग लावून बुरूज उडवून बळ्यानें घेतला. याप्रमाणें एकंदर तें संवस्थान घेतलें. यानंतर फिरंगी याजवर शह देऊन त्यांचा

प्रांत मारीत चाललों. त्याणीं तह करून तोफा नजराणा पाठविला. सावंत यास तेथें दम न निघे. टोपीकर यास धीर न पडे. त्याजवरून पीतांबर शेणवी कारभारी वकील पाठविले. "आपण सावंत भोसले कुळीचे, आपले पुत्र आहों. सर्फराज करून देसगतीच्या वतनाची सेवा घेऊन, प्रांताचा ठराव निमे ऐवज व निमे ऐवज सरकारांत वसूल घ्यावा." ऐसें करून घेतळें. त्याप्रमाणें स्वामीचे पुण्यप्रतापें करून आज्ञेप्रमाणें घडोन आलें. त कळावें म्हणोन लि ॥ हे विज्ञापना मोर्तब.

( पिंगुळकरकृत सावंतवाडी इति० )

---

## ( ३ ) शिवाजीचें बाजी प्रभूस पत्र.

म॥ अनाम बाज प्रभु प्रती राजेश्री सीवाजिराजे सु॥ तिसा खमसैन अलफ जासलोडगड हिरडस मावलमधे आहे. तो गड उस पडला होता याचे नाव मोहनगड ठेउनु किला वसवावा यैसा तह करुनु किल्यास मसुरलअनाम पिलाजी भोसले यासि किले मजकूरचा हवाला देउनु पाठविले असेत व म॥ इलेबराबर किलाचे संगनाती बदल लोक २५ पाठविले असेत. तरी तुम्ही म॥ इळेस व पंचविसा लोकास बराबर घेउनु मोहनगड गडावरी जाउनु हवालदारास व पंचविसा लोकास किल्यावरी ठेवणे आणि किलाच्या हवालदारास घर व लोकास अलंगा मजबूद करुनु देणे. घर व अलंगा करुनु द्याल त्या पाउसाने अजार न पावे यैसा करुनु देणे. नाही तरी सजवज करुनु द्याल आणि किल्यावर लोक राहातील त्या आजार न पावे यैसे हवालदारास घर व लोकास अलंगा व येक भाखळ मुस्तेद करुनु देणेचे. तुम्ही सदरहु प्रमाणे काम विलेवार लाउनु द्याल म्हणउनु साहेबास भरवसा आहे. याबदल तुम्हास लिहिले असे तरी सदरहु लिहिले प्रमाणे किला मजबूद करुनु देणे मग तुम्ही किल्याखाले उतरणे छ १ रमजानु मोर्तबसुद

मर्या
देयंविरा
जते

शके १५८१ विकारीसंवत्सर जेष्ठशुद्ध २ शुक्रवार
१३ मे १६५९. ( रा. स. ग. जोशी, संशोधक, यांजकडून )

श्रीशिवन
रपति हर्ष
निदान साम
राज मतिम
त प्रधान

## ( ४ ) फरमानाचें भाषांतर शिवाजीस ठार मारण्याबद्दल अफजलखानास हुकूम.

बिसमिलाह आर रहीमान निर रहीम
सर्व उत्पन्नाचा धणी ईश्वर आहे
शिक्यातील अक्षरे
या आली मदद
मोहोरे षाहिजद्ज मेहरे मुर्तजा
बर मेहरोमाह ॥ खुसखे आदिल
आलिब आदे मुहंमद पादषाह
**शिक्यांतील अक्षराचा अर्थः—**
हे आलि पैगंबरात् साह्य कर

फर्मानाचें हें भाषांतर पूर्वकाळचें तसेंच दिलें आहे.
—गो. स. स.

सुलतान महंमद पादषाह नंतर ईश्वराचे कृपेकडून आलि अदिलषाह पादशाह याणी चंद्र सूर्यावर पादषाही शिका ठोकिला–म्हणजे चंद्र सूर्य आहेत तो पर्यंत हा हुकूम सर्वांनी मान्य करावा यदर्थी हा शिक्का ठोकिला आहे.

कान्होजी जेधे यांस हा फर्मान सादर केला जांतो जे. सु॥ तिसा खमसैन व अलफ. शिवाजी महाराज याणी अविचार व अज्ञानपणाने निजामषाहचे कोकणांतील राहणारे मुसलमान लोकांस उपद्रव देण्याचा हात लांबवून लुटालूट करून पातषाही मुल्कातील कितेक किल्ले आपले हस्तगत केले आहेत. यास्तव शिवाजीचा पराभव करण्याप्रीत्यर्थ महासामर्थ्य व पराक्रमाधार व प्रकृतीचे मान वोळखणार व कार्यभार जाणणार व श्रेष्ठ वजीर मंडळींतील अति उत्तम व संभावित मानकरी मंडळींतील मुख्य व शूरत्व व पराक्रम समुद्रांतील केवळ सुसरच व बुद्धिमानपणा व यशाचे खाणींतील मुक्ताफल व शूरत्वाचे रणभूमीतील अश्वारूढ व पराक्रम भूमीतील महाशूर व अत्यंत कृपा करण्यास व योग्यता वाढविण्यास योग्य व सहस्रावधी प्रकारच्या कृपा व स्तव करण्यास पात्र व संभावितपणाची स्थिति आहे ज्याची व संपत्तीचे केवळ चिन्हच व पुत्रवत अधिकाराचे व या काळातील सर्व शिपाई मंडळीचे सरदार व श्रेष्ठत्वाचे आकाशातील अतितेजस्वी नक्षत्र व सर्व विद्वानांचे विद्वान व मुलकी व कालीकामाचा बंदोबस्त ठेवणार व कल्याण इच्छक मंडळीतील प्रमुख व मुलूख घेणार व राज्य हस्तगत करणार असे जे अफजलखान

महमदषाही यांस कृपाळू होऊन तिकडील सुभेदारी देऊन महाप्रळकारक फौजेसहित नेमून पाठविले आहेत. तरी खान म ॥ निलेचे रजामंदींत व ताबेदारींत तुम्ही राहून शेवकपणाचे अधिकार सिद्धीस नेउन शिवाजीचा पराभव करून निर्मूळ फडशा करावा, आणि शिवाजीचे निसबतीचे लोक ज्या ज्या ठिकाणीं राहिले असतील व जेथजेथून येतील त्या लोकास आश्रय न देतां त्यांस ठार मारून या सरकारचे दौलतींचे कल्याण इच्छिणे व उत्तम सेवा करून दाखविणेची चाल प्रसिद्ध करून दाखवावी. कारण कीं खान मशारनिलेचे लिहिण्यावरून दौलतीचे कल्याण इच्छिण्याची चाल तुमची या सरकारांत मंजूर होउन तुमची योग्यता वाढविली जाईल व तुमचें कल्याण करण्यांत येईल व खान म॥ निले हे इकडील दौलतींचे कल्याण इच्छिण्याविषई व पादशाही मसलती प्रकर्णी तुम्हास जें कांहीं सांगतील व लिहितील तें तुम्हीं कबूल करून त्याचप्रमाणें वर्तणूक करीत जावी व खान म॥ निलेचे सांगण्या व लिहिण्याप्रमाणे जो कोणी वर्तणूक न करील त्याने पुरते जाणावे कीं त्यास कदापि उत्तम फल होणार नाही. हें जाणोन या सरकारी आज्ञेप्रा॥ चालावे तेरीख ५ माहे सवाल सन १०५९ ( १६।६।१६५९ ) अतिश्रेष्ठ व कल्याणकारक अतिपवित्र सूर्यवत प्रसिद्ध सरकारची हुजुरची परवानगी जाली असे.

( रा. स. ग. जोशी, संशोधक, याजकडून. )

---

## ( ५ ) सांकेतिक पत्र.

श्री

॥ डि खं सि क्ष ग ट धृ ण्षा मि ईं चा ळा त ड धु ढा चा खे डा त
॥ ध ट झां बि ना स ट म जा ध टु ख ट डा ष पि ध टा ड झा बे
॥ खि त्व झा स ई ठे झा ळि बा मा च ता ठ ग व ठ झा ड ट
॥ झे ध ळो ख टो म ई कि ध ठा प ठे ग टं सु । झा ळि बि जा
॥ मि बे ज र्मि गृ जा षे ळझा ड झा बि ल झ ट ठि स्झा बा ज
॥ तु ळा ति क्क ध टु ख ज क्झ त्सा गा ति ळि । ठथा ग धि
॥ झा ळ ठि थु ख । ळझा डि अ सधा जा सृ पुं सा स्झांब्रे
॥ धा ट ष थे ब धि से हि ट झा ळ ई ते ज्थ ष मे झे हि ठ
॥ ळे क्ष झा ने टि म ळु त टे खा थि ई ते इात सा बि जा मि
॥ खि ई ग ठे लि धा षि क्ष ळा त थो क्ष ख धो स ज खा
॥ मि त । ता पु ख गा ल डि ठे धि झे हि ठ ढा ढ ड स खा धि
॥ जि झे क्ष ख गे बा स ग व ठो क्ष छ झ सा क क षि झा षि
॥ खी ज म ठा धा शु ख ख्झा डे स्झा त झा खि टो गा खे
॥ ई म ड ट ता क ख धे ठे से वृ हा थो क्ष ख ई प ठा पु
॥ ख स टथे त मा अ ठ ई ता गृ धा ट ई थे स्झा त च
॥ ठ ळे थि बे ठ उ म ट ला डि ढि सि द् गृा झ ळु त टे
॥ खा थि त र्ड गृ धा टे छ ट ड ता स्झा बा ले डि सा स
॥ ई ते ई तो ख बि जा मि भ द् भे ळ्ट ध टु ख ई प ठा
॥......बां प ठे खा थि थे ड र्स जा ख म
॥......स्झा बि ना स ट म जा टा थु ख अं
॥ ळु ट ध ट च थ धु ख गा डे स ई ति झो म खा ई
॥ ता डि वृ उ धा झे ज ई त ठि झा त तर्ड पो ळि
॥ फ व सा स झा म ठा जा सृ म गा डे थे बा प ठे ई
॥ थे थे ग स्ट ई चा त ख ध द् सा ठि थि ठे ई थे
॥ झा बा क्ष थु खा झ धा त ख त ज मे ई झं ते ध टा
॥ डे थे ड र्स जा ख ई ज्था त ई चा ध वु ख ब त
॥ ज म ठे ग ट सु ग टि षा ज झा बा खि र खा थि
॥ झा म ध टि सा ईं पा क्ष तु ब खा ठि थि ठि ई थे
॥ धो ले थि डा ध वे ख ग वे से ध टा डे ट डा षा अं
॥ ळु डा ट ळो ख गृ थ ट

---

## संकेताचा खुलासा.

अ=ई
ई=अ

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| क=ध | च=ब | ट=र | त=स | प=ग | य=झ | ष=ण |
| ख=न | छं=भ | ठ=ल | थ=ह | फ=घ | र=ट | स=त |
| ग=प | ज=म | ड=व | द=ळ | ब=च | ल=ठ | ह=थ |
| घ=फ | झ=य | ढ=श | ध=क | भ=छ | व=ड | ळ=द |
| | | ण=ष | न=ख | म=ज | श=ढ | क्ष=उ |

विनंति उपर कृष्णाजी आंबादास व कुशाबा नेवासकर यांची खातरजमा करून रवानगी करावयाचे निस्चयात आले. यादीचा जाबसाल पडल्यावर येक दोन रोज अधिक लागले परंतु यादी चिमाजीचे मर्जीप्रमाणें द्यावयाची ठरली. त्याचा मसुदा सिद्ध करून मध्यस्तापासी दिल्हा. पकी याद लिहून द्यावी इतका मात्र गुंता. त्याचे कारण हेच कीं तेथील याद आली म्हणजे येथील देऊं. याखेरीज दुसरे नाहीं. आसे आसतां **चिमाजींनी** आपले ठिकाणी उदास होऊ नकोत **मनाजीस** सांगून पाठविले कीं येथील शाशवत नाही. मी येऊन पेचात पडलो. उभयता धनी यानी मजला काढून न्यावे. त्यास या निरोपाने आजवर साधन केले ते वृथा होउन आग लागून तऱ्हेस जाइल असा प्रकार आहे त्यास **बलदेहीचे** लक्ष **जरठा**विशी तिळप्राय दुसरे नाहीं. सर्व प्रकारें भरंवसा त्याचा ठेवितात. असे असोन **चिमाजी** छळछेद्र करून आग लावतात हे वर्तमान ज * * त्याची खातरजमा राहून **इंदूरकर** बहकू न पावेत आसी योजना असावी लक्ष कायेम असालियास सर्व गोष्टी घडतात. याजला मात्र जपावे हे फार चांगले आहे. हे **पत्र आबास न** कळता लिहिले आहे याचा उद्दू **नायकास** न समजे आयसे करावे. हे वर्तमान आम्हास **आबा**कडूनच समजले परंतु परिणाम याचा नीट नाही याजकरिता आगाउ सूचना लिहिली आहे कोठेही वाकडे न पडे ते करावे रवाना इंदुवार दोन प्रहर. (रा. स. ग. जोशी, संशोधक, यांजकडून).

---

## ( ६ ) जिजाबाईचें इनामपत्र.

### सौभाग्यवती भानाबाईस चोळीकांकणाबद्दल इनाम जमीन.

आज्ञापत्र सौभाग्यवती मातश्री जिजाबाई भोंसली मोकदम, कसबे जिंती, परगणे श्रीगोंदे, कडेवलीत यांनीं दानपत्रें वतनावर वतनभाऊ आणि पुरातन चाकर एकनिष्ठ याजवर कृपाळू होऊन इनाम जमीन सवा चावर बिघे १५० दीडशें राजश्री विसाजी रंगनाथ सोनटक्के कुळकर्णी, कसबे मजकूर याची स्त्री सौभाग्यवती भानाबाई यांजवर कृपाळू होऊन चोळीकांकणास म्हणून जमीन नेहर शेरी नजीक शीव बाभूळगांव जमीन बिघे १२० एकशें वीस एकूण चावर १८० एक व मळाकुरण व उराभुडकी जमीन बिघे ८३० तीस एकूण पाव चावर, वोलवा व मोटस्थळ बिघे ८४ कोरडवाव जमीन बिघे ८२६ सव्वीस, एकूण सव्वा चावर जमीन वंशपरंपरेनें अनुभऊन सुखरूप राहणें. एकूण येणेंप्रमाणें दानपत्रें अजरामऱ्हामत निधिजल, तरु, पाषाण, चंद्र, सूर्यपावेतों अनभवीत जाणें. राजश्री रंगो गणेश सोनटक्के कुळकर्णी, कसबे मजकूर हे हिशेब मोहसब यावयास किल्ले कोंडाणा, राजश्री दादो कोंडदेऊ यांचे घरीं भोजनास बोलाविलें. भोजन करून खोलीमध्यें बिछाना करून निद्रा केली पांच सहा घटका जाहालियावर अंगाची आगी जाहाली. पाणी पाणी करून खोलींत प्राण गेला. खोलीस बाहेरून कुलूप होतें. दुसरे दिवशीं खोलीचें कुलूप काढून पाहिलें तों मृत पावले. प्राण निघोन गेला, असें वर्तमान जाहलें. याजकारितां साहेब कृपाळू होऊन, दानपत्रें इनाम करून दिल्हीं असे. कदीम सेवा केली आहे. भोंसले यांचे वंशीं कुटुंब दाखल याचें चालवोन जे कोणी अंतर करील त्यास श्री वारणसीची शपथ असे. शके १५२६ [ क्रोधी ] सिध्यर्थीनाम संवत्सरे, माघ शुद्ध सप्तमी, रविवार, लेखनसीमा. ( सनदापत्रें पा. १०२ )

---

## ( ७ ) शिवाजी व पोर्तुगीज यांजमध्यें झालेला तह.

### ( सन १६६७ )

### प्रो. पांडुरंग स० पिसुर्लेकर, पणजी.

शिवाजी व पोर्तुगीज यांजमध्यें झालेले दोन अस्सल तह गोवेकर सरकारच्या दप्तरांत आहेत. पैकीं एक मोडींत असून दुसरा फिरंगी भाषेंत लिहिलेला आहे. मोडीमध्यें असलेला तह पुढीलप्रमाणें आहे:—

**शर्त नामा सलाह व दोस्ती राजे शिवाजी राजे व कोंदि विजुरई[1]**

विजरई अजमी शर्तनामां पाठविला तेथें मजमून कीं, कितेक मरतबे राजे अजम सिवाजी राजे ईज्यानेबची बेखतब जाहीर करून लिहिले होते जें, आपण आपले लोकासहित बारदेशामध्यें[2] देसके सबब जे देसाई तेथें होते म्हणोउन, व आपले नियत यैसे होते जे माहेद सलाह हमेशा चालावी म्हणोउन, त्यावरी ईज्यानेब खातरेसी आणोन येक करार केले जे, कदीम दोस्ती चालिले होते तेणेंच प्रकारीं मागुत्यानें दृढ चालावे याचे तपशील.

हाली राजे अजम सिवाजीराजे याहीं दोस्तीचे रवेशीने त्वरेने आमच्या पादशाही मुलकांतील बारदेशीचे रयेत लोक रवेलबानां मइ व अवरता व कचेबचे तरीख १९ माहे नौवेंब्रु सक १६६७ ते रोजीं अं राजे अजमाच्यालोकीं जें बंद धरोन नेली आहेत,

---

( १ ) कोंदि विजुरई ( Conde Viso-Rey ) ह्म० पोर्तुगीज व्हायसरॉय कोंदि द सां विसेंत्.

(२) बारदेश हा गोव्यांतील एक भाग आहे. सभासद (१९२३, पृ. ६८) मध्यें ह्मटलें आहे कीं, ' लखम सावंत कुडाळ प्रांत सोडून फिरंगणांत **बाहेर देशांत** पळाला ' बाहेर देशाचें foreign provinces असें डॉ. सेन यांनीं भाषांतर केलें आहे तें अर्थात् चुकीचे होय ( page 96 ).

(3) Cf. Orme's *Historical Fragments*, note XXIII मध्यें म्हटलें आहे. ' Father Navarette, who sailed from Goa on 16th Nov. 1670, writes :—" I mentioned in another place how he (Shivaji) attacked the territory of Goa, and carried away two or three hundred Christians and a Franciscan ". (ed. 1805).

शिवाजीच्या ह्या बार्देशवरील हल्ल्याचा उल्लेख फ्रेंच प्रवासी Pierre Joseph d'Orleans ह्यानेंही केला आहे ( पाहा Histoire de Sevagi et de son Successeur, Paris, 1688 )

त्यांपासीं यक रुका न घेतां सोडून द्यावी व बारदेशींची गुरें ढोरें जे कांहीं अढळोन जमां जाहली असतील तें द्यावी म्हणौउन विंजरईअजमी तपसिले लिहिले, तरी विंजरई अजमाचे लिहिले प्रमाणें जो बंद धरिला होता, तो यक रुका न घेतां सोडून पादरी गोशालें यांचे हवाला केले असे.

लखम सांवतें व केशव नायेक देसाँई ईंज्यानिबाच्या मुलखामधें राहिले आहेति, त्यासी येसे हुकूम फर्मासजे, ईज्यानेबाच्या पातशाही मुलकामधें असतां अं राजे अजमासी लगई व गरगशा न करावे. अं राजे अजमाच्या मुलकासी व रयेत लोकासी तसवीस व अजार ने दावी म्हणोउन, येसेयासी ते ईंज्यानेबाचे हुकुमेसी खिलाफ करोन चालतील, येसे ईजानेबासी जाहीर होतांची आणि राजे अजम लिहितील तेच वक्तीं त्यासी ईंज्यानेबाच्या मुलकातून बाहीर घालोन, देसाई मशारनिल्हे ईंज्यानिबाच्या मुलकामधेन असिले विलायती मधें वतनासी जावोन अं राजे अजमांसी व राजे अजमाच्या रयेत लोकांसी लगई व गरगशा करतील, यैसे तहकिला खबर ईंज्यानीबास रोशन होतांची, मांगुती फिरोन येऊन राहावयास ज्यानिबाच्या मुलकात जागा देणार नाहीं. नार सावंत व मलसेर्णवई ईंज्यानिबाच्या मुलकांत

---

(४) पादरी गोशाल ( Padre, Goncal, Martins ) ह्यास गोवेंकर सरकारानें शिवाजीकडे तह करण्यास पाठविला होता. ह्या पाद्र्याविषयीं इटालियन प्रवासी मानुक्सिकृत **Storia do Mogor.** vol. III, p. 168; vol. 4, p. 446. मध्यें कांहीं माहिती दिली आहे.

( ५ ) लखम सांवत हा शूर देसाई शिवाजीच्या भयानें पळून गोव्यांत बारदेशामध्यें येऊन राहिला होता. ह्याच्याविषयीं बरीच माहिती गोवेंकर सरकारच्या. दप्तरांत व G.A. Van Der कृत Chijs Dagh Register ( 1889 ) मध्यें मिळते.

( ६ ) केशव नाईक देसाई हा पेडणें ( गोवें ) येथील देसाई. लखम सांवतप्रमाणें हाही देसाई शिवाजीकडून जिंकला गेल्यावर गोव्यांत येऊन राहिला होता. ह्यासंबंधीं सन १६९५ मध्यें लिहिलेल्या ग्वार्दकृत शिवाजीच्या पोर्तुगिज चरित्रामध्यें माहिती आली आहे.

( ७ ) कुडाळकर देसाई.

( ८ ) डिचोली ( गोवें ) कर देसाई. शिवाजीचा पोर्तुगीज चरित्रकार ग्वार्द लिहितो कीं शिवाजी कोंकणांत शिरून लखम सांवत, केशव नायक, केशव परब व खळू शेणवी ह्या देसायांचा प्रांत काबीज केला व त्यांस गोवा शहरामध्यें पळविलें ( पहा Guarda कृत Vida de Sevagi 1730, p.27 )

येतले असतील तरी त्यांसी रायेण्यास हुकूम फर्माऊन देसायानीं मजकूर जवदरयें-तर आमच्या पातशाही मुलकांत असतील तरी त्यांनीं जंजिरे गोवे यामधे राहावे. साष्टी बारदेसविलायेतीमधे राहो देणार नाही म्हणोऊन, विंजरई अजमी लिहिले तरी देसाई मजकुरास जंजिरे मजकुरी बलखुद ठेऊन, आमच्या मुलका-मधे रयेतीस अगर दरयेक बाबे येक जरी याची तसवीस दिधली याने जंजिरे मजकुरीहून बाहेर घालावे.

बालेघाटाईऊन सरे बसुतचे बैल जंजिरे गोव्यासी व विलायती साष्टी बारदेशची येतिल त्यांसी अं राजे अजमाच्या लोकीं कैहव नाना न करावें व तेणेंच प्रकारीं इजानबाच्या पातशाही मुलकातील ये तरफेचे बैल बालेघाटासीं व अणिखी तरफेस जातिल, त्यांस लवाजिमां खेश बरहुकूम घयावे, अगर माहेम हजरत पादशाः अदिलशाः व अं राजे अजम गरगशाचें सह असेल तरी सौदागरी अमलाही फर्क पडो न दितां, हमिशा चालले आहे तैसेची राहे, गुजरी करोन सौदागरी अदल बेकुसूर चालो द्यावा म्हणोऊन विजरई अजमी लिहिले तरी सधरहु प्रमाणें आपण आपले सिरिस्ते प्रमाणें जकाती घेऊन चालऊन.

माहेद दोस्तीं महलाम सुद्दढ होऊन दरियामधे व खुशकीमधे चालावी येसेयासी दरम्याने गेरवाका अदल होऊन कुसूर पडेल तरी ते बाबे अं राजे अजम आपले तरफेनें विंजरई यांसी जाहीर करावें. तेणेंची प्रकारीं विजरई याहीं आपले तरफेनें अं राजे अजमासी रोंशन करावें. सरंजामींचे सवाल जबाब माहेद जाहलेया वेगले हरयेक तरफेनें सल्याचें व दोस्तीचें बंद न तोडावें. हे शर्तनामेवरी अं राजे अजमाचे व इंज्यानिबाचे निशान व सिके असावे, म्हणोऊन विजरई अजमी लिहीले तरी, सद-रहु लिहिले प्रमाणें ईजानेबानी कबूल केलें असें.

राजे अजम सिवाजी राजे यांचें मुदाहरयेक मसलदतीस कोंदि विंजरई यासी इतिफाक करोन घयावयाचे असेल तरी, येबाबे येतबरी शखरु पाठवून रदबदल करून माबैन लस्कर इतिफाक घेऊन, जे तरफेसी बरें दिसोन येईल व फाईब ज्यांनीं बेन असेल त्याचें सरंजाम रेखावें. निविस्ते गोवा तारीख फरंग ६ माहे दिजेंब्रु सन येक हजार सहासें सतसष्ठी म्हणोऊन विंजरई अजमी लिहीलें. सदरहु

---

( ९ ) शिवाजीच्या धाकावरून लखम सांवत व इतर देसाई यांस गोवेंकर सरकारनें सन १६६८ तील जूनमध्यें आपल्या प्रांतांतून घालवून दिलें ( प्रस्तुत लेखकाच्या Portugueses & Maratas, I ह्यामध्यें ह्यासंबंधाचे कागद छापले आहेत. )

लिहीलेप्रमाणें ईज्यानेबानीं कबूल केलें असे बतेरीख २५ माहे जमादिलाखर सुरसन समान सितैन अलफ.

मर्या
देयं विरा
जते

प्रस्तुत तहाच्या मागच्या बाजवर शिवाजीचा अष्टकोनी शिक्का असून त्यांत पुढील श्लोक वाचतां येतोः—

**प्रतिपच्चन्द्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।**
**शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥**

ह्या तहाची पोर्तुगीज नकल असून त्यावर गोवेकर मुख्याधिकाराची सही व शिक्का आहे. पण शिवाजीचा केवळ शिक्का आहे. ' निशान ' नाहीं.

( पणजी-गोवा ) पां पिसुलेंकर.

ह्या प्रसंगास अनुलक्षून 'सभासद'मध्यें पुढील उल्लेख आढळतो; "फिरंगी यास राजियाचा धाक, तेथें त्यास ठेवून घेववेना असें जालें. जागा कोठें नाहीं तेव्हां राजियांशीं राजकारण लावून पितांबर शेणवी, मत्स्याहारी ब्राह्मण, म्हणून कुडाळीं हेजीब पाठवून दिला. राजियाचा कौल घेऊन भेटीस आला." ( पृष्ठ. ६८ )

शिवाजीचें बाजीप्रभूस पत्र. [ पृ. ११९

तरवारीचे भाग व त्यांचीं नांवें.

वाघनखें. Tiger-Claws.

PHOTO PRINTED AT SHREE LAXMI-NARAYAN PRESS, BOMBAY NO. 2.

# शिवाजी महाराजांचें व्यापारी धोरण.

( श्रीपाद शंकर नवरे बी. ए. )

शिवाजी महाराजांची सगळी हयात धामधुमींत गेलेली. स्वराज्याच्या इमारतीचा पाया खणण्यापासून त्यांनीं परिश्रम केले. कित्येक अंतस्थ शत्रूंचा मोड करून अंगीकृत कार्याबद्दल स्वकीयांची सहानुभूति संपादन करणें व एकापेक्षां एक बलाढ्य अशा बाह्य शत्रूंशीं झगडून स्वसत्ता प्रस्थापित करणें यांतच त्यांची सगळी शक्ति खर्च झाली. यामुळें स्वराज्य स्थापनेव्यतिरिक्त समाज-नियमन, व्यापार, उद्योगधंदे, कलाकौशल्य, शेती या वरकड महत्त्वाच्या गोष्टींकडे त्यांना फारच थोडें लक्ष देतां आलें. " राज्यांतील प्रजा म्हणजे तोच राज्याचा जीवनोपाय, तीच प्रजा अनेक क्षुद्रोपद्रवांमुळें बहुत पीडा पावली. राजसत्तेव्यतिरिक्त दुसरीयाचे तिळांशहि स्वामित्व ज्यावर नसावें त्यावर राजशासनापेक्षां इतर शासन अधिकाधिक प्राप्त जाहलें " ( आज्ञापत्र ), असें पाहून ' राज्याचा बंदोबस्त केलिया अनायासें इतर प्रयोजनें सिद्धीस जातात ' असा त्यांनीं विचार केला व म्हणून प्रथम सर्व सुधारणेचें मूळ जें राजकीय स्वातंत्र्य तें प्रस्थापित करण्याचा उद्योग त्यांनीं आरंभला. व्यापार किंवा उद्योगधंदे सुरळीत चालण्याकरितां देशांत शांतता असावी लागते. दळणवळणाचे मार्ग चोरांचिलटांपासून सुरक्षित असावे लागतात. शेती व कलाकौशल्य यांचें आपलेपणानें संरक्षण व संवर्धन करण्याइतका बळकट राजदंड प्रस्थापित व्हावा लागतो. महाराजांनीं स्वराज्यस्थापनेला सुरुवात केली, त्यावेळीं ' उठे तोचि कूटी ' ' अशी बळाची दुनिया ' सर्वत्र कशी माजली होती, ' बेदादी नगरीं ' तील शेतें पिकतांच त्यांची कशी ' लुटालुटी ' होत असे, याचें श्रीसमर्थांनीं केलेलें हृदयद्रावक वर्णन प्रसिद्ध असून,

**कैंचा आधार आधार नाहीं सौदागर ।**
**कांहीं चालेना चालेना उदीम व्यापार ॥**

हे त्यांनीं काढलेले उद्गारहि त्यांच्या ग्रंथांत नमूद आहेत.

राजकीय सत्ता आपल्या हातांत येऊन थोडी स्थिरता येतांच आपल्या प्रांतांतील शेती, उद्योगधंदे, व्यापार या गोष्टींकडे लक्ष देण्याचा त्यांचा विचार होता, किंबहुना फुरसतीप्रमाणें त्या दिशेनें त्यांनीं थोडथोडी सुरुवातहि केलेली होती. इ० स०

१६७४ मध्यें रायगडावर होणाऱ्या राज्याभिषेक समारंभाला हजर रहाण्याकरितां मुंबईहून ईस्ट इंडिया कंपनीचे हेन्री ऑक्झेंडन प्रभृति तीन इंग्रज व्यापारी येत असतां वाटेंत पाचाड येथें नारायण पंडित नामक शिवाजीचा एक कामगार त्यांना भेटला. शिवाजी व इंग्रज यांमध्यें पुढें होणाऱ्या व्यापारी तहाविषयीं बोलणें निघालें असतां तो त्यांना म्हणाला, " आपल्या राज्यांतील व्यापार वाढविण्याची शिवाजी महाराजांचीहि फार इच्छा आहे. आजपर्यंत धामधुमींत काळ गेल्यानें या गोष्टीकडे लक्ष देण्यास त्यांना फुरसत मिळाली नाहीं; परंतु आतां राज्याभिषेक झाल्यावर राज्यव्यवस्थेचें काम ते हातीं घेणार आहेत. "

सतराव्या शतकांत हिंदुस्तानच्या पश्चिम किनाऱ्यावर मोठी व्यापारी घडामोड चाललेली होती. तीमध्यें एतद्देशीयांपेक्षां परकीयांचाच भरणा अधिक होता. समुद्रकांठीं असलेल्या लोकसंख्येपैकीं निम्म्याहून अधिक लोक मराठीहून इतर भाषा बोलणारे व परधर्मीय होते. अरब, पोर्तुगीज, डच, फ्रेंच, इंग्रज, अबिसिनियन, आर्मेनियन, पार्शी, बेने इस्रायल यांपैकीं प्रत्येकानें आपापल्या शक्तीप्रमाणें ठिकठिकाणीं हातपाय पसरून ठेवले होते. इ० स० १५१० मध्यें गोव्याला राजधानी केल्यापासून जवळजवळ शंभर वर्षें मलबारपासून आर्मझपर्यंत अरबी समुद्रांतील पोर्तुगिजांची सत्ता ' निर्वीरमुर्वीतलम् ' होती. पण पुढें दुसरे प्रतिस्पर्धी मिळाल्यामुळें सतराव्या शतकांत त्यांच्या सत्तेला ओहोटी लागत चाललेली होती. इंग्रजांनीं सुरत, दाभोळ, राजापूर, हुबळी, कारवार या ठिकाणीं वखारी स्थापन केलेल्या होत्या. जंजिऱ्याला शिद्दीचें राज्य असून समुद्रावर चांचेगिरीचा त्यानें मोठा धुमाकूळ मांडला होता. यांशिवाय जव्हारचे कोळी व सावंतवाडीचे सावंत या एतद्देशीय राजांचीहि आपापल्या मुलखांत चांगली हुकमत चालत होती.

कल्याणपासून राजापुरापर्यंतची कोंकणपट्टी ताब्यांत आल्यावर समुद्रकिनाऱ्यावर स्वतःचें वर्चस्व स्थापन करण्याची शिवाजी महाराजांस जरुरी भासूं लागली. त्यांचें भांडण मुख्यतः मुसलमानांशीं होतं, पण हें भांडण भांडत असतां इंग्रज, पोर्तुगीज, शिद्दी यांचीहि आपल्या शत्रूंना प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष मदत होत असते असें कळतांच त्यांनाहि जरबेंत ठेवणें महाराजांस भाग पडलें. हें काम सिद्धीस जाण्यास आरमाराची अत्यंत आवश्यकता होती. ' जसें ज्यास अश्वबल तसी त्याची वृद्धीप्रथा आहे, तद्वतच ज्याजवळ आरमार त्याचा समुद्र ' ही गोष्ट त्यांनीं पूर्णपणें ओळखली होती. थोड्याच अवधींत चांगलें आरमार तयार झालें. " जंजिरा पाण्यांत किल्ला, जेर न होय, असाध्य, तो आपणास यावा, समुद्रांत

सत्ता करावी, म्हणून बहुत चित्तांत हेतु धरून, आरमार करावें असा बेत करून, जहाजें नवीन तयार महाराजांनीं करविलीं......दहा पांच लक्ष रुपये खर्च केला......सावकारी महाल जहाजें लुटून, हरजिनसीं दर्यांतील पैदास्त करून महाराजांस आणून देऊं लागले. समुद्रांत सत्ता बसवली. दर्याकिनारीं जागां जागां शहरें मारूं लागले. " त्याचप्रमाणें " कित्येक पाणियांतील डोंगर बांधून दर्यामध्यें गड वसविले. पाणियांतील म्हणजे केवळ जंजिरे असें करून गड जहाजें मेळवून दर्यास पालाण राजियांनीं घातलें. जोंवर पाणियांतील गड असतील तोंवर आपलें नांव चालेल, असा विचार करून अगणित गड जंजिरे जमिनीवर व पाणियांत वसविले, " ( सभासद ). अशा रीतीनें लवकरच ' दर्यांत सर्व टोपीकरांवर जरब पाडली ' ( चिटणीस ).

राजकीय ढवळाढवळ न करतां आपली मर्यादा ओळखून पोर्तुगीज किंवा इंग्रज निवळ व्यापार करीत रहातील तर त्यांना शक्य तेवढ्या सवलती देण्याची शिवाजी महाराजांची तयारी होती. कारण "साहुकार ( त्यावेळच्या अर्थानें व्यापारी ) म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. साहुकाराच्या योगानें राज्य आबादान होतें. न मिळे त्या वस्तुजात राज्यांत येतात. तें राज्य श्रीमंत होतें. पडले संकट प्रसंगीं पाहिजे तें कर्जवाम मिळतें. तेणेंकरून आलें संकट परिहारिजेतें. साहुकाराचे संरक्षणामध्यें बहुत फायदा आहे", ( आज्ञापत्र ), ही गोष्ट त्यांना पक्की माहीत होती. प्रांताचा व्यापार वाढावा व सांपत्तिक स्थिति सुधारावी असें त्यांना मनापासून वाटत असे. केवळ स्वदेशांतीलच नव्हे तर " परमुलखीं जे जे साहुकार असतील त्यांची समाधानें करून आणावें. त्यांस अनुकूल न पडेच तर असतील तेथेंच त्यांचें समाधान रक्षून आपली माया लाऊन त्यांचे मुतालिक आणून त्यांस अनुकूल जागा दुकानें देऊन ठेवावें. तसेच दर्यावर्दी साहुकार यांसही बंदरोबंदरीं कौल पाठवून आमदरफ्ती करावी " ( कित्ता ).

इंग्रज, पोर्तुगीज, हे लोक व्यापार करण्यांत फार कुशल आहेत हें जाणून शिवाजी महाराजांनीं त्यांच्याशीं व्यापारी करारमदार केले. त्या करारांतील कांहीं कलमें पाहिलीं म्हणजे शिवाजी महाराजांच्या दूरदर्शीपणाचें व मुत्सद्देगिरीचें आश्चर्य वाटतें. इ० स० १६७४ मध्यें राज्याभिषेकाच्या प्रसंगीं शिवाजी व इंग्रज यांमध्यें वीस कलमी व्यापारी तह झाला. त्यांत शिवाजीनें इंग्रजांची राजापूर येथील वखार लुटल्याबद्दल त्यांना १०००० मोहोरा नुकसान भरपाई करून देण्याची योजना मुत्सद्देगिरीनें केलेली होती. ती अशी कीं इंग्रजांनीं शिवाजी-

पासून पुढील तीन वर्षांत दरसाल ५००० प्रमाणें १५००० मोहोरांच्या किंमतीचा माल खरेदी करावा. त्यांपैकीं इंग्रजांनीं फक्त ७५०० मोहोरा रोख देऊन बाकीची रकम राजापुरला वखारीची पुनः स्थापना करून आयात मालावरील जकातीच्या रकमेंतून कमी करावी. म्हणजे रकमेची फेड करण्याकरितां राजापुरास बंद केलेली वखार पुन: उघडणें इंग्रजांस भाग पडून शिवाजीकडील बराचसा मालहि विकत घ्यावा लागला ! याच तहामध्यें आणखी पुढील कलमें आहेत—राजापूर, दाभोळ, चौल व कल्याण येथें वखारी घालण्यास इंग्रज व्यापाऱ्यांना परवानगी मिळावी. शिवाजीच्या ताब्यांतील सर्व मुलुखांत इंग्रजांनीं व्यापार करावा, त्यांनीं मालाची खरेदी विक्री स्वतःस व्यापारी दृष्टीनें योग्य वाटेल त्या दरानें करावी. शिवाजीच्या मुलुखांत आणलेल्या मालावर शें. २॥ टक्के प्रमाणें इंग्रजांनीं जकात द्यावी. राजवाड्यांच्या ८ व्या खंडांत ले० २९ मध्यें आणखी दोन अटी दिलेल्या आहेत. त्या अशा कीं, इंग्रजांचे शिक्क्याचे रुपये किंवा मोहोरा शिवाजीच्या मुलुखांत चालणार नाहींत आणि समुद्रांत फुटलेल्या जहाजांतील माल किनाऱ्यास लागल्यास इंग्रजांस तो परत मिळणार नाहीं.

याप्रमाणें पोर्तुगिजांच्या बरोबर देखील निराळा तह झालेला होता. संशोधक पिंसुर्लेकर यांनीं इ. स. १६६७ मध्यें झालेला अशा तऱ्हेचा एक तह प्रसिद्ध केला आहे. त्यांत बालेघाटाहून गोव्याला व गोव्याहून बालेघाटाकडे जाणाऱ्या व्यापारी मालानें लादलेल्या बैलांना 'कैद व मना न करावे' 'सौदागिरी अमलाही फर्क पडो न दिता, हमिशा चाललें आहे तैसेची राहे, गुजरी करोन सोदागरी अदल बेकुसूर चालो द्यावा......आपण आपले सिरिस्तेप्रमाणें जकाती घेऊन चालऊन." असा शिवाजीनें बरोबरीच्या तत्त्वावर करार केल्याचें आढळतें.

वखार घालण्यापूर्वी सरकारचा परवाना काढावा लागत असे आणि परवान्याच्या वेळेच्या अटी पाळल्या जात नाहींत असें उघडकीस आल्यास त्याबद्दल दंड होत असे. कारवारच्या इंग्रजांनीं शिवाजी महाराजांस ११२० रु. दंड भरून आपली वखार बंद केल्याचा एके ठिकाणीं उल्लेख आहे. राज्यांत येणाऱ्या परराष्ट्रीय व्यापारी जहाजांना देखील 'आमदरफ्ती' साठीं सरकारी 'कौल' घ्यावा लागे. 'कौला' वांचून येणाऱ्या जहाजांवरील माल जप्त होत असे. या जप्तीच्या उत्पन्नास 'पैदास' असा शब्द होता.

आयात मालावर किंमतीप्रमाणें लहानशी जकात ठेवलेली होती. तिचे उद्देश दोन. जकातीनें राज्याचें उत्पन्न वाढतें व दुसरें ज्या राज्यांत जावयाचें तेथील राजाचें स्वामित्व मान्य केल्यासारखें होतें. आपल्याकडील जास्त माल दुसऱ्यांस विकावा व आपणांस वाटेल तो दुसऱ्यांचा माल ते देतील त्या किंमतीनें विकत

घ्यावा या सोईच्या तत्त्वावर सर्व व्यवहार चालत असल्यामुळें जकातीला ‘ सरंक्षक ’ स्वरूप देण्याची कल्पना त्यावेळीं नव्हती. परदेशी व्यापाऱ्यांच्या मार्गांत नसतील ते अडथळे उत्पन्न करण्याचें एकीकडेच राहो, उलट त्यांचा मार्ग शक्य तेवढा सुकर करण्याकडेच त्यावेळची एकंदर प्रवृत्ति होती. शत्रूच्या बाजूचे व्यापारी लोक असले तरी देखील त्यांना चांगल्या रीतीनें वागवावें असा दंडक होता. “गलिमाचे मुलुखांतील गलिमाचा मुलुख मारिल्यामुळें अथवा दर्यावर्दीमुळें साहुकार सांपडले तर अवसर पाहून त्यांशीं खंड करावा. खंडाचा वसूल घेणें तोहि त्यांस राखून घ्यावा. खंड फारीक झाल्यावर थोडीबहुत त्यांची मेहमानी करून बहुमानें त्यांस त्यांचे स्थळास पाठवून द्यावें. गलीमाकडील सेवक लोकांस जें शासन आहे तें साहुकार लोकांस उचित नाहीं, ” ( आज्ञापत्र ). त्याच प्रमाणें “ आरमारास तनखा मुलखांत नेमून द्यावा. पैदास्तीवरील नेमणुकीमुळें साहुकारांस उपद्रव होऊन साहुकारी बुडेल. बंदरें राहिलीं पाहिजेत. प्रायोजनिक वस्तु परस्थळींहून आणावी तेव्हां येत्ये. असें जाहलियामध्यें राज्याचा भ्रम काय उरला ? तसेंच जकाती आदिकरून हांशीलही बुडालें......साहुकारी वाढवावी. साहुकारीमुळें जकातीचेंच हांशिल होईल......कोळी साहुकारांचे वाटेस जाऊं नये. त्यांस कोणाचें उपद्रव लागत असेल तरी तो परिहार करावा, गनीमाचे मुलुखाखेरीज विदेशींचे गैरकौली असे साहुकारांचीं तरांडीं येतां जातां असलीं, तरी तीं परभारें जाऊं न द्यावीं. नयेभयें हाताखालीं घालून त्यांचे दसोडीस हात न लावतां, दिलासा करून बंदरास घेऊन यावीं. बहुत प्रकारें त्यांनीं व मुलुखगिरीचे कारभारी यांनीं जाऊन त्यांचें समाधान करावें. लांकडें पाणी घेतील तें घेऊं द्यावें. नारळांचीं शाळीं आदिकरून जो त्यांस पाहिजे जिन्नस असेल तो त्यांस विकत अनुकूल करून द्यावा. याविरहित आणखी खरेदी प्रोक्त आत्मसंतोषें करितील तो अल्पस्वल्प जकात घेऊन सुखरूप करूं द्यावा. थोर मनुष्य साहुकार कोणी असला तरी त्याचे योग्यतेनुरूप दिवाणचे तर्फेनें त्याची थोडीबहुत मेहमानी करावी. तो खर्च दिवाणांतून मजुरा घ्यावा. कोणी एका प्रकारें त्या परकी साहुकारास सौख्य दिसे, माया लागे, तें राज्य आमदरफ्ती करीत असें करावें ”, ( कित्ता ). शिवाजी महाराजांच्या तालमींत वाढलेल्या व पुढें तीन मराठी राजांच्या कारभाराचीं सूत्रें हलविलेल्या रामचंद्रपंत अमात्यांनीं लिहिलेल्या ‘ आज्ञापत्रां ’ तील वर दिलेल्या जरा लांबलचक उताऱ्यांत शिवकालीन मराठ्यांच्या व्यापारी धोरणाची स्पष्ट कल्पना येते.

शिवाजी महाराजांचें व्यापारी धोरण याप्रमाणें ‘ मुक्तद्वार ’ असलें तरी पोर्तुगिजांच्या उदाहरणावरून टोपीकर व्यापाऱ्यांचें अंतरंग त्यांच्या लक्षांत आलें होतें व म्हणून इतक्या सवलती देऊनहि त्यांच्या विषयीं विशेष

खबरदारी घेण्याबद्दल महाराज जपत असत असें रामचंद्रपंतांनीं दिलेल्या पुढील इशाऱ्यावरून स्पष्ट दिसतें. " साहुकारांमध्यें फिरंगी व इंग्रज व वलंदे व फरासीस व डिंगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करतात. परंतु ते वरकड साहुकारांसारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्यच करित आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्साते हे लोक या प्रांतीं साहुकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं असें काय घडों पाहतें ? तथापि टोपीकरांस, या प्रांतीं प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावीं, हा पूर्णाभिमान, तदनुरूप स्थळोस्थळीं कृतकार्यही झाले आहेत. त्यास ही हट्टी जात, हातास आलें स्थळ मेल्यानेंही सोडावयाचे नव्हते. यांची आमदरफ्ती आले गेले इतकीच असों द्यावी. त्यांस केवळ नेहमीं जागा देऊं नये कदाचित् वखारीस जागा देणें झाली तर खाडीचे मोबारीं समुद्रतीरीं न द्यावी. तसे ठिकाणीं जागा दिल्यानें जोंपर्यंत आपले मर्यादेनें आहेत तों आहेत, नाहीं ते समयीं आरमार, तोफा दारुगोळी हेंच त्यांचें बळ, आरमार पाठीशीं देऊन त्याचे बळें त्या बंदरीं नूतन किल्लाच निर्माण करणार. तेव्हां इतकें स्थळ राज्यांतून गेलें. याकरितां जागा देणेंच तर लांब खाडी, गांव दान गांवें राजापुरासारखीं असेल तेथें फरासीसांस जागा दिला होता, त्या न्यायें दोन चार नामांकित थोर शहरें असतील त्यांमध्यें जागा द्यावा. तो असा कीं, नीच जागा, शहराचे आवारीं, शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारी घालाव्या. त्यास इमारतीचें घर बांधों देऊं नये. याप्रकारें राहिले तर बरें, नाहीं तर यांविणें प्रयोजन नाहीं. आले गेले असून त्यांचे वाटेस आपण न जावें, आपले वाटेस त्यांणीं न जावें, इतकेंच पुरे " याहून अधिक टोपीकरांचा कावा कळण्याचें काय शिल्लक राहिलें होतें ? इतक्या लवकर मिळालेल्या या अनुभवजन्य ज्ञानाचा मराठ्यांनीं योग्य उपयोग करून घेतला असता तर न जाणों इतिहासाचा ओघ निराळ्याच दिशेनें वहात गेलेला दिसला असता. पण एकसूत्री धोरणाचा अभाव व घरांतील भाऊबंदकी हीं आड आल्यामुळें इतकें कळत असूनहि टोपीकरांचीं मुळें किनाऱ्यावर रुजूं न देण्याचे प्रयत्न पुढें झाले नाहींत. इतकेंच नव्हे तर पहिल्या तीन पेशव्यांनीं कांहीं खाजगी आकसानें आंग्र्यांचा मोड केला, त्या कामीं इंग्रजांची मदत घेतली व अशा रीतीनें शिवाजी महाराजांनीं अत्यंत दूरदर्शीपणानें पश्चिम किनाऱ्याचा केलेला बंदोबस्त नाहींसा करून आपल्याच हातानें परकीय व्यापाऱ्यांस हातपाय पसरावयाला ऐसपैस जागा करून दिली ! ! शिवाजी महाराजांनीं परकीय व्यापाऱ्यांस मुळीं येऊंच द्यावयाचें नव्हतें हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण आंतरराष्ट्रीय व्यापारी देवघेव मुळांत हानिकारक कधींच नसते. स्वतःच्या देशाचें नुकसान होणार नाहीं अशा

रीतीनें परस्थ व्यापाऱ्यांना आमदरफ्तींची परवानगी देण्यास कांहींच हरकत नाहीं. मात्र दिलेल्या सवलतींचा ते फाजील फायदा घेणार नाहींत याविषयीं डोळ्यांत तेल घालून जपलें पाहिजे.

जकातीचा दर अत्यल्प म्हणजे शें० दोन अडीच पासून तीन साडेतीन पर्यंत असे व पुष्कळ वेळां तोही माफ होत असे, हें वर इंग्रज व पोर्तुगीझ यांबरोबर झालेल्या तहांत दिसून आलेंच आहे. ठिकठिकाणीं अनेक राजसत्ता अस्तित्वांत असल्यामुळें ' तुम्ही आमच्या पासून कर घेणार नसाल तर आम्ही तुमच्या कडून कर घेणार नाहीं, असे परस्परांत दोस्तीचे तह होत असत. शेजारचा व्यापार आपल्याकडे ओढावयाचा असल्यास आपल्याकडे कमी जकात ठेवावयाची व शेजारीं कमी जकात असल्यानें आपल्या प्रांतांतील व्यापाराचा ओघ तिकडे जात असेल तर बाहेर प्रांताच्या मालावर जब्बर जकात बसवावयाची हा रास्त व्यवहार त्या काळीं चालूंच होता. राजवाड्यांच्या ८ व्या खंडामध्यें लेखांक २७ मध्यें, नरहरी आनंदराऊ सर सुभेदार ता० कुडाळ यांस मिठावरील जकातीसंबंधी या धोरणाप्रमाणें लिहिलेलें एक पत्र सांपडतें, तें येथें दिल्यास त्यावरून शिवाजी महारांजाची दक्षता व्यक्त होईल.—" साहेबीं प्रभावळी पासून तहद कल्याण भिवंडी पावेतों मिठाचा जबर निरखाचा तह दिल्हा आहे. ऐसीयासी, हालीं आपणांकडे मिठाचा पाड जबर जाला, हे गोष्टी ऐकोन उदमी खळक कूल बारदेशाकडे जातील तरी तुम्ही घाटीं जकाती जबर बैसवणें. बारदेशांत मीठ विकतें त्याचा हिशेबें, प्रभावळीकडे संगमेश्वराकडे मीठ विकतें त्याणें कितेक जबर पडतें ते मनास आणून त्या आजमासें जकाती जबर बैसवण कीं संगमेश्वरीं विकतें आणि घाट पावेतों जे बेरीज पडेल त्या हिशेबें बारदेशीच्या मिठास जकाती घेवणें. संगमेश्वराहून बारदेशीचें मीठ महाग पडे ऐसा जकातीचा तह देणें. जरी जबर जकातीचा तह नेदा, मुलाहिजा कराल म्हणजे कुल उदमी खळक बारदेशाकडे वोहडेल. आपली कुल बंदरें पडतील...ये गोष्टीचा एक जरा उजूर न करणें. ये गोष्टींत साहेबाचा बहुत फायदा आहे... तुम्हांकडे लहान मीठ आहे त्याचा तह आहे त्या खेरीज हाली जाजती दर मणें टंकसाळी रुके -।- बारा रासप्रमाणें तह देणें. मुलाहिजा न करणें. मिठाचा मामला हजराही बद्दल कर्द लाख रुपये यावयाचा मामला आहे......" स्वराज्यांतील मिठावरील करांपेक्षां गोव्याकडील बारदेशाहून येणारें मीठ जितकें स्वस्त असेल त्या तफावतीइतकी जादा जकात लादावी इतकेंच नव्हे तर तें मीठ अधिक महाग पडेल अशी तजवीज करण्याची सक्त ताकीद केलेली यांत सांपडत असल्यामुळें हें पत्र अत्यंत महत्त्वाचें आहे.

ठिकठिकाणच्या लोकांस व्यापाराचे मक्ते देण्याची वहिवाट होती हें त्याच खंडांतील २६ व्या लेखावरून दिसून येतें. तुकाराम सुभेदारास उद्देशून खालील मजकूर लिहिलेला आहे—" मामले दाभोळ विलायतीस नारेळ दर सद्दे लारी ४ व रोठा देखील जकात दर खंडीस लारी १२५ सवाशें प्रमाणें विकत आहे. आणि नेवरें व बाजे तुम्हांकडील माहालीं ऐन जिन्नस बटाई दिवाणांत उसूल देताती. व रयत वांसा खरीदी करितात. ऐसें असतां कमनिर्खे नारेळ सुपारी विकते, ऐसी खबर कळो आली. तरी हा अंमल कैसा आहे ?...... कमनिर्खे विकिलिया इकडे धक्का बसतो आणि अलग नुकसान येऊं पहातें. " यांत ठरलेल्या करा प्रमाणें नारळ व सुपारी विकण्याचा सक्त हुकूम आहे. किफायती प्रमाणें ' अमुक बंदरीं ज़ावून तुम्ही व्यापार करावा' अशा सरकारकडून मधून मधून सूचना मिळत असत. " आज्ञा केली होती जे दाभोळ बंदरास तुम्ही येऊन सौदागरी करून सर्फराज होणें " इ० असें तापीदास तवाहीदास हा व्यापारी महाराजांस लिहीत आहे. ( खंड ८, ले० ८ )

हल्लीं प्राप्तीवरील कर आहे त्याप्रमाणें व्यापारी व कारागीर लोकांच्या नफ्यावर कर लादण्याची पद्धति पूर्वापार आहे. हा कर लादतांना कमींत कमी जीवनाला लागणारी रकम लक्षांत घ्यावी व तिच्यापेक्षां अधिक रकमेवरच कर आकारला जावा ही हल्लीं घेण्यांत येणारी खबरदारी पूर्वीं घेण्यांत येत असे. या बाबतींत मल्हार रामराव चिटणीस यांनीं आपल्या ' राजनीतीं'त केलेल्या सूचना अत्यंत महत्त्वाच्या आहेत. त्या शिवाजीच्या काळींही अमलांत असल्या पाहिजेत. यांत संशय नाहीं. चिटणीस लिहितात,—" वणिक्मार्ग जे करीत असतील त्याजपासून करभार घेणें तो कसा घ्यावा ? तरी विक्रय कसा झाला, किती विकत काय काय आणिलें, किती दुरून आणिलें, त्यास व्यय जावून त्याजवरि त्यास उत्पन्न काय झालें, त्याचे योगक्षेमास काय पाहिजे, याचा विचार करून तदनुरूप करभार त्यांजपासून घ्यावा. याजप्रमाणें आयव्यय पाहून शिल्पकारादिक म्हणजे कारागार लोक यांपासून " [ घ्यावा. ]

जकात वसुलीकरितां बंदरोबंदरीं अंमलदार नेमलेले असत आणि त्यांच्या परवानगीवांचून कोणाला किनाऱ्यानें प्रवास करतां येत नसे, कल्याणला अशा तऱ्हेचा एक कस्टम्सचा अमलदार होता असें त्यावेळचा प्रवासी फ्रायर हा लिहितो. जुन्या कागदपत्रांतून ' थळ जकाती ' म्हणून शब्द आढळतो त्याचा अर्थ आपल्या प्रांतांतून जाणाऱ्या मालावर लादलेली जकात असा आहे. यांशिवाय निरनिराळ्या धंदेकऱ्यांवर लादलेले मोहतर्फा ऊर्फ दुकान पट्टी, तेलपट्टी, तूपपट्टी, पायपोसी इ०

कर होते, पण त्यांचें स्वरूप हल्लींच्या स्थानिक करांप्रमाणें असून तो तो धंदा करणाऱ्यावर तो तो कर बसत असे. अर्थात् प्रत्येकावर सर्वांचा भार नसे.

व्यापाराची भरभराट ही केव्हांहि शेतीच्या भरभराटीवर अवलंबून असणार. शेतीला शक्य तेवढें उत्तेजन देण्याकडे शिवाजी महाराजांचें फार लक्ष होतें. बाहेरच्या लोकांनीं आपल्या प्रांतांत येऊन शेती करावी, पडित जमीन लागवडीला यावी म्हणून त्यांनीं अनेक सवलती ठेवलेल्या होत्या. चरित्रकार सभासद लिहितो— " नवी रयत येईल त्यास गुरें ढोरें द्यावीं. बीजास दाणा पैका द्यावा. भक्षावयासि दाणे पैका द्यावा तो ऐवज दोहों चोहों वर्षांनीं आयुर्दाव पाहून उगवून घ्यावा. "

याप्रमाणें उपलब्ध पुराव्यावरून शिवाजी महाराजांचें व्यापाराविषयक धोरण सांगितलें. त्यांच्या राज्यव्यवस्थेंत पुष्कळ ठिकाणीं ज्याप्रमाणें परंपरागत हिंदु कल्पनांचा अवलंब केलेला आढळतो त्याचप्रमाणें व्यापाराच्या बाबतींत किंवा एकंदर आर्थिक व्यवहारांत देखील प्राचीन कालापासून चालत आलेल्या जुन्या कल्पनांची छाप दिसून येते. कौटिल्यकृत ' अर्थ शास्त्र ' हा ग्रंथसुद्धां त्यावेळीं उपलब्ध असावा. कारण नंतर चिटणिसांनीं लिहिलेल्या राजनीतींत एकंदर विद्यांचा विचार करीत असतां " तिसरी वार्ता म्हणजे अर्थानर्थविचारयुक्त त्यास वार्ता असें बोलतात. याचें फल पशुपालन, कृषिकर्म, वणिक् व्यवहार म्हणजे सावकारी करीत असतां जीविकेची चिंता कदापि घडत नाहीं. "; असें केलेलें हें विवेचन ' कृषिपाशुपाल्ये वाणिज्या च वार्ता ' इ० कौटिल्याच्या विवेचनाचाच अनुवाद केलेला स्पष्ट दिसतो. हल्लीं हिंदुस्तानांत ' व्यापार आणि उद्योगधंदे ' यांचें स्वतंत्र खातें असून त्यावर निराळा मंत्री आहे. शिवाजी महाराजांच्या वेळीं सदरहू खातें निराळें काढण्याइतका व्याप न वाढल्यामुळें अष्टप्रधानांपैकीं पेशवा व अमात्य यांमध्यें तें कार्य वाटलें गेलें होतें असें दिसतें.

देशाच्या व्यापाराची वाढ करण्या ऐवजीं सुरत, दाभोळ, राजापूर, हुबळी, कारवार येथील वखारी लुटून आहे तोच व्यापार बंद पाडण्याची महाराजांनीं खटपट केली, असा त्यांवर आक्षेप घेण्यांत येतो. पण वरील विधायक धोरण लक्षांत घेतां हा आक्षेप कसा फोल आहे, हें लक्षांत येईल. मुसलमानांबरोबर त्यांनीं युद्धच पुकारलें असल्यामुळें हर प्रयत्न करून गनिमांचे किंवा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें त्यांना साहाय्य करणाऱ्यांचें सामर्थ्य शक्य त्या प्रकारांनीं कमी करणें व स्वतःचीं युद्धाचीं साधनें वाढवणें हें त्यांचें कर्तव्यच होतें. या नीतीचा हल्लींच्या ' सुधारलेल्या ' जगांतहि अवलंब केलेला दिसत असल्यामुळें शिवाजी महाराजांना नांवें ठेवतां येणार नाहींत.

---

# कांहीं ऐतिहासिक हत्यारें

( लेखकः—राजरत्न प्रोफेसर माणिकराव, बडोदें. )

श्री शिवछत्रपतींचा त्रिशत-सांवत्सरिक जन्म-महोत्सव यंदा ता. ३ मे १९२७ मंगळवार रोजीं सर्वत्र थाटानें उजवावयाचा ठरल्यानें तन्निमित्त श्री शिवरायांचे उज्वल स्मरणानें पावन व्हावें एतदर्थ स्वराष्ट्र व स्वधर्म रक्षणार्थ उपयोगांत आणल्या गेलेल्या व इतरहि ऐतिहासिक दृष्ट्या थोड्याशा महत्त्वाच्या अशा कांहीं हत्यारां-संबंधीं माहिती वाचकांपुढें मननार्थ मांडावी व आपल्या सेवेची अशी अल्पशी पाकळी त्या पूज्य लोकाग्रणीच्या पवित्र चरणीं अर्पण करावी एवढ्याच हेतुमिश्रणाच्या प्रस्ता-वनेचीं लेखास पुष्टि देऊन मुख्य विषयाकडे वळूं या.

हत्यारें घडविण्याच्या कौशल्याबद्दल पौर्वात्य राष्ट्रें फार प्राचीन काळापासून महशूर आहेत. विशेषतः पर्शिया व हिंदुस्थान हे दोन देश तर आशियाखंडांत या बाबतींत प्रामुख्यानें पुढें आलेले आढळून येतात. परंतु जेव्हां वेदांमध्यें * हत्या-रांच्या निरनिराळया तऱ्हा, लोखंड व पोलाद यांच्या निरनिराळया जाती, पात्यांची घडवणूक, पाणी देण्याच्या नवविध पद्धति, मुठी संबंधीं बारिक गोष्टी, प्रत्येक हत्या-राचे निरनिराळे हात, व त्या प्रत्येकाची लांबी रुंदी व त्या तितक्याच ठेवण्याचीं कारणें वगैरे सांगोपांग हकीकत सांपडते, त्यावरून मात्र आपल्या इकडीलच हत्या-रांचे बाबतींत झालेली प्रगति इतर कोणत्याहि राष्ट्राचे प्राचीन प्रगतीस मागें टाकील असेंच म्हणणें भाग पडतें. तरी पण येथें येवढें नमूद करणें अवश्य आहे कीं, पाश्चिमात्य राष्ट्रांची देखील या बाबतींतील प्रगति चांगल्या योग्यतेची असून ती आपणांइतकी जुनी नसली, तरी तिचा काळ इ. स. पू. कांहीं वर्षें पर्यंत जाऊं शकतो हें खास. परंतु आपणांस कांहीं इतक्या प्राचीन काळांत शिरावयाचें नाहीं—— नव्हे, त्या मानानें जवळ जवळ अगदींच अलीकडच्या काळांतील हत्यारांसंबंधीं आज दोन शब्द लिहावयाचे आहेत. पुढें मागें लौकरच हत्यारांसंबंधी विस्तृत माहिती स्वतंत्र पुस्तकरूपानें द्यावयांचा आमचा विचार आहे त्या वेळीं सर्व गोष्टींची बारिक-सारीक हकीकत ग्रथित केली जाईल. आज या पंचकपिलाषष्ठीसमान महा-

---

* भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-त्रैमासिक, वर्ष ५, अंक, १।२।३।४ मधील पान ११९ वरील श्री. रा. रा. कृ. वि. वझे यांचा लेख पहावा.

मंगल दिवशीं हे नवविध हत्यारांनीं भरलेलें अगदीं लहानसें ताट श्री शिवरायांचे हातीं भक्तिपूर्वक लावावयाचें व तेंच वाचकांपुढें करून त्यांची तत्संबंधीं जिज्ञासा त्याचे अल्पत्वाचें योगेंच वाढवावयाची येवढाच या निबंधाचा हेतु आहे.

विषय–प्रवेशारंभीं सोबत जोडलेल्या मुठीच्या व पात्याच्या चित्रावरून आपल्या लोकांनीं तलवारी संबंधीं किती सूक्ष्म रीतीनें अभ्यास केला होता हें दिसून येईल. चित्रांत प्रत्येक भाग निरनिराळा दाखवून तेथेंच प्रत्येकाचें नांव स्पष्टपणें कळेल अशा रीतीनें दिलें आहे.

सैफ नांवाची एक तलवार आहे. दिल्लीश्वराचे कडक कैदेंतून ज्या वेळीं पेढ्यांच्या पेटाऱ्यांचा उपयोग करून श्री शिवबांनीं स्वदेशगमनाचा मार्ग स्वीकारिला, त्या वेळीं रस्त्यावर लागणाऱ्या अमझारा संस्थानांत त्यांनीं कांहींसा मुक्काम केला होता. तेथून त्यांनीं ही तलवार स्वप्रांतीं आणली असावी. या अमझारा संस्थानांत या जातीच्याच तलवारी साधारणतः वापरीत असत. हिच्या मुठीचे, मोगरा, फुल, कंगनी, कटोरी, पुतळा, परज, नखा, असे भाग आहेत. हिचें पातें पोलादी असून तें तीन फूट साडेसहा इंच लांब व सव्वा इंच रुंद आहे. तें अगदीं सरळ असून त्यावर दोन नळ ( रेघा ) आहेत. त्यांची लांबी प्रत्येकीं दोन फूट पांच इंच आहे. श्री शिवप्रभूंचे काळानंतर या तलवारी बऱ्याच प्रचारांत आल्या. सुप्रसिद्ध भवानी तलवारीशीं हिचें फारच साम्य दिसून येतें. मुठीला मोगरा चांगला लांब असल्यानें फिरून चक्कर खाऊन मनुष्याच्या बरगड्या सहज मोडतां येतात. या तलवारीनिशीं एक मनुष्य दोघांशीं सहजीं झुंजूं शकतो. या चक्राचे माऱ्यास गांजा म्हणतात. हल्लींचे तरुण शेंकडा पंचाण्णव काडी पहेलवान असल्यानें त्यांना ही पेलवणें देखील कठीणच, मग फिरविण्याची गोष्ट कशाला !

अलेमानी तुर्की तलवारीचें पातें पोलादी असून तें दोन फूट पांच इंच लांब व दीड इंच रुंद आहे. पात्यावर थेटपर्यंत लांबीचा नळ आहे. पात्याला एका बाजूस पूर्ण व दुसऱ्या बाजूस शेवटाला धार आहे. पातें दिल्लीशाही मुठींत बसविलें आहे. पात्याचें पोलाद उत्कृष्ट दरजाचें असल्यानें पातें अत्यंत लवचिक म्हणजे सापाप्रमाणें सळसळणारें व हलकें आहे. हिच्यावर जव्हेरदार अभ्र आहे. अभ्रावरून थेटपर्यंत नकशी कोरलेली आहे. ही अत्यंत किंमतीची तलवार आहे. हिची बनावट तुर्कस्थानी असून हिच्याबद्दल अशी आख्यायिका सांगतात कीं, हिच्यावर जरी वाटेल तेवढ्या दुसऱ्या तलवारी ठेवल्या तरी हिच्याबद्दल असलेला मंत्र ( आयत ) उच्चारला कीं चटकन ती त्या ढिगांतून वर पृष्ठभागावर येते.

खांडा म्हणून एक हत्यार आहे. हें हत्यार पराक्रमसिंह पृथ्वीराज चव्हाण यांचे खंडेराय नांवाचे कोणी नातेवाइक होते त्यांनीं पृथ्वीराजांचेच कारकीर्दीत तयार केलें. या कारागिराचें मूळ नांव वास्तविक गोविंदराय असें होतें. या हत्याराचा शहाबुद्दीन घोरीशीं झालेल्या पानिपतच्या घनघोर संग्रामांत बराच उपयोग झाला. हा खांडा जव्हेरदारा पोलादाचा आहे. याच्या मुठीचे मागरा, कंगनी, कटोरी, परज, जनेऊ, पुतळा व नखा असे भाग आहेत. मूठ हाताला लागूं नये म्हणून तिच्यांत एक मखमालीची मऊशी गादी बसविली आहे. याचें पातें तीक्ष्ण असून तें दोन फूट पांच इंच लांब, मुळांत दोन इंच व शेवटीं अडीच इंच रुंद असें आहे. पात्याच्या एका बाजूस नऊ इंच व दुसऱ्या बाजूस एक फूट साडे आठ इंच लांब, असा नकशीदार चिमटा असून त्यावर मूठ बसविली आहे. हें हत्यार मस्त हत्तीची मान कापूं शकतें इतकें तिखट पात्याचें आहे. रजपुतांत एकापेक्षां अधिक स्त्रिया करण्याचा प्रघात असे. रजपूत वीर हे नेहमीं मुलुखगिरीवर अगर स्वदेश रक्षणार्थ किल्ल्यावर अडकलेले असावयाचे. अशा वेळीं वधू जर दूर ठिकाणीं असली व वरराजास स्वतःस लग्नास जावयाची सवड नसली !—नसली कशाला ? बहुधा नसावयाचीच—तेव्हां अशा वेळीं वरराजा आपल्या ऐवजीं आपला जीवलग खांडा पाठवित असे व ती विवाहोत्सुक वीर—बाला त्या खांड्यास प्रेममाला अर्पण करून आपल्या दूरस्थ पतिराजाची हृदयस्थ स्वामिनी व्हावयाची ! खरोखरच किती ही स्वराष्ट्र-प्रेमपरिपूर्ण विवाहाची सुंदर आणि मंगल कल्पना ! असे राष्ट्रभक्त तरुण व राष्ट्रप्रेमी बालिका होत्या म्हणून त्या कडव्या जीवांनीं मोगलांसारख्या बलाढ्य शत्रूस देखील कैक वर्षें झुलविलें ! गतदिन पुन्हा येतील का ?—असो, अशा या विवाहबद्ध राज्ञीस खांडा राणी म्हणत.

जमधर ( जम=यम+धर=धाढ=दाढ=यमदाढ ) हत्याराला एक फुट लांब व पावणेदोन इंच रुंद अशीं दोन पोलादी पातीं आहेत. दोन्हीही पात्यांना दोन्हीहि बाजूंनीं धार आहे. या पात्यांमध्यें एक चतुर्थांश इंचाचें अंतर आहे. याची मूठ पांच इंचाची आहे. या मुठींत बोटें घालून भार द्यावयाचा असतो. याच्या भाराबरोबर पोटांतील आंतडीं सट्कन् बाहेर येतात. इतिहास संशोधकांचे मतें अफझुलखानाचे वधाचे वेळीं श्री शिवरायांजवळ जी तलवार होती, ती **जामधाड** नांवाची असून बरीच मोठी होती. परंतु श्री शिवरायांनीं अफझुल-खानाचा डूब घेऊन वार रोखल्याचें जें वर्णन आहे त्यावरून आम्हांस तरी असें वाटतें कीं, हें हत्यार मोठी जामधाड नसून लहान जमधरच असावें व वाघनखां

ऐवजीं अफझुलखानावर याचाच प्रयोग झाला असावा. वार व सरक या बिन्नोट मधील दोन अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी असून, त्या श्री शिवबा पूर्ण जाणत होते, असें त्या युद्धप्रसंगाचे रेखाटलेल्या शब्दचित्रावरून दिसतें. तज्ज्ञांनीं या गोष्टीकडे अधिक लक्ष दिल्यास तिचा अधिक निश्चयात्मक निकाल लागण्याचा संभव आहे. हें भयंकर हत्यार राजे जयसिंग यांनीं तयार केलें.

श्री शिवबांनीं अफझुलखानापासून आत्मरक्षणार्थ वाघनखांचा उपयोग केला असें सार्वत्रिक मत आहे, वाघनख म्हणजे पोलादी पट्टींत पाव इंच अंतरानें बसविलेलीं चार तीक्ष्ण नखें. प्रत्येक नख सव्वा इंच लांबीचें असून त्यास तिन्ही बाजूंनीं शिरा व खालच्या बाजूला धार असते. नखें ज्या पट्टींत बसविलीं आहेत, त्या पट्टीच्या दोन्ही बाजूस आंगठ्या आहेत. हें हत्यार हातांत धरून मुठींत सहज लपवितां येतें. आम्हांस हें हत्यार म्हैसूरचे सुप्रसिद्ध वाघ टिपू सुलतान यांचे घराण्यांत नोकरीस असलेल्या सुबाप्पा नांवाच्या पहिलवानाच्या वंशांतील एका म्हाताऱ्या बाईकडून मिळालें, त्याचें ऐतिहासिक महत्त्व जाणूनच त्यास आम्ही दीडशें रुपये किंमत दिली.

सांग हत्याराची लांबी सहा फूट चार इंच आहे. हें हत्यार पोलादी असून याला कोठेंच सांधा नाहीं. याचे शेवटाला असलेलें पातें नऊ इंच असून तें आरंभीं दीड इंच रुंद आहे. टोकांशीं तें निमूळतें होत गेलेलें आहे. याचा दांडा पांच फूट सात इंच आहे. दांड्याचा व्यास दोन इंचाचा आहे. हें हत्यार आम्हांस फलटणचे श्री. जगदेवराव निंबाळकर यांचेकडून मिळालें. त्यांचे सांगण्याप्रमाणें तें बरेंच जुनें आहे. श्री शिवाजी महाराजांचे वेळीं या हत्यारांचा उपयोग होत असे. खुद्द महाराजांची हें हत्यार वापरणारांची एक पायदळ तुकडी असावीसें वाटतें. याचा मार पायाचे घोट्याजवळील नसींत असे; हा मार बसला म्हणजे मनुष्यास उठतां येणें अशक्य. पूर्वीं हा मार व इतर तलवारीचे हात—गर्दन काट, कमर काट, आणि शीर, वगैरे प्रथम शिकवावयाचे म्हणजे, काळ्या मातीचा कापूस—मिश्रित पुतळा करीत व त्यावर हे सर्व हात व मार चालवावयास लावीत. नंतर हाच प्रयोग ओल्या झाडांवर करवीत. त्यानंतरची पायरी म्हणजे दगड व अगदीं शेवटची म्हणजे अर्थात युद्ध—प्रसंगीं शत्रु, असें पायरी पायरीनें शिक्षण देण्यांत येत असे. श्री शिवप्रभूंचे पदरीं सांग चालविणारे निष्णात लोक बरेच होते.

भाला म्हणजे एक लांबलचक मजबूत मोठी काठी व तिला पुढें तीक्ष्ण पातें लावलेलें. भाल्याचा दांडा पक्क्या रामपुरी बांसाचा असतो. हा भक्कम बांस पांच फूट पांच इंच लांब असून याचा परिघ चार इंचाचा आहे. बांसाच्या

निमुळत्या टोकांस भाल्याचें पातें तीन इंच खोल घातलेलें आहे. याची बाहेर असलेली लांबी दोन फूट एक इंच असून हें दुधारी आहे. बांसांत तें चांगल्या रीतीनें बसावें म्हणून कंगणीदार खोळी बांसाच्यावर तें आंत घातल्या ठिकाणीं बसविली आहे हा भाला फार जड आहे. घोड्यावरून वापरावयाचें हें शस्त्र आहे. श्री शिवाजी महाराजांचे फौजेंत याचें बरेंच प्राधान्य असे. याची त्या काळीं नेहमीं पूजा होत असे. हल्लीं तो फक्त पूजेचेच उपयोगीं झाला आहे !

बाने दोन प्रकारचे असतात. एक लांकडी,—शिक्षणाकरतां व एक पोलादी—युद्ध-प्रसंगीं उपयोगांत आणण्याकरतां. लांकडी बाना याची कांठी उत्तमपैकीं लांकडाची असून तिला सुंदर तकाकी केलेली आहे. हिची लांबी पांच फूट दोन इंच आहे. हिला चार गट्टू (गोळे) बसविले आहेत. निमुळत्या टोकाला अर्धा इंच अंतर सोडून नऊ इंच परिघाचा पहिला, त्यावर पांच इंच अंतर सोडून तेवढाच दुसरा, ( ही पांच इंचांची जागाच फिरवावयाचे वेळीं बाना हातांत धरावयाचें ठिकाण ) त्यावर एक फ़ुट दोन इंच अंतर सोडून साडे दहा इंच परिघाचा तिसरा, व कांठीच्या दुसऱ्या टोंकाला अर्धा इंच जागा सोडून अकरा इंच परिघाचा चौथा; या शेवटल्या गोळ्याला युद्ध प्रसंगीं लहान लहान पोलादी पातीं बसवितात. याचा उपयोग विशेषत: मान उडविण्याकडे होतो. बान्याचे दोन हात अत्यंत महत्त्वाचे आहेत; चक्र बेल व आणी काट. बनारसच्या पूर्वींच्या राजांच्या फौजेंत मुख्यत: याच हत्याराचीं पथकें असत. उत्तर हिंदुस्थानांतील पूरबचे पुरभैये हें हत्यार साधारणत: नेहमीं जवळ ठेवतात. संवईसाठीं याचा प्रथम प्रयोग जाई जुईचीं फुलें व नारळ यांवर होतो. पोलादी बाना याचा दांडा पक्क्या रामपुरी बांसाचा असून त्याचा जाड्या टोंकाचा परिघ पांच इंचाचा आहे. हा एक फूट नऊ इंच लांब आहे. याच्यांत बसविलेलें पातें हत्तीपगी पोलादाचें असून त्यांत दोनही बाजूस धार आहे. याची रुंदी सव्वा इंच आहे. या पात्याचा खिळा दांड्यांत बसविला आहे व त्यावर दृढता आणण्यासाठीं चिमटा बसविला आहे. याचे हात व उपयोग वरील प्रमाणेंच.

गदारा या हत्याराच्या पात्याचें पोलाद फरासी असून तें दोन फूट सहा इंच लांब आहे. मुठी जवळील याची रुंदी पावणेदोन इंच, मध्यभागीं तीच दीड इंच व शेवटीं ती निमुळती होत जाऊन टोक झाली आहे. पात्याची धार अतिशय तीक्ष्ण आहे. पात्याच्या पाठीला देखील शेवटीं थोडी धार आहे. पात्यावर दोन एक फूट दहा इंच लांबचे व एक, एक फूट सहा इंच लांबीचा असे तीन

नळ आहेत. या पात्यावरील मोहोर गुरुमुखी आहे. पातें दिल्लीशाही मुठींत बसविलें आहे. हें हत्यार किंचित् वांकडें व जड आहे. या हत्यारानें गेंड्या सारखे अवजड जनावर देखील कापलें जातें. हें शीख लोकांचें हत्यार आहे.

साधी कत्ती अथवा फरासी कत्तीचें पातें फरासी पोलादाचें असल्यानेंच हिला फरासीकत्ती असें सुद्धां म्हणतात. हें पातें दोन फूट तीन इंच लांब व एक इंच रुंद आहे. पात्याला एकाच बाजूनें धार आहे. पात्यावर एक एक फूट एक इंच लांब व दुसरा एक फूट लांब असे दोन नळ आहेत. हिचें पातें दिल्लीशाही मुठींत बसविलें आहे. ही अगदीं सरळ असते. हिच्या अनेक जाती असतात. तैमुरलंगाचें हें अत्यंत आवडतें हत्यार. त्यानें कत्ती वापरणारी दोन हजारांची सेना तयार केली होती. त्याची प्रतिज्ञा अशी कीं, कत्तीच्याच जोरावर काफरांचा अर्थात् मूर्तिपूजकांचा संहार करावयाचा. प्रतिज्ञा खरी करावयाची म्हणूनच कीं काय त्यानें शेवटीं बऱ्याच हिंदूंची याच कत्तीनें कत्तल केली व नंतर तिची पीरोजशाही मशीदींत फुलाहारांनीं पूजा करून तो दिवस त्यानें सणासारखा पाळला. कत्तीसह लढाईवर तो निघाला म्हणजे सर्व सैन्यास तीन वेळ, “ या अली ! या अली ! या अली !” असा घोष करावयास लावी व त्यांना धीर देण्यासाठीं आणि त्यांचा उत्साह वाढविण्यासाठीं त्यांना सांगे कीं, “ मर्दानो, जिंकलांत तर तुम्ही वीर म्हणून तुमची सर्वत्र कीर्ति होऊन तुम्ही आल्याचें नांव घेतांच चोंहिकडे शत्रू चळचळ कांपतील व जर तुम्ही मेलांत तर तुम्हांला समरांगणांत काफरांचे नाशार्थ लढत असतां मृत्यु आला त्या-मुळें तुमचे बांधव तुमच्या मरणाचा हेवा करतील व आपणांस देखील असाच मृत्यु दे, म्हणून अल्लापाशीं सदैव मागणें मागतील.”

सिरोही पबाशाही तलवारीचें पातें जव्हेरदार पोलादाचें असून त्याची लांबी दोन फूट सात इंच व रुंदी दीड इंच आहे. पातें निमुळतें होत जाऊन शेवटाला टोक बनलें आहे. या तलवारीचें पातें रामपुरजवळील एका खेड्यांत तयार होत होतें; परंतु रामपुरच्या नबाब साहेबांनीं तलवार तेथें न घडविण्या-विषयीं हुकूम सोडल्यानें पोलादच तेथें जेम तेम तयार झालें. पुढें ही तलवार सर-दार पबाराव यांचे देखरेखी खालीं कारागीर खंगरसिंगानें जोधपुरनजीक सिरोही शहरीं तयार केली. हिच्यावरील पात्याचा नळ मधूनच आहे. पिपळ्या पासून ही दुधारी झाली आहे. हिची अजमावणी मोठ्या कठीण रीतीनें केली. केळीच्या खांबांत सहा इंच व्यासाचा लोखंडी खांब घालून त्यावर कलमतरासचा हात मारला. लोखंडी खांब केळीच्या खांबाप्रमाणेंच सहज कापला गेला ! झाली परीक्षा !

बडोदेशाही सकेला याचें पातें पोलादी आहे. तें पातळ असून त्यावर नळ नाहीं. याला थोडा पिंवळा एक धारी वांक आहे. याची मूठ दिल्लीशाही परजेची आहे. ही तलवार जुने सयाजीराव यांनीं खुद्द बडोद्यास तयार करविली. हिची बनावट शिकलगिर मूळजीच्या हातची आहे. हिच्यांतील विशेष असा कीं, मुळजीला जितकें पोलाद दिलें होतें तितकेंच वजन त्यानें या तलवारींत उतरविलें. हिच्यावरील पाणी देखील येथील खाऱ्या बावडीचें. महाराजांनीं खूष होऊन मुळजीस मोठें बक्षिस दिलें होतें. हिची त्या काळची किंमत सातशें रुपये आहे. मुळजीचे वंशज अजून आहेत.

हुसेनी कत्ती हिचें पातें रामपुरी पोलादाचें असून तें दोन फूट लांब व दीड इंच रुंद आहे. हिला धार एकाच बाजूनें आहे. हिचे पातें दिल्लीशाही मुठींत बसविलें आहे. ही सैयद घराण्यांतील लोकांची खुद्द रामपुरांतच तयार झाली. ही मीर जुम्ला नबाब यांना दरबारांत नजर करण्यांत आली होती.

निमच्या म्हणजे अर्धी तलवार. रजपुतांनीं आपल्या बालकांसाठीं ही उत्तर हिंदुस्थानांतील पीहानी शहरीं हत्यारांचा जो मोठा कारखाना होता त्यांत तयार करविली. ही पूर्णपणें कृपाणा सारखीच असल्यामुळें हिला हल्लीं कृपाणच म्हणूं लागले आहेत. ब्राम्हणास जसें जानवें तसें शीख लोकांना कृपाण हें हत्यार. हें चोवीस तास त्यांचे जवळ असावयाचें. शीख म्हटला म्हणजे त्याचें जवळ हें कृपाण व चक्र नांवाचें दुसरें हत्यार हीं असावयाचींच. ते लोक याची रोज पूजा करतात. गुरु गोविंदाच्या लंघरांत हीं हत्यारें सदैव अडकविलेलीं असतात. याचें पातें पोलादी असून त्यावर जेहरी (विषारी) पाणी दिलेलें आहे. याची लांबी एक फूट अकरा इंच व रुंदी एक इंच आहे. याचें पाणी इतकें भयंकर आहे कीं, या हत्यारानें वार केल्यावर अर्ध्या तासानें मांस व चामडें फाटतें व ती जखम कशानेंहि भरून निघत नाहीं.

शिरोही मानाशाही तलवारीचें पातें जव्हेरदार पोलादाचें आहे. तें दोन फूट सात इंच लांब व दीड इंच रुंद असून त्यास एकाच बाजूनें धार आहे, या पात्यांत उतरत्या माळा आहेत. पातें शिरोही मुठींत बसविलें आहे. ही तलवार शिरोही शहरांत तयार करविली असून रजपूत लोक बहुधा वापरतात.

अरबी सुऱ्यास जव्हेरहार पोलादाचें पातें आहे. तें दोन फूट दोन इंच लांब, आरंभीं सव्वा इंच मध्यांत एक इंच व शेवटीं दीड इंच रुंद असून शेवटीं टोकदार आहे. धार एकाच बाजूला पण संपूर्ण आहे. पातें व मुठीचा खिळा एक आहे. मूठ वनगाईचे शिंगाची आहे व ती त्या खिळ्यावर बसविली आहे.

रामपुरी कत्तीचें पातें रामपुरी पोलादाचें असून त्यावर जेहरी पाणी दिलेलें आहे. पातें दोन फूट सात इंच लांब व दीड इंच रुंद असून तें सरळ आहे व त्यास एकाच बाजूला धार आहे. त्या वरील दोन नळ दोन फूट सात इंच लांब आहेत. हें पातें पुरबीया मुठींत बसविलें आहे. सिसोदीया घराण्यांतील समरसिंह, या जातीच्या तलवारी तयार करून ठेवून त्या फक्त आपल्या वाढदिवशीं आप्तस्वकीयांसच नजराणा म्हणून देत.

रामायण कालापासून सर्वांच्या परिचयाचें असें धनुष्य याची पट्टी मध्यभागांत दोन फूट पर्यंत सरळ आहे व नंतर दोन्ही टोकांना वांकविली आहे. धनुष्य धरण्यासाठीं पट्टीचे मध्याला गोल मूठ ठेविली आहे. पट्टीचे दोन्ही टोकांला खांचा ठेविल्या असून त्यांतून बकऱ्याची तांत अडकविली आहे. तांतेच्या भोंवतीं रेशीम गुंडाळलें आहे. पट्टी दीड इंच रुंद पोलादाची आहे.

सोसनपत्याचें पातें पोलादी असून त्यावर जेहरी पाणी दिलें आहे. याची लांबी दोन फूट व रुंदी एक इंच आहे. हें टोकाशीं बारिक परंतु वांकलेलें आहे. यास एकाच बाजूनें संपूर्ण धार असून हें दिल्लीशाही मुठींत बसविलें आहे. या हत्यारास अर्ध तलवार म्हणावयास हरकत नाहीं. चाबकाप्रमाणें लवचिक व हलकी असल्यानें या तलवारीनें हात करीत असतां लौकर थकवा येत नाहीं. हिच्या पाठीस मजबुतीकरतां चिमटा बसविला आहे.

चांपानेरी तलवारीचें पोलादी पातें दोन फूट पांच इंच लांब व दीड इंच रुंद असून त्यांवर एक फूट सहा इंच नळ आहे. पात्याला वांक आहे व एकाच बाजूला धार आहे. हिच्यावर असलेल्या मुठीला फैजाबादी मूठ म्हणतात. चांपानेर नांवाचें महमद बेगडा नांवाच्या राजाचें एक फार मोठें शहर होतें. हें पावागड नांवाच्या किल्ल्याजवळ वसलेलें होतें. पुढें हें शहर मोडलें.

सिरोहीलाखाशाही नांवच्या पात्याच्या मध्याला माळ असते. काठेवाडांत या तलवारीला देसलजाही म्हणतात. हिच्या जन्म–ठिकाणाबद्दल दोन मतें आहेत. कोणी ही भूजमध्यें तयार झाली तर कोणी ही सिरोही शहरांत तयार झाली, असें मानतात.

खुरासानी नांवाच्या तलवारीचें पोलाद चंद्रवर खातेदार असून त्यावर थोडथोड्या अंतरावर आडव्या रेघा आहेत. याचें जव्हेर उत्कृष्ट आहे. या तलवारीस चमनबन्दी असेंही म्हणतात. हिचें पातें मोठें व वांकदार असल्यानें त्यावर जोधपुरी मूठ चांगली दिसते. इराणांतील खुरासान प्रांतीं ही तलवार तयार झाली.

इराणी तलवारीच्या पोलादाची जात हत्तीपगी असून तिचें जव्हेर चमनबंदी आहे. पात्यावर नळ नाहीं. पातें चांगलें रुंद असून त्यावर दोन रंग दिसतात. पाठी-मागें तांबुस धार आहे व तीवर काळ्या रंगाचें सोमलाचें पाणी दिलेलें आहे. हिच्यां-तील वैशिष्ट्य म्हणजे ही मोडत नाहीं.

गंगाजमनी ही एक अति विलक्षण तलवार आहे. तिच्या परजवर रात्रीं उजेड व दिवसा अंधेर दिसतो. हिचें लोखंड जव्हेरदार आहे. पात्यावर हिंदूंची निशाणी म्हणून " हर हर महादेव ! " हीं अक्षरें खोदविलेलीं आहेत. हिची मूठ मुल्हेरी आहे. ही साताऱ्याजवळील वाठार गांवीं झाली. अनेक लढायांत हिनें आपलें पाणी दाखविलें आहे.

दशावतारी तलवारीवर आपल्या इकडील दहाही अवतारांचीं चित्रें काढलीं आहेत. हिच्यावर देखील " हर हर महादेव ! " अक्षरें आढळतात. हिची मूठ बडोदेशाही असून हिचें म्यान तारफणीचें आहे. ही महशूर मराठे सरदार महादजी शिंदे यांच्या घराण्याकडील असल्याचें समजतें.

एक सुंदर सोलीगन पातें असलेली तेग नांवाची तलवार सर टोमस रो यांनीं जहांगीर बादशहांना नजर केली होती. हैदराबाद येथें अजून पुष्कळ तज्ज्ञ लोक असे आहेत कीं, ते पहातां क्षणींच तलवारीचें पातें " गोयेनीझ, " कां, "टोलेडो " कां, " सोलीगन " आहे हें सांगतात. ( या सर्व जाती अर्थात् युरोपीय आहेत. ) प्रस्तुत तलवारीवर "आब्राहम स्टाम–सोलीगन" असें लिहिलें असून गेल्या तीन शतकांत बऱ्याचशा धुमश्चक्रीच्या लढायांत तिनें भाग घेतला आहे.

पेचकबज नांवाचें हत्यार ब्रम्हदेशीय राजघराण्यांत चार शतकें वापरलें गेलें. जड, पसरट व किंचित् वांकलेली हैदरी तलवार आहे. हिचें पातें आपल्या इकडील असून त्यावर दमास्कसी पाणी चढविलें आहे. मूठ सोन्याची असून तीवर हिरे, माणिक, पाचू, बसविले आहेत. बनारसच्या महाराजांच्या शस्त्र-कामगारांच्या सांग-ण्यावरून असें समजतें कीं, ही तलवार मारक्वीस वेल्सलीनें सध्यांच्या महाराजांच्या आजोबास नजर केली होती. तिचें म्यान लांकडाचें असून त्यावर मखमल घालून सोन्याचे कलाबतूंत हिरे माणिक बसविले आहेत. बनारसच्या महाराजांनीं राजे एडवर्ड यांना ही भेट म्हणून दिली.

हलबी तलवार दमास्कसचा सरदार महंमद नाझीफ नांवचा होता त्याची होती. त्यानें हिचा प्लासीच्या लढाईत व म्हैसूरचे लढाईत उपयोग केला होता. तिची मूठ

सोन्याची असून तिच्यांत हिरे व पाचू बसविले आहेत. दैदिप्यमान दुधारी पेचकबेज या शस्त्रानें प्रसिद्ध औरंगजेबाचा पणतु फरूकशियर यानें जहांदरशहाचा खून केला.

गिझनीच्या महंमदानें हिंदुस्थानांत प्रथमतः ज्या जातीच्या तलवारी आणल्या त्य पैकीं म्हणजे हुसेनी तलवार होय. या जातीच्या तलवारीवर एक मंत्र खोदलेला असतो. जेव्हां दिल्ली शहर घेतलें त्या वेळीं ही हुसेनी एका पर्शियन सरदाराच्या ताब्यांत होती व त्यानें हिनें चारशें बायका पुरूष व मुलें कापलीं म्हणून लिहून ठेवलें आहे.स.१७३८ च्या कत्तलींत ज्या अर्थीं एक लाख माणसें मारलीं गेलीं त्या दृष्टीनें पहातां ही गोष्ट कांहीं अशक्य नाहीं. पर्शियन स्वाराशीं या तलवारीचा संबंध येतो. हिला दिलेलें पाणी महंमदी शीडी ( Mahammad's ladder ) या नांवानें प्रसिद्ध आहे. हिची मूठ सोन्याची असून तींत हिरे, माणिक, व पाचू बसविले आहेत. हिचें पाणी उत्कृष्ट दरज्याचें असून हिचें पातें घडविण्यांपूर्वीं लोखंड व पोलाद यांची तावून वीण केली होती. मनोहर म्यानांत पंजाब संस्थापक सरदार रणजितसिंग यांची आवडती तिर्याघाटी तलवार आहे.

पुढील तलवारी विशेष कुतूहलोत्पादक आहेत. हकीमखानी कत्ती ही धर्म युद्धांत ( Crusades मध्यें ) वापरण्यांत आलेली सुंदर पैकीं तलवार आहे. ज्या म्यानात ही फक्त अडीचशें वर्षेंच होती, तें म्यान पूर्वीं बादशहा शहाआलमच्या ताब्यांत होतें.

अली यानें फ्रँक्स विरुद्ध रामपुरी तलवारीचा उपयोग केल्याचें त्यावरील खोद-लेल्या उल्लेखावरून कळतें. धर्म-युद्धाचे वेळीं उपयोगांत आणलेलें हें जुनें हत्यार आज अगदीं नवें करकरीत दिसतें. नवाजखानी तलवार स. १७३८ च्या पार्शियन हल्ल्याची आठवण करून देते. दिल्लीच्या एका संरक्षकाशीं हातघाईचे लढाईत एका सरदारानें तिचा उपयोग केला होता. विजयनगरच्या नव्या राजाजवळ असलेल्या पेचकबजाची मूठ हस्तिदंती आहे. मुठा चंद्रकार असून त्यावर हिरे जडविले आहेत. आणीबाणीचे प्रसंगीं हा खरोखरच अतिशय उपयोगी.

दमास्कसचें पाणी दिलेली झुल्फिकार ही एक उत्कृष्ट तलवार आहे. तिच्यावर पार्शियन भाषेंत लिहिलेला मजकूर आहे. पाठीमागचे बाजूस 'महमद इब्राहिम' असें कारागिराचें नांव आहे. मुठीवर सोन्याचें पाणी दिलेलें असून त्यावर "अली सारखा महात्मा नाहीं व झुल्फिकारसारखी तलवार नाहीं." असें लिहिलें आहे. या तलवारीच्या इतिहासाचा धागा ५०० वर्षांपूर्वींपर्यंत जाऊं शकतो आणि तिच्या

करवीं झालेल्या पराक्रमाची हकीगत सांगावयाची म्हणजे एक स्वतंत्र प्रचंडसा ग्रंथच होईल. त्या देशांत अनेक तलवारींचा इतिहास जतन करून ठेवलेला आहे. तेहरान येथील हुजूर ग्रंथालयांत दोनशें वर्षांपूर्वींचा एक हस्तलिखित ग्रंथ आहे. त्यांत या झुल्फिकारपेक्षां कमी प्रतीच्या अनेक तलवारींच्या कहाण्या ग्रथित केल्या आहेत.

इंदोर घराण्यांतील पबाशाहीची कथा जरा नवलपूर्ण आहे. सतराव्या शतकांत बहादुर सिराज नावांचा जो अधिपति होता त्याचा युद्ध प्रसंगीं शत्रूंचे गराड्यांत सांपडला असतां याच तलवारीचे पात्यावर पडून जीव गेला ! हिला आतां अत्यंत सुंदरशा म्यानांत ठेविली आहे. हें म्यान पिवळ्या मखमालीवर हिरे, मोतीं, माणिक, लाल, पाचू बसवून मंडित केल्यानें त्यास कांहीं अवर्णनीय शोभा आली आहे. त्यावर पुन्हां सोन्याचा पट्टा चढविल्यानें एकंदर खुलावट कांहीं और दिसते.

मंडीचे राजे तेगा अलेमानी तरवारीचा वंशपरंपरागत उपयोग करीत आले. ही हिंदुस्थानांत बनलेली आहे. हिच्या पात्याचें मध्यभागीं गोल अशीं बारीक भोकें आहेत व त्या मध्यें एक लहानसा शिशाचा गोळा आहे. हा गोळा त्या तलवारीच्या दोन्ही भागाला जे सहा सहा छोटेसे चिरे आहेत त्यांतून दिसतो. तिची स्वसंरक्षक मूठ चपटी असून तिचा मुठा चपटा वर्तुळाकार आहे व त्यावर सोनेरी नकशी-काम केलेलें आहे. म्यानावर हिरे, माणिक, पाचू, लाल जडविले आहेत. मगरी ही देखील जरा प्रसिद्ध तलवार आहे. ती सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांतील अगर सतराव्या शतकांतील पूर्वार्धांतील असावी. जोव्हरा वंशाचा उत्पादक अबदुल गुफुरखान याची ती होती. जोचाना हें एक उत्कृष्ट पर्शियन पातें असून त्यावर बहुतेक थेट पर्यंत रेघ कोरलेली आहे. शिवाय दुसऱ्या बाजूला देखील एक खोल रेघ असून ती चार ठिकाणीं तोडलेली आहे व त्या योगें पांच खोल रेघा तीवर दृष्टोत्पत्तीस येतात. मुठीजवळ लहानशी खोलगट जागा असून तीमध्यें फुलांची नकशी कोरलेली आहे व पात्यांच्या दोन्ही बाजूला पर्शियन भाषेंत कांहीं मुद्रित केलेलें आहे. खैरपुरचे खान युद्धप्रसंगीं हीच तलवार वापरति असत. म्यानावर मोठाले माणिक व लाल जडविले आहेत. भूजी तलवार ओरमझच्या लढाईची आठ-वण म्हणून आहे. तेथें ती एका इंग्रजानें मिळविली व एका राजाला नजर केली.

आश्चर्योत्पादक अरबी सुऱ्याचा कच्छचे राव उपयोग करीत. मुठीखालीं कांहींसे झांकलेलें असें पुढील प्रमाणें तीवर लिहिलेलें आहे. " माझा जन्म जीव घेण्यासाठीं आहे परंतु माझे अंतर्यामीं दया आहे." हिची मूठ सोन्याची असून तीवर

हिरे लावले आहेत आणि म्यान निखालस सोन्याचें आहे. टिपू सुलतानानें शोधून काढलेली कट्यार फार भयंकर आहे. हींत कट्यार आणि पिस्तुल दोन्हींही अशा रीतीनें बसविलीं आहेत कीं, वापरणारा एकाच वेळीं दोहींचाहि उपयोग करूं शकतो. अरबी जमीयानें बादशहा फरूकशियर याचा त्याच्या सरदारांनीं त्याला चाळीस ठिकाणीं जखमी करून खून केला.

गुरख्यांच्या प्राणघातक कुकरीचें पातें वाकडें असून त्यांवर रेषांची दुहेरी ओळ व ठिपके आहेत. पात्यांचे आंतील कड तीक्ष्ण आहे. हें भीषण शस्त्र पूर्व ऐतिहासिक कालाचा अवशिष्ट नमुना आहे. " लिसनिंग स्लेव्ह " (इ. स. पू. २०० वर्षें) नांवाची जी ग्रीक आकृति आहे, तिच्यांत ही आढळते आणि ज्या अर्थीं ही कित्येक शतकांपूर्वींची आहे त्या अर्थीं ही फ्रँक्सनीं पौर्वात्य देशांत पाय टाकण्यापूर्वीं बरेच वर्षें आधीं जन्मली असावी. नेपाळच्या महाराजांनीं ही राजे एडवर्ड यांना भेट म्हणून पाठविली. सालवान याटाघान अथवा ज्याला खैबर चाकू अगर तीरेघाटी सुरा याचें पातें दमास्कसी असून त्यावर फुलांची सुंदर नकशी आहे. हें पातें चांगलें रुंद व सरळ आहे. मूठ हस्तिदंत आणि सोनें यांची केलेली आहे. रुमी सुऱ्यांत एक विलक्षण गोष्ट आढळून येते आणि ती म्हणजे करणाराचे " फेरारा " या नांवांतील अक्षरांपैकीं फक्त " रार " एवढेंच सहा ठिकाणीं तिच्यावर दृष्टीस पडतें.

ढाल हें आपणांकडील एक महत्त्वाचें शस्त्र आहे. त्याचा उपयोग फक्त बचावाचे कामींच होतो असें नाहीं, तर याला जर पुढें अणकुचीदार खिळे लाविले असले तर हल्ला करण्याचें वेळीं देखील याचें बेरेंच महत्त्वाचें कार्य असतें. ढालीमध्यें सर्वांत जास्त चित्ताकर्षक अशी कदाचित् दुर्दैवी शहाआलमची ढाल ठरण्याचा संभव आहे. हिचें गेंड्याचें कातडें पारदर्शक असून त्यावर बंदुकीचे गोळीचा कांहीं एक परिणाम होत नाहीं. माऊ ढाल पोलादाची आहे. तीवर सोन्याची नकशी असून त्यावर खिळे बसविले आहेत. आर्कॉटच्या नबाबाच्या शस्त्रागारांतून ही प्रथमतः आली.

सात आठ पिढ्या एकाच घराण्यांत राहिलेली व इतिहासांत देखील थोडी फार प्रसिद्ध असलेली कत्ती ही तेराव्या शतकांत युरोपांत तयार झाली व धर्मयुद्धानंतरच तिचें पाऊल हिंदुस्थानांत पडलें. तिची मूठ पहाडी स्फटिकाची आहे. मुठा सोन्याच्या गोळयाचा असून त्यावर हिऱ्याचा तारा बसविला आहे. म्यान चांदीचें केलेलें आहे व त्यावर दोन्ही बाजूस उत्कृष्ट अशी फुलांची नकशी आहे. मुठीजवळ पक्षी काढले असून हिरवी पानें दाखविलीं आहेत. मूठ रेवाजवळ सांपडणाऱ्या स्फटिकाची आहे. रेवाच्या महाराजांनीं ती राजे एडवर्ड यांना अर्पण केली.

दुसरी युरोपीय तलवार म्हणजे झिंदचे राजाजवळ असलेली हलबी होय ही तलवार जड आहे. मूठ, सांधा व मुद्दा हीं सोन्याची असून त्यावर हिरे, माणिक व लाल जडविले आहेत. म्यान सोन्याचें आहे व त्यावर सुंदर पक्षी व मोहक फुलें काढलीं आहेत. पात्याच्या वरच्या एका बाजूस वाघ व मगर यांची झुंज तर दुसऱ्या बाजूस वाघ व हत्ती यांची झुंज दाखविली आहे.

आतां सर्वांत अत्यंत महत्त्वाची व म्हणूनच शेवटीं सांगण्यासाठीं राखून ठेवलेली कोल्हापुर महाराजांकडून राजे एडवर्ड यांना भेट म्हणून गेलेली तलवार, आणि ही म्हणजे दुसरी तिसरी कोणतीच नसून जिच्या स्मरणाबरोबर चित्तवेदना स्थिर पावतात व चटकन् न कळत डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहूं लागतो तीच ती आपल्या परमवंदनीय श्री शिवरायांची पराक्रम–देवता श्रीभवानी तलवार ! हिचें वर्णन काय व किती करावयाचें ? वास्तविक या त्रिशत–सांवत्सरिक जन्म–महोत्सव दिवशीं श्री शिवरायांच्या प्रतिमेसमोर तिचीच स्थापना करून मिरवणूक काढावयाची ! आणि हें अशक्य कां होतें ? खास नव्हे. आपल्या सम्राटांच्या जेष्ठ चिरंजीवांचेच शुभहस्तें ना पुण्यास श्री शिवाजी मंदीराचा पाया घालण्याचा समारंभ झाला ? पूजा करावयाची उत्कट इच्छा आपण हिंदीजनांनीं प्रदर्शित करतां तेथें बकींगहॅम राजवाड्यामधील सुवर्ण कपाटांत ठेवलेली श्रीभवानी येथें मंदीरांत ठेवण्यास पाठवून देण्यांत कोणता जनमनआनंदार्थ झटणारा नृपति ना म्हणेल ? आपणच ना ती राजे एडवर्ड यांना प्रेमपूर्वक नजर केली ? काल-मानाप्रमाणें तिच्या पूजनार्थ उत्सुक झालेल्या प्रजाजनांस ती देव्हाऱ्यांत ठेवण्यासाठीं परत पाठविण्यास कोणास भूषण वाटणार नाहीं ? आम्हांस तरी असें खास वाटतें कीं, आपण आपली सद्भावना प्रदर्शित करतांच तिची पूर्ति व्हावयास विलंब लागणार नाहीं. उशीर काय तो आपणांकडूनच. नेते लोक याचा विचार करतील कां ?

या आश्चर्यकारक तलवारीचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न कितीतरी लेखकांनीं केला. परंतु एका इंग्रज ग्रंथकाराचें म्हणणें असें आहे कीं, तिच्या करवीं झालेल्या एक कृत्यांचा दशांश तरी कोणास सांगतां आला आहे किंवा नाहीं याची शंकाच आहे. आम्हास देखील असें वाटतें कीं, श्रीभवानी हीच शिवरायांच्या यशःसिद्धीचें सार-सर्वस्व ही दृढतम भावना जोपर्यंत हिंदुमात्रांच्या मनांत आहे, तोंपर्यंत तिच्याकरवीं झालेल्या आणखी विशेष कृत्यांच्या आठवणीची त्यांस आवश्यकता भासमान होणार नाहीं ही गोष्ट जरी असली तरी पण तिच्यासंबंधीं मिळेल तेवढी माहिती एके ठिकाणीं संकलित होणें अवश्य आहे व त्याप्रमाणें जर कोणी इतिहास संशोधक

करील तर श्रीशिवरायांचे असंख्य भक्त जन त्यांस मनःपूर्वक धन्यवाद देतील यांत तिलप्राय शंका नाहीं.

या तलवारीचें थोडक्यांत बाह्य वर्णन म्हणजे तिच्या दोन्ही बाजूला दोन खोल रेघा, मुठीजवळील जाड पोलादी भागावर सोनेरी फुलांची नकशी, मूठ आच्छादित असून लोखंडी, सांध्याजवळील भाग चांगला रुंद व गोल, मुठीच्या टोकाला मोगरा, त्यावर देखील सोनेरी फुलांची नकशी व त्यामध्यें अगदीं जवळ जवळ बसविलेले हिरे व लाल असें आहे. श्री शिवरायांनीं स्वराज्य स्थापनेची मूहूर्तमेढ पक्की रोवून आपले इहलोकींचें अवतारकार्य जनदृष्ट्या संपवून सन १६८० मध्यें स्वर्लोकीं प्रयाण केल्यानंतर कोल्हापुर नगरींत तिची देव्हाऱ्यांत स्थापना केली गेली व तेथें तिच्या भक्ताचा एक पंथच निर्माण झाला. " ती त्या घराण्याचीच नव्हे, तर सर्व महाराष्ट्राची राष्ट्रीय संपत्ति मानली जात असे आणि शिवाजीच्या वंशजांनीं ती देऊन टाकली, त्याला दुसरें तिसरें कांहीं एक कारण नसून देणाराची निस्सीम राजभक्तीच असली पाहिजे," असें गौरवपर उद्गार सर जार्ज बर्डहुड साहेबांनीं काढले आहेत. राजा हा देवाचा अंश अशी आज अतिप्राचीन काळापासून आपल्या हृदयांत ठसलेली कल्पना अत्यंत पवित्र आहे व ती तशीच कायम राहो अशी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे.

या शिवाय असलेल्या शस्त्रकवचादिकांचा आतां येथें नुसता नामनिर्देश करणें प्राप्त आहे.

नामावली येणें प्रमाणें:—भुजीगोलीया, जुनीगुजराथ, लालुवाड, पटणी, कर्नाटकी, हलुबी, नागन, अलेमान पटणी, मगरबी, जफरतकीया, तैंगा ( पटणी ), पटा, रूमीसुरा, तीराघाट सुरा, कत्ती नवासखानी ( चिमटेदार ), परशु ( तबल ), सिपकल, मारू, कडाबीन, बेचकबज, धोक, अंकुश, बोथाटी, बनेटी, गोफण, वींटा, लग्गी, बरछी, दास्ताने, चक्र, टोप, चिलखत, कबजा, हाथमोजे, जोड तलवार, जोड जमीया, गुप्ती, वासलवाड, जामगिरी बंदुक, त्रिशुळ, शैफ, धारीया, डांग, घाब, सुतरनाला, जंबुरे, इत्यादि.

आतां या लेखांत तलवारींच्या पात्यांना अमुक तऱ्हेचें पाणी दिलेलें आहे वगैरे ठिकठिकाणीं उल्लेख आल्यामुळें पाणी देण्यासंबंधीं व दुसऱ्या महत्त्वाच्या गोष्टींचा ओझरता उल्लेख करणें येथें अप्रस्तुत होणार नाहीं असें वाटतें.

पाणी देण्याचे अनेक प्रकार आहेत हें असिपानविधीबद्दल धनुर्वेदांमधील बृहत्संहितेवरुन समजेल. धनुर्वेदांत तलवारीचें वर्णन असें केलें आहे:—

**शतार्धमंगुलानांतु श्रेष्ठः खड्गः प्रकीर्तितः ।**
**तदर्धो मध्यसंज्ञाभाक् ततो हीनं न धारयेत् ॥**

तलवारीस पाणी देतात त्याचे प्रकार खालील प्रमाणें:—

१ घाव नरम ठेवावयाचा असल्यास तिळाचें तेल अगर गोडें पाणी.

२ घाव गरम करणें असल्यास खोबरेल तेल.

३ घाव बरा होऊं नये अशी इच्छा असल्यास सोमलाचें पाणी.

४ घाव थंड पाडण्यास शिशाचें पाणी.

विषारी जेहरी पाण्याचे प्रकार.

१ भिलाव्याचा अर्क काढून त्यांत पोलाद टिपून काढणें.

२ सोमल, बचनाग, यांचे अर्कात पोलाद तयार केल्यानें कोणतेंही शस्त्र विषारी बनतें.

३ नेपाळयाच्या बीमधील पान काढून त्याचा अर्क तयार करून पोलाद केल्यास तलवार विषारी होते.

हल्लींचे काळीं तलवारीची लांबी ५० अंगळें, रुंदी २ ते ४ अंगळें, अशी असते. श्री शिवाजी महाराजांचे वेळच्या तलवारींची लांबी ३½ फूट व रुंदी १। इंच, पातें जाड, परंतु लवचिक असें असे.

तलवारींचें टोक कसें असावें, कसा आवाज निघाला असतां तें चांगलें व कसा निघाला असतां तें वाईट या संबंधींची परीक्षा अनेक प्रकारें करतात.

अंग, रूप, जाति, ध्वनि, मान, इत्यादि आठ साधनांनीं पूर्वीं खड्ग परीक्षा करीत असत.

अंग म्हणजे पोलादावर रेषा चिन्ह दिसतें तें; रूप म्हणजे नील, कृष्ण वगैरे रंग दिसतात ते.

ध्वधि म्हणजे काष्ठापात इत्यादि पासून जो शब्द उत्पन्न होतो तोच. मान म्हणजे लांबी, रुंदी वगैरेचे प्रमाण. हल्लीं आठ साधनांचा उपयोग होत नाहीं. पोलादाच्या जातीवरून, बनविणाऱ्यावरून व देशावरून तलवारी ओळखल्या जातात.

पोलादाचें प्रकार तीन. जव्हेरदाड, सकेला, व साधें कोठें कोठें पोलादास वट म्हणतात.

जव्हेरदाड पोलाद तीन प्रकारचें असतें. पहिल्या प्रतीचें म्हणजे चंद्रवट. हें नरम असतें. याचें जव्हेर खबुतराच्या डोळयांसारखे गोल असतें. याचा रंग काळा असतो.

मध्यम म्हणजे हत्तीपगी—हें वरील पेक्षां थोडें कठीण जव्हेर कांकडी बियांसारखें लांबट व काळ्या रंगाचें असतें. हें इराणाकडे होतें. सकेला कठिण करावयाचा असल्यास त्यास मीठ, चामडें व कांच याचें पाणी पाजतात.

कनिष्ठ म्हटलें जाणारें रामपुरी. हें फार कठीण असते. याचें जव्हेर मुंग्यांप्रमाणें बारीक व काळ्याच रंगावर असतें.

खेडीवर याही पेक्षां खालच्या प्रतीचें व फरासी म्हणजे कनिष्ठांत कनिष्ठ.

मुठीच्या कांहीं मुख्य जातींची नांवें येणें प्रमाणें:—दिल्लीशाही, अवरंगजेबी, सिंधी, हकीमखानी, बंगला, फैलाबादी, अवध सीताकी रसोई, गुजराथी, पुरबिया, करनशाही, भुजी, सिनोही, मुल्हेरी, कर्नाटकी, इराणी अस्सली, इराणी नकली, इराणी पोपटघारी, शेर शहां इत्यादि.

शस्त्र साफ ठेवण्यास नाना प्रकारची तेलें वापरलीं जातात. त्यांपैकीं विशेष प्रचारांतील म्हणजे मेणाचें तेल, रंगून तेल, जैलूनचें तेल व नारळाचें तेल. मेणाचें तेलांत हळद व खोबरेल यांचें मिश्रण करतात. नुसतेंच खोबरेल कनिष्ठ प्रकारचें मानलें जातें.

तलवारादि हत्यारें नेहमीं साफ ठेवावीं लागतात. व त्यासाठीं शिकलगिराची जरूर असते. उत्तम तलवारी सराणावर कधींच चढवीत नाहींत. त्यांचेसाठीं कुरणच्या दगडाचा, बनातीच्या तुकड्याचा व कापडाच्या गद्दीचा उपयोग करतात.

**टीप:**—ज्या कोणापाशीं विशिष्ट तऱ्हेचीं हत्यारें असतील त्यांनीं तत्संबंधीं असलेली ऐतिहासिक वगैरे सर्व हकीगत मोजमापांसुद्धां कळविण्याची कृपा करावी. जर तसेंच हत्यार असेल व हकीगत कळविण्यास सवड नसेल व ते आम्हाकडे पहाण्यास पाठविण्याचीही शक्यता नसेल तर आम्हांस तसें कळविल्यास व मालकाची तें आम्हांस दाखविण्यास हरकत नसेल तर आम्ही मोठ्या आनंदानें त्याचें दर्शन घेण्यास येऊं. सर्व तऱ्हेच्या हत्यारांचा ग्रंथांत संपूर्ण उल्लेख असावा हीच इच्छा या विनंतीच्या मुळाशीं आहे.

---

# छत्रसाल-शिवाजींची भेट

( लालकविकृत छत्र-प्रकाशांतून ).

( ले. रामचंद्र गोविंद काटे. )

दक्षिणेंतील मराठ्यां प्रमाणेंच बुंदेले रजपुतांचा मोगल बादशाहीशीं स्वातंत्र्याचा झगडा कैक शतकें चालला होता; आणि बुंदेलखंड दिल्लीला नजीक असल्यामुळें या झगड्यांत बुंदेल्यांस अत्यंत तीव्र यातना सहन कराव्या लागल्या. औरंगजेबास राज्य प्राप्त होतांच त्यानें बुंदेला वीर चंपतराय याजवर शस्त्र धरिलें. मोगलांच्या प्रचंड फौजांपुढें नाइलाज होऊन चंपतराय व त्याची राणी काली कुमारी यांनीं ऑक्टोबर स. १६६१ त तलवारीखालीं कापून प्राणत्याग केला. त्यांस पांच मुलगे होते तेही देशोधडीस लागले. छत्रसाल व त्याचा वडील भाऊ अंगद असे दोघे जयसिंग स. १६६४ त शिवाजीवर चालून येत असतां, त्याच्या नोकरीस राहिले. पुरदंरचे स्वारींत दिलीरखानाच्या हाताखालीं त्यांनीं पुष्कळ पराक्रम केला, परंतु त्याचें फल त्यांस कांहींच मिळालें नाहीं. पुढें शिवाजी बादशहाचे भेटीस गेला, तेव्हां दिलीरखानानें नागपुरजवळच्या देवगडावर स्वारी केली, त्यांत छत्रसालाच्या अद्वितीय पराक्रमानें देवगडचा पाडाव झाला, पण त्यास पुष्कळ असह्य जखमा लागल्या. तरी त्याच्या कामगिरीचा कांहींच उल्लेख दिलीरखानानें बादशहास कळविला नाहीं, व छत्रसालास त्या पराक्रमाचा कांहींच मोबदला मिळाला नाहीं. इतक्यांत शिवाजी बादशहाचे कैदेंतून सुटून दक्षिणेंत आल्याची खबर त्यास कळली; आणि दिलीरखान बादशहाचे हुकमानें वऱ्हाडांतून पुनरपि शिवाजीवर चालून आला, त्याजबरोबर छत्रसाल होता. शिवाजीचा अद्भुत पराक्रम ऐकून त्यास भेटण्याची छत्रसालास इच्छा झाली, आणि शिकारीस जाण्याचें निमित्त करून तो शिवाजीस भेटला. या भेटीचें वर्णन छत्रप्रकाशांत लाल कवीनें केलेलें पुढील पद्यांत देण्यांत येत आहे. शिवाजीच्या सल्ल्यानें छत्रसाल १६७१ त स्वदेशीं जाऊन पुढें मोगल बादशाहीशीं सारखा झगडत राहिला. त्याची हयात स. १६५०—१७३३ ची आहे. मुसलमानांच्या जुलमास हिंदु लोक कसे कंटाळले होते, हें मराठे, बुंदेले, रजपुत वगैरेंच्या प्रयत्नांवरून दिसून येतें.

लाल कवि हा छत्रसालाचाच आश्रित होता; आणि त्यानें छत्रसालाच्या सांगण्या-वरून त्याचें काव्यमय चरित्र लिहिलें, तें 'छत्रप्रकाश' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचें मूळ नांव गोरे लाल. तो मौ ऊर्फ महोबा येथील राहणारा. महोबा हें ठिकाण छत्रसालच्या आवडीचें असून तेथें हे दोघे पुष्कळ वर्षें एकत्रच राहत असत. बुंदेलखंड गॅझेटियरमध्यें लाल कवीचें अल्पचरित्र दिलेलें आहे. छत्रप्रकाश ग्रंथ कवित्वाच्या दृष्टीनें सुप्रसिद्ध असून, त्यांत बहुधा दोहा व चौपाई हे दोनच छंद वापरलेले आहेत. भाषा अत्यंत साधी पण जोरदार आहे. चौपाई रचण्यांत तुलसी-दासाचे पश्चात् लाल कवीच मुख्य गणला जातो. पुष्कळ लढायांत हा कवि स्वतः रणांगणावर छत्रसालाचे बाजूनें लढत होता. स. १७०७ च्या पुढील हकीकती त्याच्या ग्रंथांत नाहींत, यावरून त्या सालच्या सुमारास तो बहुधा युद्धांत मारला गेला असें समजतें. त्याची उमर अंदाजीं पन्नास वर्षांची होती.

लाल कवि छत्रप्रकाशांत म्हणतो,

**धनि चपंति के औतरो, पंचम श्रीछत्रसाल ।**
**जिनकी आज्ञा सीस धरि, करी कहानी लाल ।।** अध्याय ९ ।।

चंपतीचा वंशधर छत्रसाल याचा जयजयकार असो, ज्याची आज्ञा शिरीं वंदून लाल कवि ही कहाणी करीत आहे. छत्रप्रकाश ग्रंथाचे २६ अध्याय उपलब्ध आहेत. त्याच्या हयातींतील पुष्कळ प्रसंगांचा उल्लेख या ग्रंथांत आढळत नाहीं, यावरून त्याचे कांहीं भाग नष्ट झाले असें म्हणावें लागतें.

'**बडे ठौर कढि उद्यम कीजै**' म्ह० मोठें ठिकाण शोधून काढून उद्योग करावा, या हेतूनें छत्रसाल जयसिंहाकडे आला.

**मिले जाइ जयसिंह नृपालै । उनि हित सों चाह्यो छत्रसालै ।।**

छत्रसाल जयसिंहाला जाऊन भेटला, त्यानें त्याचा सत्कार केला. पुढें जयसिं-हानें छत्रसालास बहादुरखानाबरोबर देवगडावर पाठविलें, असें लालकवि लिहितो, त्यांत बहादुरखानाचे ऐवजीं दिलीरखान पाहिजे. जयसिंह स. १६६७ त मरण पावला, त्यापूर्वींच छत्रसालाची तैनात दिलीरखानाकडे झाली होती, ( सरकारकृत औरंगजेब भा. ५ पृ. ३९२ ). या स्वारींतील पराक्रमानें छत्रसालाची कांहींच बढती झाली नाहीं, तेव्हां तो शिवाजीची कीर्ति ऐकून त्याजकडे आला.

छत्रसाल—शिवाजीच्या भेटीचा हा प्रसंग पुढील आठ पद्यांत कवीनें वर्णिला आहे. छत्रसाल शिकारीच्या निमित्तानें बाहेर पडून, उंच दऱ्याखोरीं व पुरानें भरून चाल-

लेल्या भीमा व कृष्णा ह्या नद्या ओलांडून, उत्तरेकडून दक्षिणेस आल्याचें कवि वर्णन करतो. यावरून छत्रसाल अहंमदनगरकडून साताऱ्याचे बाजूस शिवाजीचे भेटीसाठीं बहुधा स. १६६७ च्या आश्विनांत आला असावा.

---

## कविताष्टक.

जिन छत्रसाल करी घन घाई । तिनकी कछु चरचा न चलाई ॥
सुनत फतुह साह सुख पायौ । बढि. नबाबको मनसि न आयौ ॥
मनसिब बढयो नबाब को । दियौ साह सुख पाई ।
छत्रसाल के भुजनकी । को न कमाई खाइ ॥ १ ॥

ज्या छत्रसालानें घण–मार केली, त्याची बिलकुल चर्चा चालली नाहीं. बादशहा विजय ऐकून आनंद पावला; आणि त्यानें नबाबाची मनसब वाढविली. नबाबाची मनसब वाढली. बादशहाला खुषी झाली. सारांश, छत्रसालच्या भुजांची कमाई कोणीं खाल्ली नाहीं !

फिरि नबाब दच्छिन कौ धायै । छत्रसाल तिन संग सिधाये ॥
जद्यपि विक्रम प्रगट जनायौ । फल नबाब तै कछु न पायौ ॥
तन मन भयौ अनख अधिकारौ । तुरकन ते कब बन्यो हमारौ॥
पिता हमारे सूबा डाँडे । तुरकन पर अजमाये खांड़े ॥
तिन चंपति के नंद हम, ससि नवावैं काहि ।
हम भूले सेयौ वृथा, हितू जानि कै वाहि ॥ २ ॥

पुनः नबाब दक्षिणेंत गेला, त्याजबरोबर छत्रसालही गेला. जरी त्यानें आपला पराक्रम उघड दाखविला, तरी त्याचें फल नबाबानें त्यास कांहीं दिलें नाहीं. त्यामुळें त्याचें तनमन क्रोधाधीन झालें. तुरकाशीं आमचा कधीं मिलाफ झाला आहे ? जो माझा पिता सुभ्यांना दंडीत असे, आणि तुरकांचे मस्तकावर आपली तरवार पारखून घेई, त्या चंपतीचा पुत्र मी आपलें मस्तक कोणापुढें नमवूं ? फुकट त्यांना हितकर्ते समजून मीं त्यांची सेवा केली ! !

हितू जानि सेयौ अविवेकी । तातै कहौ होइ क्यौं नेकी ॥
ताकौ हम ऐसौ फल पायौ । याके संग कसालौ खायौ ॥

हम तौ छत्रधर्म प्रतिपाल्यौ । रीझ न याको माथौ हाल्यौ ॥
मूरख के आगे गुन गायौ । भैसा बीन बजाइ रिझायौ ॥
वृथा कमल थल माह लगायौ । ऊसरमें पानी बरसायौ ॥
खर के अंग सुगंध चढायौ । वायस को घनसार चुनायौ ॥
बधिर कानमें मंत्र सुनायौ । सूरदास कौं चित्र दिखायौ ॥
अविवेकी कौं सेई कै, को न हियै पछिताइ ॥
बीजा बवै बबूर के, कहा दाख फल खाइ ॥ ३ ॥

हे अविचारी लोक माझे हितकर आहेत असें समजून, मीं त्यांची सेवा केली, त्याबद्दल कोणता फायदा झाला सांगा ! त्याचें फल मला असें मिळालें कीं, त्याचे योगानें मी गोत्यांत आलों. मी तर क्षात्रधर्म पाळला, परंतु त्याची तारीफ करण्यांत नबाबाचें डोकें हललें नाहीं. मूर्खाचे पुढें मीं गुण गाइले. बीन वाजवून रेड्याला रिझविलें. कमलवेल भूमीवर आणून उगाच लाविली. नापीक जमिनीवर पाऊस पाडिला. गाढवाच्या अंगाला सुंगध चोळला. कावळ्याचे पुढें कापूर फेकला. बहिऱ्याच्या कानांत मंत्र म्हणून दाखविले. आंधळ्याला चित्र दाखविलें. अशा अविचारी लोकांची सेवा केली, त्याबद्दल अंतःकरणांत कोण पश्चात्ताप पावणार नाहीं ! बाभळीचें बीं रुजत घालून द्राक्षें कशीं खाण्यास मिळावीं ! !

हिंदू तुरक दीन द्वै गाये । तिनसौं बैर सदा चलि आये ॥
लेखौ सुर असुरन कौं जैसौ । केहरि करिन बखान्यौ तैसौ ॥
जब ते साह तखतपर बैठे । तब ते हिंदु न सौं उर ऐंठे ॥
महँगे कर तीरथ नि लगाये । बेद देवाले निदर ढहाये ॥
घर घर बाँधि जंजिया लीनैं । अपनै मन भाये सब कीनै ॥
सब रजपूत सांसि नित नावै । ऐड करे नित पैदल धावै ॥
ऐड एक सिवराज निबाही । करै अपने चित की चाही ॥
आठ पातसाही झुक झौरे । सुबनि बाँधि डाँड लै छौरे ॥
ऐसे गुन सिवराज के । बसे चित्र में आइ
मिलिवोई मन में धर्‍यो । मनसि मत ज्यौ बनाइ ॥ ४ ॥

हिंदु व तुर्क या धर्मांत सदैव वैर चालत असल्याचें सांगतात. तें वैर सुरासुरांसारखें

अथवा सिंह—हत्तींच्यासारखें वर्णितात. जेव्हां औरंगशहा तख्तावर बसला, तेव्हां हिंदूंचीं अंतःकरणें दुःखित झालीं. तीर्थांवर त्यानें जबर कर लादले. वेदांचा अपमान करून, मंदिरें जमीनदोस्त केलीं. दर घरास जिझिया कर बांधून तो वसूल केला. मनांत आलें, तें सर्व त्यानें केलें. सर्व रजपूत आपलें शीर त्याजपुढें दररोज नमवितात. त्यांस वाहनाशिवाय पायीं धावणें भाग पडतें. फक्त एक शिवराजाचा निश्चय कीं तो आपल्या मनाजोगतें करणार! आठ पातशाह्या त्यानें झुलवून सोडिल्या. सुभ्यांना बांधून दंड घेऊन सोडिलें. असे हे शिवराजाचे गुण माझ्या मनांत बसून राहिले आहेत. म्हणूनच मीं ते चित्तांत सांठवून मोगल मनसब सर्वथैव टाकून दिली.

इतहि पातसाही सब झूमै । उतहि सिवा के दलमें धूमै ॥
इतकौ उतहि जान नहिं पावै । जो निकसै सो सीस गँवावै ॥
तहाँ जान छत्रसाल विचार्‍यो । ब्योंत सिकार खेल कौ डार्‍यो ॥
सुभट संग पटरानी लीन्ही । दुरगम गिरिन बसेरे कीन्ही ॥
भोर चले सूरज दै बाये । दच्छिन दैहि अस्तगिरि आये ॥
निसिमें नक्षत्रनि चलै, दिनमें भानु विचारि ।
लाग दैहि सब साथ कौ, रोज मृगनि कौं मारि ॥ ५ ॥

इकडे सर्व पातशाहीचा तळ पडला आहे; तिकडे शिवाजीच्या फौजा गर्जना करीत आहेत. इकडून तिकडे कोणी जाऊं शकत नाहीं. जो जाईल, त्याचें शीर गेलेंच म्हणून समजावें. परंतु पातशाही लष्करांतून शिवाजीकडे जाण्याचा छत्रसालानें निश्चय केला; आणि शिकारीस जाण्याच्या बहाण्यानें त्यानें आपला बेत ठरविला. ( शिवाजीच्या भेटीस उत्तरेकडून दक्षिणेकडे ) छत्रसाल जात असतां सकाळच्या वेळीं डावे बाजूचा सूर्य, दिवसा शिरोगामी सूर्य, व सायंकाळीं अस्ताचलाकडील उजवे बाजूचा सूर्य, रात्रीं नक्षत्रें हे त्याचे मार्गदर्शक झाले. जंगलांतील श्वापदें मारून त्यानें बरोबरच्या सर्वांस अन्न पुरविलें.

घाटी नकी गिरिन की ठाढी । देखी तहाँ भीमरा बाढी ॥
तरे बाँधि काठन के भेरा । परे पार के बन में डेरा ॥
कृष्णा बढी देख के त्यौंही । उतरे पार भीमरा ज्यौंही ॥
उतरि पार सिवराज निहारे । सबकै भये अचंभे भारे ॥

तहँ सिवराज सील अति बाढे । देखत भये दूर तै ठाढै ।।
कुसल बूझि ढिग ही बैठारे । कैसे पहुँचे वीर छतोरे ।।
कही किसा अपनी तब जैसी । चितु दै सुनि सिवा सब तैसी ।।६।।

खोल दऱ्याखोरीं ओलांडल्यावर पुढें भीमानदी भरून चाललेली त्याला लागली. लांकडांचे तराफे बांधून, तो नदीपार जाऊन तंबूंत राहिला. पुढें जातां त्याला कृष्णा नदी भरून चाललेली लागली. तिच्याही पार गेल्यावर पलीकडे शिवराजाची छावणी दिसली. सर्वांना अतिशय अचंबा वाटला. त्या वेळीं शिवाजीनें त्याचा उत्तम सत्कार केला. दुरून दृष्टीस पडतांच शिवाजी उठून उभा राहिला. कुशल विचारून त्यास जवळ बसविलें. "अहो वीर छत्रसाल तुम्ही इकडे कोणीकडे आलां ! आपली सर्व इत्थंभूत हकीकत सांगा." शिवाजीनें सर्व वृत्त चित्त देऊन ऐकिलें.

सिवा किसा सुनि कैकही, तुम छत्री सिरताज ।
जीत आपनी भूम कौ , करौ देशकौ राज ।।
करौ देश कौ राज छतोरे । हम तुमतैं कबहूँ नहिं न्यारे ।।
दौरि देस मुगलनके मारौ । दबटि दिली के दल संहारौ ।।
तुरकन की परतीत न मानौ । तुम केहरि तुरकन गज जानौ ।।
तुरकन में न विवेक विलोक्यौ । मिलन गये उनकौ तुम रोक्यौ ।।
हमको भई सहाइ भवानी । भय नहि मुगलन की मन मानी ।।
छलबल निकसि देश में आये । अब हम पै उमराइ पठाये ।।
हम तुरकन पर कसी कृपानी । मारि करैंगे कीचक धानी ।।
तुम हू जाइं देस दल जोरौ । तुरक मारि तरवारनि तोरौ ।।
राखि हियै व्रजनाथ कौ, हाथ लेउ करवार ।
ये रक्षा करि हैं सदा, यह जानौ निरधार ।। ७ ।।

हकीकत ऐकून शिवा बोलतात, " तुम्ही क्षत्रियांचे मुकुटमणि ! तुम्ही जाऊन आपली मायभूमि जिंका; आणि स्वदेशावर राज्य करा. तुमच्यापासून आम्ही बिलकूल निराळे नाहीं. मोगलांचे प्रदेश मारून जिंका. त्यांच्या दलसंहारांना देशोधडीस लावा. तुर्कांचा विश्वास बिलकुल धरूं नका. तुम्ही सिंह व तुर्क हे गज, असें माना. तुर्कांच्या ठिकाणीं विवेक कसा तो कोणीं पाहिलाच नाहीं. तुम्ही भेटीस गेलां, तर

ते तुम्हांस अडवितात. मला देवी भवानी सहाय आहे, म्हणून मोगलांचें भय मला बिलकुल वाटत नाहीं. ते कपटबलानें या देशांत आले, त्यांस काढून द्या. आमच्या-वर त्यांनीं उमराव पाठविले आहेत. तुर्कांच्या वर माझी तरवार उघडलेली आहे. कीचकाप्रमाणें आपण त्यांचा संहार करावा. तुम्ही स्वदेशीं जाऊन आपल्या फौजा जमवा. तुर्कांस मारण्यांत तरवारी तोडून घ्या. अंतःकरणांत व्रजनाथ श्रीकृष्ण सांठवून ठेवा, आणि घ्या हातांत तरवार! तोच सर्वांचें संरक्षण करणारा आहे, हा निर्धार असूं द्या. !

छत्रनिकी यह वृत्त बनाई । सया तेग की खाइ कमाई ॥
गाई वेद बिप्रन प्रतिपाले । घाउ एड धारिन पै घाले ॥
तेग धार में जौ तन छूटै । तौ रवि भेद मुकत सुख लूटै ॥
जैत पत्र जौरन में पावै । तौ पुहुमी के नाथ कहावै ॥
तुम हौ महावीर मरदानै । करिहो भूमिभोग हम जाने ॥
जौ इतही तुमकौ हम राखैं । तौ सब सुजस हमारे भाखैं ॥
तातै जाइ मुगल दल मारौ । सुनिये श्रवननि सुजस तिहारो ॥
यह कहि तेग मँगाइ बँधाइ । बीर बदन दूनी दुति आई ॥
आदर सों कीन्हें बिदा, सिवा भूप सुख पाइ ।
मिली मनो उर उमगमें, भूमि भावती आइ ॥ ८ ॥

क्षत्रियांची ही वृत्तिच बनलेली आहे कीं, सदैव तरवारीनें कमावून खावें. गाई, वेद, विप्रांचा प्रतिपाळ करावा, आण भाक घेऊन शत्रूंना जखमा कराव्या. तरवार धरीत असतां जरी शरीर पडलें तरी सूर्यमंडळ–भेदाचें पुण्य लाभतें. रणांत ज्यास अजिंक्य–पत्र मिळतें, त्यालाच पृथ्वीचा नाथ म्हणतात. तुम्ही महावीर मर्दाने आहां, राज्योपभोग घ्याल, ही मला खात्री आहे. तुम्हांला जर मी येथेंच माझे नोकरींत ठेवून घेतलें, तर सर्व कीर्तीचा वांटा मजकडेच येईल, तुम्हांस कांहीं मिळ-णार नाहीं. म्हणून जा, आणि मोगल फौजा मारा. तुमचें सुयश ( माझे ) कान ऐकोत ". असें म्हणून शिवाजी राजानें छत्रसालाचे कंबरेस तरवार बांधिली. त्याबरो-बर त्या वीराच्या तोंडावर नवीनच तेज चमकूं लागलें. अशा रीतीनें शिवाजीनें त्याला बिदा केलें ! शिवाजीलाही आनंद झाला. जणूं काय उभयतांच्या अंतःकर-णांचा मिलाफ झाला, आणि त्यांस मना जोगतें राज्य प्राप्त झालें !

---

Photo of the Marble Bust of Shri Shivaji installed at
Shri Shivaji Mandir, Poona, in 1923.
Sculptor:- R. K. Phadke, Bombay.

PHOTO PRINTED AT SHREE LAXMI-NARAYAN PRESS, BOMBAY NO. 2

## शिवाजीचें जयसिंगास पत्र.

मीर्झा राजा जयसिंग स. १६६५ त औरंगजेबाच्या हुकमानें शिवाजीवर चालून आला आणि एप्रिल महिन्यांत त्यानें पुरंदरास वेढा घातला. तेव्हां शिवाजीनें त्याजबरोबर तहाची वाटाघाट चालविली, त्या वेळीं जो पत्रव्यवहार झाला असेल त्यास अनुलक्षून खालील फारसी पत्र सुंदर कवनांत कोणी विद्वान् लेखकानें तयार केलें तें प्रथम नागरी प्रचारिणी पत्रिकेंत ( भा. ३ अं. २ श्रावण संवत् १९७९ ) प्रसिद्ध झालें, तेंच या शिवकालीन पत्रव्यवहारांत ऐतिहासिक उपयोगाच्या दृष्टीनें दाखल केलें आहे. यांतील कविता उच्च दर्जाची असून, त्या वेळीं घडलेल्या गोष्टींचा अनुवाद साररूपानें त्यांत उतरला आहे, हें सहज दिसून येईल. पत्राचें इंग्रजी भाषांतरही पहिल्या भागांत दिलें आहे. काव्य हें केव्हांही खरा इतिहास समजतां येणार नाहीं, तरी भूषणाची किंवा लाल कवीचीं कवनें किंवा आपल्याकडील पोवाडे वगैरेंत तत्कालीन परिस्थिति उतरलेली असते, हें ध्यानांत ठेविलें म्हणजे अशा वाङ्मयाचाही इतिहासास थोडा बहुत उपयोग झाल्याशिवाय राहत नाहीं.

सन १६६६ च्या ऑगस्टांत आग्रा येथील बादशाही अटकेंतून शिवाजी निसटून गेल्यानें जयसिंगावर बादशहाची इतराजी झाली आणि तो पुढें लवकरच ता. २–७–१६६७ रोजीं बऱ्हाणपुर येथें अप्रतिष्ठेंत मरण पावला.

गो. स. स.

---

## शिवाजीचें जयसिंगास पत्र.

**१ सरे सर्वराँ राजाए राजगाँ । चमनबंद बुस्ताने हिं दोसताँ ॥**

ए सर्दारों के सर्दार, राजाओं के राजा [ तथा ] भारतोद्यानकी की कियारियों के व्यवस्थापक ।

**२ जिगर् बंद फर्जानए रामचंद । जे तो गर्दने राजपूताँ बुलंद ॥**

ए रामचंद्र के चैतन्य हृदयांश, तुझसे राजपूतों की ग्रीवा उन्नत है ॥

**३ कवीतर जे तो दौलते बाबरी । जे बख्ते हुमायूँ तुरा यावरी ॥**

तुझसे बाबरवंश की राज्यलक्ष्मी अधिक प्रबल हो रही है [ तथा ] शुभ भाग्य से तुझसे सहायता [ मिलती ] है ।

**४ जवाँ बख्त जैशाह बा राय पीर। जे सेवा सलामो दरूदे पिजीर॥**

ए जवान ( प्रबल ) भाग्य [ तथा ] वृद्ध ( प्रौढ ) बुद्धि वाले जयशाह, सेवा ( अर्थात् शिवा ) का प्रमाण तथा आशिष स्वीकृत कर।

**५ जहाँ आफरीनत निगहदार बाद। तुरा रहनुमायद सुरा दीनो दाद॥**

जगत् का जनक तेरा रक्षक हो [तथा] तुझको धर्म एवं न्याय का मार्ग दिखावै।

**६ शनीदम कि बर कस्दे मन् आमदी। बफतहे दयारे दकिन आमदी॥**

मैंने सुना है कि तू मुझपर आक्रमण करने [ एवं ] दक्षिण प्रांत को विजय करने आया है।

**७ जे खूने दिलो दीदए हिंदुआँ। तु ख्वाही शवी सुर्खरू दर जहाँ॥**

हिंदुओं के हृदय तथा आँखों के रक्तसे तू संसार में लाल मुँहवाला ( यशस्वी ) हुआ चाहता है॥

**८ न दानी मगर कीं सियाही शवद। कजीं मुल्को दीं रा तबाही शवद॥**

पर तू यह नहीं जानता कि यह [ तेरे मुँह पर ] कालख लग रही है क्योंकि इससे देश तथा धर्म को आपत्ति हो रही है॥

**९ अगर सर दमे दर गरेबाँ कुनी। चु नज्जारए दस्तो दामाँ कुनी॥**

यदि तू क्षणमात्र गरेबान में सिर डाले ( संकुचित होकर विचार करे ) और यदि तू अपने हाथ और दामन पर ( विवेक ) दृष्टि करे।

**१० बबीनी कि ईं रंग अज खून कीस्त। कि दर दो जहाँ रंग ईं रंग चीस्त॥**

तो तू देखे कि यह रंग किसके खून का है और इस रंग का ( वास्तविक ) रंग दोनों लोक में क्या है [ लाल या काला ]।

**११ तु खुद आमदी गर बफतहे दकिन। शुदे फर्शे राहत सरो चश्मे मन॥**

यदि तू स्वयं [ अपनी ओर से ] दक्षिण विजय करने आता [ तो ] मेरे सिर और आँख तेरे रास्ते के बिछौने बन जाते।

**१२ शुदम हमरकावत बफौजे गराँ। सुपुर्दम बतो अज कराँ ता कराँ॥**

मेरे तेरे हमरकाब ( घोड़े के साथ ) बड़ी सेना लेकर चलता ( और ) एक सिरं से दूसरे सिरे तक ( भूमि ) तुझे सौंप देता ( विजय करा देता )।

**१३ वले तू जे औरंगजेब आमदी । बइग़्वाय जाहिद फरेबं आमदी ॥**

पर तू तो औरंगजेब की ओर; से ( उस ) भद्रजनों के धोखा देनेवाले के बहकाने में पड़कर आया है ।

**१४ नदानम् कुनूँ चूँ बबाजम् बतो । न मर्दी बुवद् गर बसाजम् बतो ॥**

अब मैं नहीं जानता कि तेरे साथ कौन खेल खेलूँ । [ अब ] यदि मैं तुझसे मिल जाऊं तो यह मर्दी ( पुरुषत्व ) नहीं है ।

**१५ कि मर्दां न दौराँ निवाजी कुनंद् । हिजब्रां न रूबाहबाजी कुनंद् ॥**

क्योंकि पुरुषलोग समयकी सेवा नहीं करते । सिंह लोमड़ीपना नहीं करते ।

**१६ वगर चारः साजम बतेगो तबर । दो जानिब रसद हिंदुआँ रा जरर ॥**

और अगर में तलवार तथा कुठार से काम लेता हूँ तो दोनों ओर हिंदुओं को ही हानि पहुँचती है ।

**१७ दरेगा कि तेगम जेहद अज मियाँ । जुज अजबन्हे खूं खुर्दने मुस्लिमाँ ॥**

बडा खेद तो यह है कि मुसलमानों के खून पीने के अतिरिक्त किसी अन्य कार्य के निमित्त मेरी तलवार को मियान से निकलना पडे ।

**१८ चु तुर्का बदीं कारजार आमदे । बरे शेर मर्दां शिकार आमदे ।**

यदि इस लडाई कि लिए तुर्क आए होते तो [ हम ] शेरमर्दों के निमित्त [ घर बैठे ] शिकार आए होते ।

**१९ वले आँ सियहकारे बे दादो दीं । क़ि देवस्त दर सूरते आदमीं ॥**

पर वह न्याय तथा धर्म से वंचित पापी जो कि मनुष्य के रूप में राक्षस है ।

**२० चु फज्ले जे अफजल नयामद पदीद । न शाइस्तःकारी जे शाइस्तःदीद ॥**

जब अफजल खाँ से कोई श्रेष्ठता न प्रकट हुई [ और ] न शाइस्तः खाँ की कोई योग्यता देखी ।

**२१ तुरा बरगुमारद पए जंगे मा । कि दारद न खुद ताबे आह्नंगे मा ॥**

[ तो ] तुभको हमारे युद्ध के निमित्त नियत करता है क्यों कि वह स्वयं तो हमारे आक्रमण के सहने की योग्यता रखता नहीं ।

**२२ बख्वाहद कि अज जुम्रए हिंदुआँ । न मानद कवीपंजए दर जहाँ ॥**

[ वह ] चाहता है कि हिंदुओं के दल में कोई बलशाली संसार में न रह जाय

**२३ बहम कुश्तःओ खस्तः शेराँ शवंद । शिगालाँ हिजब्रे नयस्ताँ शवंद ॥**

सिंहगण आपस ही में [ लड भिड कर ] घायल तथा श्रांत हो जायँ जिसमें कि गीदड जंगल के सिंह बन बैठें ।

**२४ न ईं राज चूँ दर सर आयद तुरा । फुसूनश मगर बर गिरायद तुरा ॥**

यह गुप्त भेद तेरे सिर में क्यों नहीं पैठता । प्रतीत होता है कि उसका जादू तुझे बहकाए रहता है ।

**२५ बसे नेको बद दर जहाँ दीदई । गुलोखार अज बोस्ताँ चीदई ॥**

तैंने संसार में बहुत भला बुरा देखा है । उद्यान से तैंने फूल और काँटे दोनों संचित किए हैं ।

**२६ न बायद कि बामा नबर्द आवरी । सरे हिंदुआँ जेरे गर्द आवरी ॥**

यह नहीं चाहिए कि तू हम लोगों से युद्ध करे [ और ] हिंदुओं के सिरों को धूल में मिलावे ।

**२७ बदीं पुख्तःकारी जवानी मकुन । जे सादी मगर यादगीर ईं स खुन ॥**

ऐसी परिपक्क कर्मण्यता [ प्राप्त होने ] पर भी जवानी ( यौवनोचित कार्य ) मत कर, प्रत्युत सादी के इस कथन को स्मरण कर—

**२८ न हरजा मुरक्कब तवाँ ताखतन । कि जाहा सिपर बायद अंदाखतन ॥**

सब स्थानों पर घोडा नहीं दौडाया जाता । कहीं कहीं ढाल भी फेंककर भागना उचित होता है ।

**२९ पलंगाँ बगोराँ पलंगी कुनंद । न बाजैगमाँ खानःजंगी कुनंद ॥**

व्याघ्र मृगादि पर व्याघ्रता करते हैं । सिंहों के साथ गृहयुद्ध में नहीं प्रवृत्त होते ।

**३० चु आबस्त दर तेगे बुर्राने तो । चु ताबस्त दर अस्पे जौलाने तो ॥**

यदि तेरी काटनेवाली तरवार में पानी है; यदि तेरे कूदनेवाले घोडे में दम है ॥

**३१ ब बायद कि बर दुश्मने दीं जनी । बुनो बेखे इस्लाम रा बरकनी ॥**

[ तो ] तुझको चाहिए कि धर्म के शत्रु पर आक्रमण करे [ एवं ] इसलाम की जड मूल खोद डाले ।

**३२ अगर दावरे मुल्क दारा बुदे । बमा नीज लुत्फो मदारा बुदे ॥**

अगर देश का राजा दारा शिकोह होता । तो हम लोगों के साथ भी कृपा तथा अनुग्रह के बर्ताव होते ।

**३३ वले तू बजसवंत दादी फरेब । ब दिल दर न कर्दी फराजो नशेब ॥**

पर तूने जसवंतसिंह को धोखा दिया [ तथा ] हृदय में ऊँच नीच नहीं सोचा।

**३४ जेरूबाहबाजी न सेर आमदी । बजं गे हिजब्राँ दिलेर आमदी ॥**

तू लोमडी का खेल खेलकर अभी अघाया नहीं है [ और ] सिंहों से युद्ध के निमित्त ढिठाई करके आया है ।

**३५ अजीं तुर्कताजी चे आयाद तुरा । हबायत सुराबे नुमायद तुरा ॥**

तुझको इस दौड धूप से क्या मिलता है, तेरी तृष्णा तुझे मृगतृष्णा दिखलाती है !

**३६ बदाँ सिफ्लःमानी कि जेहद बरद । उरूसे बचंगाल खे श आवरद ॥**

तू उस तुच्छ व्यक्ति के सदृश है जो कि बहुत श्रम करता है [ और ] किसी सुंदरी को अपने हाथ में लाता है ।

**३७ वले बर न अज बागे हुस्नश खुरद । बरस्ते हरीफे वरा बसपुरद ॥**

पर उसकी सौंदर्यवाटिका का फल स्वयं नहीं खाता [ प्रत्युत ] उसको अपने प्रतिद्वंदी के हाथ में सौंप देता है ।

**३८ चि नाजी तु बर मेहे आँ नाबकार । बदानी सरंजामे कारे जुझार ॥**

तू उस नीच की कृपा कर क्या अभिमान करता है । तू जुझारसिंह को काम का परिणाम जानता है ।

**३९. बदानी कि बर बच्चए छत्रसाल । चेसाँ ख्वास्त ओ ता रसानद जवाल॥**

तू जानता है कि कुमार छत्रसाल पर वह किस प्रकार से आपत्ति पहुँचाना चाहता था ।

**४० बदानी कि बर हिंदुआने दिगर । नयामद चे अज दस्ते आँ कीनःवर॥**

तू जानता है कि दूसरे हिंदुँओ पर भी उस दुष्टके हाथ से क्या क्या विपत्तियाँ नहीँ आई ।

**४१ गिरफम् कि पैवंद बस्ती बदो । तु नामूस रा दर शिकस्ती बदो ॥**

मैंने मान लिया कि तैंने उससे संबध जोड लिया ह और कुल की मयादा उसके सिर तोडी है।

**४२ बराँ देव दामे अजीं रिश्तः चीस्त । कि महकम तर अज बंदे शल्वार नीस्त ॥**

[ पर ] उस राक्षस के निमित्त इस बंधन का जाल क्या वस्तु है क्योंकि यह बंधन तो इजारबंद से अधिक दृढ नहीं है ।

**४३ पए कामे खुद ऊ न दारद हजर। जे ख़ूने बिरादर जे जाने पिदर॥**

वह ता अपने इष्ट साधन के निमित्त भाई के रक्त [ तथा ] बाप के प्राण से भी नहीं डरता।

**४४ जे पासे वफा गर बदानी सखुन। चि कर्दी बशाहेजहाँ याद कुन॥**

यदि तू राजभक्ति की दोहाई दे तो तू यह तो स्मरण कर कि तैंने शाहजहाँ के साथ क्या बर्ताव किया।

**४५ अगर बहरःदारी जे फर्जानगी। जनी लाफे मर्दी ओ मर्दानगी॥**

यदि तुझको विधाता के यहाँ से बुद्धि का कुछ भाग मिला है [ और ] त पौरुष तथा पुरुषत्व की बड मारता है।

**४६ जे सोजे वतन तेग रा ताब् देह। जे अश्के सितम दीदःगाँ आब देह॥**

तो तू अपनी जन्मभूमि के संताप से तलवार को तपावे [ तथा ] अत्याचार से दुखियों के आँसू से [ उसपर ] पानी दे।

**४७ न मारा वहम् वक्ते पैकार हस्त। कि बर हिंदुआँ कार दुश्वार हस्त॥**

यह अवसर हम लोगों के आपस में लडने का नहीं है क्योंकि हिंदुओं पर [ इस समय ] बडा कठिन कार्य पडा है।

**४८ जनो बच्चओ मुल्को इमलाके मा। बूतो माबिदो आबिदे पाके मा॥**

हमारे लडके बाले, देश, धन, देव, देवालय तथा पवित्र देव पूजक—

**४९ हमः रा तबाहीस्त अज कारे ऊ। बजाए रसीदस्त आ जारे ऊ॥**

इन सब पर उसके काम से आपत्ति पड रही है। [ तथा ] उसका दुःख सीमा तक पहुँच गया है।

**५० कि चंदे चु कारश बमानद चुनीं। निशाने न मानद जे मा बर जमीं॥**

कि यदि कुछ दिन तक उसका काम ऐसाही चलता रहा [ तो ] हम लोगों का कोई चिह्न [ भी ] पृथ्वी पर न रह जायगा।

**५१ तअज्जुब कि इक दस्तए मुस्लिमाँ। बरीं पहन मुल्कम् शवद हुक्मराँ॥**

बडे आश्चर्य की बात है कि एक मुट्ठी भर मुसलमान हमारे [ इतने ] बडे इस देश पर प्रभुता जमावें।

**५१ न ई चीरःदस्ती जे मर्दानगीस्त। बबीं गर तुरा चश्मे फ जानगीस्त॥**

यह प्रबलता [ कुछ ] पुरुषार्थ के कारण नहीं है। यदि तुझको समझ की आँख है तो देख।

**५३ चसाँ ऊ बमा मोऱ्हबाजी कुनद। चसाँ बर रुख्श रंगसाजी कुनद॥**

[ कि ] वह हमारे साथ कैसी गोटियाचाली करता है और अपने मुँह पर कैसा कैसा रंग रँगता है।

**५४ कशाद् पाय मारा ब जंजीरेमा। बबुर्रद् सरेमा व शमशीरे मा॥**

हमारो पावों को हमारी ही साँकलों मे जकड देता है [ तथा ] हमारे सिरों को हमारी ही तलवारों से काटता है।

**५५ मरा जहद बायद फरावाँ नमूद। पए हिंदुओ हिंदो दीने हुनूद॥**

हम लोगों को [ इस समय ] हिंदू, हिंदोस्तान तथा हिंदू धर्म [ की रक्षा ] के निमित्त बहुत अधिक यत्न करना चाहिए।

**५६ बबायद कि कोशेमो राये जनेम्। पए मुल्के खुद दस्तो पाये जनेम्॥**

हमको चाहिए कि यत्न करें और कोई राय स्थिर करें [ तथा ] अपने देश के लिये खूब हाथ पाँव मारें!

**५७ ब शमशीरो तदबीर आबे दहेम। बतुर्काँ ब तुर्की जवाबे दहेम॥**

तलवार पर और तदबीर पर पानी दें [ अर्थात् उन्हें चमकावें और ] तुर्कों को जवाब तुर्की में ( जैसे का तैसा ) दें।

**५८ ब जसवंत गर तू मुवाफिक शवी। ब दिल दर्पए आँ मुनाफिक शवी।**

यदि तू जसवंतसिंह से मिल जाय और हृदय से उस कपट कलेवर के पैंडे पड जाय।

**५९ ब राना दमी हमदमे हमदमी। बे बायद कि कारे बर आयद हमी॥**

[ तथा ] राना से भी तू एकता का व्यवहार करले तो आशा है कि बडा काम निकल जाय।

**६० जे हर्सू बता जेदो जंग आवरेद। सरे माररा जेरे संग आवरेद॥**

चारों तरफ से धावा करके तुम लोग युद्ध करो। उस साँप के सिर का पत्थर के नीचे दबा लो ( कुचल डालो )।

**६१ कि चंदे व पेचद बर अंजामे खेश। नेयारद बमुल्के दकिन दाम खेश॥**

कि कुछ दिनों तक वह अपने ही परिणाम के सोच में पडा रहै [ आर ] दक्षिण प्रांत की ओर अपना जाल न फैलावे।

**६२ मन ईं सू ब मर्दाने नेजःगुजार। अजीं हर दो शाहाँ बर आरम दमार॥**

[ और ] मैं इस ओर भाला चलाने वाले बीरों के साथ इन दोनों बादशाहों का भेजा निकाल लूँ।

**६३ ब अफवाजे गुरिंदा मानिंदे मेग। बेबारम अबर मुस्लिमाँ आबे तेग॥**

मेघों की भाँति गरजने वाली सेना से मुसलमानों पर तलवार का पानी बरसाऊँ।

**६४ ब शोयम् जे इसलाम नामो निशाँ। जे लौहे दकिन अजकराँ ताकराँ॥**

दक्षिण देश के पटल पर से एक सिरे से दूसरे सिरे तक इस्लाम का नाम तथा चिह्न धो डालूं।

**६५ अजाँ पस् ब मर्दाने पैमूदःकर। बजंगी सवाराने नेजःगुजार॥**

इसके पश्चात् कार्यदक्ष शूरों तथा भाला चलानेवाले सवारों के साथ।

**६६ चु दरियाय पुर शोरिशो मौजजन। बर आयम ब मैदाँ जे कोहे दकिन॥**

लहरें लेती हुई तथा कोलाहल मचाती हुई नदी की भाँति दक्षिण के पहाडों से निकल कर मैदान में आऊं।

**६७ शवम जूदतर हमरकाबे शुमा। अजो बाज पुर्सम हिसाबे शुमा॥**

और अत्यंत शीघ्र तुम लोगों की सेवा में उपस्थित हूँ और फिर उससे तुम लोगों का हिसाब पुछूं।

**६८ जे हर चार सू सख्त जंग आवरेम। बरो अर्सए जंग तंग आवरेम॥**

[ फिर हम लोग ] चारों ओर से घोर युद्ध उपस्थित करें और लडाई का मैदान उसके निमित्त संकीर्ण कर दें।

**६९ बदेहली रसानेम अफवाजरा। बदाँ खानए खस्तः अमवाजरा॥**

हम लोग अपनी सेनाओँ की तरंगों को, दिल्ली में, उस जर्जरीभूत घर में, पहुंचा दें।

**७० जे नामश् न औरंग मानद न जेब। न तेगे तअद्दी न दामे फरेब॥**

उसके नाम में से न तो औरंग ( राजसिंहासन ) रह जाय और न जेब ( शोभा ) न उसकी अत्याचार की तलवार [ रह जाय ] न कपट का जाल।

**७१ बरारेम जूए पुर अज खूने नाब। बरूहे बुजुर्गां रसानेम आब॥**

हम लोग शुद्ध रक्त से भरा हुइ एक नदी बहा दें [ और उस से ] अपने पितरों की आत्माओं का तर्पण करें।

**७२ बनैरूप दादारे जाँ आफरीं । बसाजेम जायश बजेरे जमीं ॥**

न्यायपरायण प्राणों के उत्पन्न करनेवाले ( ईश्वर ) की सहायता से हम लोग उसका स्थान पृथ्वी के नीचे ( कब्र में ) बना दें ।

**७३ नई कार बिसियार दुशवार हस्त । दिलो दीदओ दस्त दर्कार हस्त ॥**

यह काम [ कुछ ] बहुत कठिन नहीं है । [ केवल यथोचित ] हृदय, आँख तथा हाथ की आवश्यकता ह ।

**७४ दो दिल यक शवद् बेशकुनद कोहरा । परागंदगी आरव अंबोहरा ॥**

दो हृदय ( यदि ) एक हो जायँ तो पहाड को तोड सकते हैं [ तथा ] समूह के समूह को तितिर बितिर कर दे सकते हैं ।

**७५ अर्जी दर भरा गुफ्लनाही बसेस्त । कि दर् नामः आवुर्दनश राय नेस्त॥**

इस विषय में मुझको तुझसे बहुत कुछ कहना [ सुनना ] है, जिसका पत्र में लाना ( लिखना ) [ युक्ति ] सम्मत नहीं है ।

**७६ बख्वाहम कि रानेम बाहम सखुन । ने यारेम बे सूद रंजो मेहन ॥**

मैं चाहता हूँ कि हम लोंग परस्पर बात चीत करलें जिसमें कि व्यर्थ दुःख तथा श्रम न झेलें ।

**७७ चु ख्वाही बे आयम बदीदारे तो । बगोश आवरम राजे गुफ्तारे तो॥**

यदि तू चाहे तो मे तुझसे साक्षात् करने आऊँ । [ और ] तेरी बातों का भेद श्रवणगोचर करूँ ।

**७८ बखल्वत कुशायेम रूए सखुन । कशम शानः बर पेचे मूए सखुन ॥**

हम लोग बात रूपी सुंदरी का मुख एकांत में खोलें [ और ] मैं उसके बालों के उलझन पर कंघी फेरूं ।

**७९ ब दामाने तदबीर दस्त आवरेम । फुसूने बराँ देव मस्त आवरेम ॥**

यत्न के दामन पर हाथ धरें । [ और ] उस उन्मत्त राक्षस पर कोई मंत्र चलावें ।

**८० तराजे म राहे सुए कामे ख्वेश । फराजेम दर दो जहाँ नामे ख्वेश ॥**

अपने कार्य की [ सिद्धि ] की ओर का कोई रास्ता निकालें [ और ] दोनों लोंकों ( इहलोक तथा परलोक ) में अपना नाम ऊँचा करें ।

**८१ बतेगो बअस्पो बमुल्को बदीं । कि हर्गिज गजंदत न आयद अजीं ॥**

तलवार की शपथ, घोडे की शपथ, देश की शपथ तथा धर्म की शपथ करता हूँ कि इससे तुझपर कदापि [ कोई ] आपत्ति नहीं आवेगी ।

**८२ जे अंजामे अफजल मशौ बद्गुमाँ। कि ओरा न बुद रास्ती दरमियाँ ॥**

अफजल खाँ से परिणाम से तू शंकित मत हो क्योंकि उसमें सचाई नहीं थी।

**८३ जे जंगी सवाराने परखाशजू। हजारो दो सद दर कमीं दाश्त ऊ ॥**

बारह सौ बडे लडाके हब्शी सवार वह मेरे लिये घात में लगाए हुए था।

**८४ अगर पेश दस्ती न कर्दम बरो। कि ईं नामः अकनूँ नविश्ते बतो ॥**

यदि मैं उसपर पहिले ही हाथ न फेरता तो इस समय यह पत्र तुझको कौन लिखता।

**८५ मरा बातो चश्मे चुनीं कार नेस्त। तुरा खुद बमन नीज पैकार नेस्त॥**

[ पर ] मुझको तुझसे ऐसे काम की आशा नहीं है [ क्योंकि ] तुझको भी स्वयं मुझसे कोई शत्रुता नहीं है।

**८६ जवाबत बयाबम् अगर बाशवाब। शब आयम् ब पेशे तनहा शिताब ॥**

यदि मैं तेरा उत्तर यथेष्ट पाऊँ तो तेरे समक्ष रात्रि को अकेला आऊँ।

**८७ नुमायम् बतो नामःहाए निहाँ। कि बगिरफ़्तम अज जेबे शायस्तःखां॥**

मैं तुझको वे गुप्त पत्र दिखाऊं जोकि मैंने शाइस्तः खां के जेब से निकाल लिए थे।

**८८ जनम आबे अंदेशः बर दीदः अत। कुनम् दूर ख्वाबे पसंदीदः अत ॥**

तेरी आँखों पर मैं संशय का जल छिडकूँ ( और ) तेरी सुखनिद्रा को दूर करूँ।

**८९ कुनम् रास्त ताबीर ख्वाबे तुरा। बजाँ पस बगीरम् जवाबे तुरा ॥**

तेरे स्वप्नका सच्चा सच्चा फलादेश करूँ ( और ) उसके पश्चात् तेरा जवाब लूँ।

**९० नयाबद चु ईं नामः इमजाजे तो। मनो तेग बुर्रानो अफवाजे तो ॥**

यदि यह पत्र तेरे मन के अनुकूल न पडे। ( तो फिर ) मैं हूं और काटने वाली तलवार तथा तेरी सेना।

**९१ चु खुर्शेद फर्दा कशद रू ब शाम्। हिलालम नेयाम अफनगद वस्स लाम**

कल जिस समय सूर्य अपना मुँह संध्या में छिपा लेगा। उस समय मेरा अर्धचंद्र ( खड्ग ) मियान को फेंक देगा ( मियान से निकल आवेगा )। बस, भला हो।

---

# शिवकालीन चरित्र-सूची

( श्यामसुंदर य० मराठे. )

**काल, स्थल व व्यक्ती** हीं तीन इतिहासाचीं प्रधान अंगें आहेत. या तीन अंगांचें परिशीलन पेशवाई पुरतें अलीकडे बरेंच स्पष्ट झालें आहे. तोच प्रकार वास्तविक शिवकालासंबंधानें झाला पाहिजे. त्यासाठीं अमुद्रित कागद सोडून दिले तरी, मुद्रित कागदां पुरती परिपूर्ण सूचि वरील तीन्ही बाबतींची अवश्य व्हावयास पाहिजे. तसा उपक्रम या त्रिशत—सांवत्सरिक—उत्सवाचे निमित्तानें निघणाऱ्या या ग्रंथांत करण्यांत आला आहे. **काला**संबंधानें जेधे—शकावलि, **स्थला**संबंधानें मराठशाहींतील किल्ले आणि **व्यक्ति**संबंधानें पुढें द्यावयाचीं चरित्रें, अशा मासल्यांचे तीन्ही भाग परिपूर्णपणें लक्षांत घेतले, तरच शिवकालीन इतिहास लिहिण्याची शक्यता प्राप्त होईल.

बरेचसे साधनग्रंथ वाचून शिवकालीन व्यक्तींची एक सूचि मीं बनविली. त्या सर्वांचीं चरित्रें मूळ आधारांसह याच पुस्तकांत वाचकांस देण्याचा माझा विचार होता. परंतु पुस्तक प्रसिद्धीस अवधि फार थोडा राहिल्यामुळें, हें काम संपूर्ण करितां आलें नाहीं. अशा स्थितींत सुमारें पाऊणशें चरित्रें तयार झालेलीं अभ्यासकांस थोडीं बहुत मार्गदर्शक होतील, अशा समजुतीनें पुढें दिलीं आहेत. सामान्यत: ज्या व्यक्ती इतिहासांत प्रसिद्ध गणल्या जातात, त्या मुद्दामच या यादींतून गाळिल्या आहेत. म्हणून एका अर्थानें या टिपणास “ अप्रसिद्ध व्यक्तींचीं अप्रसिद्ध चरित्रें ” असें नांव देतां येईल. याच धर्तीवर शिवकालीन व्यक्तींची संपूर्ण सूची त्यांच्या चरित्रांसह पुढें मागें वाचकांस देण्याची मी उमेद बाळगितों.

---

**अबदुल करीम ऊ० बुहलोल खान.**—हा मूळचा अफगाणिस्थानचा पठाण फिरत फिरत हिंदुस्थानांत आला. मोगल सरदार खान जहान याजकडे तो आश्रयार्थ गेला, तेव्हां त्यानें त्यास आपल्याजवळ ठेवून घेतलें. खान जहानची दक्षिणच्या सुभेदारीवर शहाजादा पर्वीझचा मदतनीस या नात्यानें स. १६०९ त नेमणूक झाली. त्याच वेळीं अबदुल करीम आपल्या धन्याबरोबर दक्षिणेंत आला. खानजहाननें पुढें बादशहा शहाजहान विरुद्ध बंड केलें. परंतु शहाजहानच्या सैन्यापुढें त्याचा टिकाव लागला नाहीं. तेव्हां तो विजापुरास आश्रयार्थ गेला. तेथें आश्रय न मिळाल्यामुळें

खान जहान इकडून तिकडे पळत सुटला, व अखेरीस उत्तरेंत कलिंजर येथें तो स. १६२९ त मारला गेला. खान जहानची उरली सुरली संपत्ति अबदुल करीमला मिळाली; आणि तो तडक विजापुर दरबारीं गेला. पूर्वी खानाबरोबर तो तेथें एकदां गेला होताच. दरबारनें त्याला बंकापूरचा नबाब नेमून त्याची कर्नाटकांत रवानगी केली. विजापुरच्या इतिहासांत तान क्रांतिकारक प्रसंग आले. एक, स. १६३६ चा. यांत शहाजहान व विजापुरकर यांच्या प्रदेशाच्या मर्यादा ठरल्या. दुसरा स. १६५६ चा. या सालीं १८ वर्षांचा अली आदिलशहा गादीवर आला; आणि कानडा, धारवाड, कर्णूल आणि बल्लारी येथील संस्थानिकांनीं याच वेळीं बंडाचा उठाव केला. पण वेळींच अबदुल महंमद हा कर्ता वजीर लाभल्यामुळें पुनःश्च स्थिरस्थावर झालें. तिसरा प्रसंग स. १६७२ चा. या वेळीं पठाण व दक्षिणी मुसलमान यांचा बेबनाव झाला, तरी आणखी पंधरा वर्षें आदिलशाहीचें आयुष्य शिल्लक होतें. असो. बहुधा या तीनही प्रसंगीं बहलोल खान हजर होता. तथापि पहिल्या वेळीं अगदीं नवशिका म्हणून व दुसऱ्या वेळीं असमर्थ म्हणून दोन्ही वेळीं बुहलोल खानास पुढें येण्यास वाव मिळाला नाहीं. मात्र शिवाजीच्या वाढत्या सत्तेस तोंड देण्यासाठीं अली आदिलशहाच्या कारकीर्दीत मिरज, पन्हाळा व कोंकणच्या सुभेदारीवर त्याची नेमणूक झाली; आणि त्याच वेळीं दरबारीं याचा चंचुप्रवेश झाला. दरबारांत मुसलमानांची दुफळी झाली होती. एक पठाण पक्ष व दुसरा दक्षिणी मुसलमानांचा पक्ष. मुख्य वजीर अब्दुल महंमद खंबीर होता, तोपर्यंत या पक्षांनीं आपली डोकीं वर काढलीं नव्हतीं.

शिवाय, जयसिंगाची मोहीम हें एक मोठेंच गंडांतर आल्यामुळें कांहीं काल या पक्षभेदांस पंख फुटले नाहींत. स. १६७२ त अली आदिलशहा मेला व चार वर्षांचा सिकंदर गादीवर आला. अबदुल महंमद या जुन्या व कर्त्या वजीरानें पूर्वीप्रमाणें कारभार करण्याचें नाकारलें. मात्र राज्याचे चार विभाग करून खवास खान, बुहलोलखान, मुजफरखान व खुद्द अबदुल महंमद यांनीं एकेक विभाग सांभाळावा असें ठरविलें. परंतु खवास खानानें सारी सत्ता आपणाकडे घेतली आणि खुद्द अबदुल महंमदासही धाब्यावर बसविलें. पक्षभेदास तोंड फुटलें. बुहलोल हा पठाण-पक्षाचा आणि खवासखान दक्षिणी पक्षाचा पुढारी होता. परंतु खवासखानाच्या हातीं अधिकार होता. खेरीज त्यानें दक्षिणचा मोगल सुभेदार बहादुरखान याच्याशीं सलोखा केला होता. स. १६७४ त शिवाजी कर्नाटकच्या स्वारीवर निघाला, तेव्हां दरबारच्या या उचापती टाकून बुहलोलखानास सैन्य घेऊन बाहेर पडावें लागलें.

त्या अवकाशात शिवाजी मिरज प्रांत ओलांडून हुबळी लुटीत होता. शिवाजीचा सेनापति प्रतापराव बुहलोलखानास अडविण्यास मागें होताच. त्यानें बुहलोलखानास मिरज विजापुरच्या दरम्यान उंबराणी येथें गांठलें. "लढाई सूर्योदयापासून अस्तमानापर्यंत जहाली. दोहींकडील लष्कर बहुत जाया–जखमी जहालें. नबाब ( बुहलोल खान ) याची शिकस्त होऊन तिकोट्यास राहिले," (का. सं. प. या. ४३८.) पाण्यावांचून तर बुहलोलचा जीव टेकीस आला; म्हणून प्रतापरावाशीं सलोख्याचीं बोलणीं बोलून, शिवाजीच्या प्रांतास हात लावणार नाहीं असें वचन देऊन, तिकोट्यास माघारी गेला. तेथें त्यास विजापुराहून ताज्या दमाचें कांहीं सैन्य येऊन मिळालें. तो फिरून प्रतापरावावर चालून आला. फिरून दोघांची नेसरी येथें गांठ पडली. याच लढाईत प्रतापराव मारला गेला, ( ता. २४ फेब्रुवारी स. १६७४ ). या विजयानें धुंद होऊन बुहलोल विजापुरीं दाखल झाला. आपल्या पराक्रमी सेनेची चढलेली तलब तत्काळ भागविण्याची त्यानें खवासखानाजवळ मागणी केली. ही तलबेची भाषा ऐकतांच खवासनें बहादुरखानास मदतीस बोलाविलें. बुहलोलही तितकाच धूर्त होता. पुढील अतिप्रसंग टाळण्यासाठीं त्यानेंही चटकन् आपली पगडी फिरविली व " तलब चढली आहे खरी; पण ती सावकाशीनें भागविली तरी चालेल ! " अशी नरमाईची भाषा सुरू केली. खवास खान भाबडा ! त्याला ही बतावणी खरी वाटली; आणि बुहलोलच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तो स्वस्थ बसला. पण बुहलोल टपून बसला होता. बातमी राखून त्यानें खवासखानास ता. ११ नोव्हें. स. १६७५ रोजीं दारूच्या निशेंत पकडून बंकापूर येथें कैदेंत ठेविलें. अशा रीतीनें बुहलोलचा म्हणजे पठाण पक्ष विजयी झाला खरा; पण मोगलांचें अरिष्ट टळलें नव्हतें, आणि शिवाजीची चढाई थांबली नव्हती. शिवाय, खवासखानानंतर सय्यद मकदम सर्जाखान हा दक्षिणी मुसलमानांचा पुढारी झाला. परंतु सेनापति व वजीर हे दोन्ही अधिकार बुहलोलखानाकडेच होते. यानें भराभर नवीन पठाण अधिकारावर नेमिले, व खिजरखान पन्नी यास सल्लागार केलें. हा पन्नी स. १६७६ त दक्षिणी मुसलमान पक्षाकडून मारला गेला. त्यामुळें चिडून जाऊन बुहलोलनें खवासखानाचा वध केला.

खवासखानाची बाजू घेऊन सर्जाखान उघडपणेंच युद्धास तयार झाला. मरहूम पन्नीचे दोन पुत्र व बुहलोल यांनीं लढाई दिली. सर्जाखानाचा मोड होऊन तो बहादुरखानाकडे गेला. बहादुरखानानें जंगी फौज घेऊन सर्जाखानास पाठीशीं घातलें व बुहलोलखानास झुंजाची सलामी दिली. तथापि या युद्धाचें पर्यवसान आदिलशा–

ही पूर्णपणें मोगल सत्तेच्या अंकित होण्यांत झालें, आणि सीदी मसाऊद यास बादशाही मान्यतेनें वजिरीचे अधिकार देण्यांत आले. मात्र बुहलोलखानाची महत्वाकांक्षा जागच्या जागींच राहिली. तह पक्का होऊन मसाऊद वजीरीच्या पदावर आरूढ होण्यापूर्वींच बुहलोलखान ता. २३ डिसेंबर १६७७ रोजीं हिरापूर येथें मृत्यु पावला. ( अ. घ. इ.; का. सं. पया.४३८; सरकार–औरंगजेब, ग्रंथांक ४. )

**अली कुली.**—शिवाजी आग्र्याहून पळून गेल्याची बातमी बादशहानें आपल्या राज्यांतील अधिकाऱ्यांस कळविली व तो सांपडेल तेथें त्याला पकडण्याचा हुकूम फर्माविला. एके दिवशीं रात्रीं कांहीं बैरागी अली कुलीच्या अधिकाराखालील एका गांवीं आले. तेथील फौजदार या नात्यानें संशयांवरून अलीनें त्या बैराग्यांस पकडलें. हे बैरागी म्हणजे शिवाजी व त्याचे लोक होते. अटकेंत असतांना शिवाजीनें अलीच्या समोर जाऊन, "मीच तो शिवाजी" असें बिनधोकपणें सांगितलें, आणि लगेच आपल्या जवळचा एक मौल्यवान हिरा त्यास दिला. तेवढ्यानें त्याचें समाधान झालें, आणि शिवाजी सुरक्षितपणें तेथून सुटून पुढें निघाला. अली कुलीच्या वरील गांवाचें नांव आढळत नाहीं. ( सरकारकृत शिवाजी ).

**आकण्णा व मादण्णा.**—कुत्बशाहींतील प्रख्यात ब्राम्हण मुत्सद्दी. हे दोघे सख्खे बंधु असून, यांचीं नांवें अकरस भानजी व माधो भानजी अशीं होतीं. यांचें आडनांव पिंगळी. स. १६६६ त अबदुल कुत्बशहाच्या कारकीर्दींत हे दोघे गरीब ब्राम्हण गोवळकोंड्यास आले, व सय्यद मुस्तफा नांवाच्या मोठ्या सरदाराकडे चाकरीस राहिले. आकण्णा धूर्त व पुरा व्यवहारी माणूस होता. मादण्णा विद्वान् असून फारसी व हिंदुस्थानी या भाषा उत्कृष्ट जाणत होता. मुस्तफाच्या वजनामुळें या दोघा बंधूंची दरबारींही वग होती. स. १६७२ त अबदुल कुत्बशहा मेला आणि त्याचा जांवई अबुलहसन ऊ० तानशहा गादीवर आला. तानशहा स्वभावतःच छंदीफंदी आणि विलासी होता. आकण्णा-मादण्णाचें दरबारचें वाढतें वजन पाहून तानशहानें मादण्णास आपली वजिरी दिली. स. १६७७ त शिवाजीची व तानशहाची भेट करवून दोघांचे हितसंबंध मादण्णानेंच दृढ करण्याचा प्रयत्न केला. शिवाजबिद्दल त्यास फार प्रेम वाटत असे. म्हणून त्यानें शिवाजीस आपल्या घरीं बोलावून मेजवानी दिली. "आणि आपले मातोश्रीचे हातीं पाक सिद्ध करून मादण्णापंत व आकण्णापंत जवळ बसून राजियास भोजन घातलें." ( सभा०८८ ). तथापि दरबारीं ब्राम्हण कारभारी व शिवाजीशीं दोस्ती या दोन भयंकर गोष्टी तानशहानें केल्या व चालू ठेवल्या, म्हणून औरंगजेबाचा तिळपापड झाला. मरहूम सुल-

तानाच्या बायका सरुमा व जानी साहिबा या आकण्णा व मादण्णा यांच्या विरुद्ध होत्या. तथापि त्यांजविरुद्ध प्रत्यक्ष या बायांस कांहींच करतां येण्याजोगें नव्हतें. औरंगजेबाचा वकील मीर्झा महंमद हा गोवळकोंड्यास होता. तो वेळीं अवेळीं तानशहास टाकून बोलण्यास चुकत नसे. खुद्द मादण्णा स्वतः कितीही हुषार असला तरी एकंदर कुत्बशाहीच इतकी डबघाईस आली होती कीं, ती फिरून जोमदार करण्यास मादण्णाच्या जोडीला एखादा तलवारबहादरच पाहिजे होता. स. १६८३ त औरंगजेब दक्षिण जिंकण्याकरितां आला. तेव्हां मादण्णास प्रधान-पदावरून दूर करण्यास तानशहास त्यानें फर्माविलें. तानशहानें हा बादशाही हुकूम कागदावरच ठेविला. अखेरीस स. १६८६ त खुद्द गोवळकोंड्यावरच औरंग-जेबाचा मुलगा शहा आलम चालून आला. या स्वारीस सर्वस्वीं आकण्णा व मादण्णा हे कारणीभूत आहेत, अशा समजुतीनें क्रोधाविष्ट झालेल्या कांहीं मुसल-मानांनीं या बंधूंस मारण्याचा कट केला. शेख मिनहाज नांवाचा कटवाल्यांचा पुढारी होता; आणि सरुमा व जानी साहिबा यांचीही त्यास अनुमति होती. स. १६८६ मार्च महिन्यांत एके दिवशीं तानशहाशीं मादण्णापंत व आकण्णापंत खलबत करीत होते. तों रात्र झाली. खलबत संपवून घरीं येण्यास निघाले. मारेकऱ्यांनीं पाळत ठेविलीच होती. संधि साधून मारेकऱ्यांचा म्होरक्या जमशीद यानें दोघांवर भर-रस्त्यांत वार केले. इतर मारेकऱ्यानींही तलवारी चालविल्या. त्या बंधूंचा पुतण्या रुस्तुमराव नांवाचा होता. त्याचा घरापर्यंत पाठलाग करून त्यासही त्यांनीं ठार मारिलें. शहरांतील ब्राह्मणांच्या मोहल्यावरही असाच हल्ला करून कित्येक घरादारांची धुळधाण केली. आकण्णा व मादण्णा यांच्या मृत्यूनें औरंगजेब प्रसन्न होईल आणि कुत्बशाही वांचेल, असें जमशीदला वाटलें असावें. पण औरंगजेब तर प्रसन्न झाला नाहींच आणि बिचाऱ्या कुत्बशाहीचें मात्र त्याच सालीं निर्मूलन झालें. ( सरकार, औरंगजेब, ग्रंथांक–४. )

आदिलशाहींत मुरार जगदेव ध्यानतराव, निजामशाहींत साबाजी अनंत ऊ० चतुर साबाजी आणि कुत्बशाहींत आकणा–मादण्णा हे सतराव्या शतकांत दक्षिणेंतील नामांकित मुत्सद्दी होऊन गेले. या तिघांचेही शेवटीं खूनच झाले, हा विशेष दुःखाची पण लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे !. तथापि त्या काळीं प्रसिद्ध पुरुषांचे खून होणें ही आश्चर्याची गोष्ट नव्हती. तें एक लौकिकाचें पर्यवसान होतें.

**आंगरे.**—यांचें मूळ उपनाम संकपाळ. कुलाब्यानजीक आंगरवाडीचे राहणारे म्हणून आंगरे हें नांव पडलें. तुकोजी आंगरे स. १६५८ त शिवाजीकडे प्रथम बार-

गिरी करून होता. पुढें हळूहळू वाढत जाऊन सुवर्णदुर्गाच्या सुभ्यावर त्याची नेमणूक झाली. त्यापूर्वीं सुवर्णदुर्गाचा सभा अचळोजी मोहिते याजकडे होता. एकदा सुवर्णदुर्गावर जंजिरेकरांनीं चढाई केली आणि दुर्गातील रसद संपली, तेव्हा अचळोजी हिंमत सोडून किल्ला शत्रूच्या हवालीं करण्याचे बेतांत होता. अशा स्थितींत तुकोजीनें शत्रूंवर निकराचा हल्ला चढविला. त्या वेळीं तुकोजीचा पुत्र कान्होजी हा शत्रूकडे पाडाव झाला. तथापि तुकोजीनें धीर न सोडतां, हबशांची फौज उठवून लाविली. या त्याच्या मर्दुमीवरून तुकोजीस सुवर्णदुर्गाची सुभेदारी मिळाली. " त्यांनीं समुद्रांत स्वारी शिकारी करून बेकौली यासी लढाया करून शिकस्त तरांडीं मारून सरकार किफायत करीत गेले. " कान्होजी हा राजारामाबरोबर चंदीचंदावरीं गेला होता, त्यासच पुढें राजारामानें सुवर्णदुर्गाचे सुभ्यावर कायम केलें. तेव्हांपासून पुढें आंगऱ्यांस सबंध कोकणच सुभा सांगितला. ( कै. या. २ ).

**आपाजी नामदेव लांडे.**—हे मूळचे सर्जापूर, कळंबें, किल्ले वैराटगड ता॥ वंदन येथील राहणारे. आपाजीचा बाप नामाजी व त्याचे भाऊ बाळाजी व नरसोबा हे होनप देशपांकडे नोकरीस राहिले. नामाजी होनपांची गुमास्तेगिरी करीत होता. त्याचे पश्चात् आपाजी तें काम करूं लागला.त्यानें होनपांचें देशपांडेपण बळकावण्याचा दोनदां प्रयत्न केला, पण सफल झाला नाहीं. संभाजीच्या कारकीर्दीस मोगलाई अंमल झाला. किल्ले कोंढाण्यास वेढा पडला असतां आपाजीची आई गोदूबाई इनें कर्यात मावळचें देशपांडेपण आपणास द्यावें, असा अर्ज औरंगजेबास दाखल केला. पुढें त्यास खूष करून वतन मिळविण्यासाठीं बाळाजी कृष्ण, आपाजीचा चुलता, बाटून मुसलमान झाला. तेव्हां त्यास स. १७०६ त कर्यात मावळचें देशपांडेपण मिळालें. मसलमान झाले म्हणून आडनांव लांडे देशपांडे असें पडलें. यांस डोणजेकर देशपांडे असें म्हणतात.

**इब्राहीमखान.**–शिवाजीची नोकरी इमानानें करणारा मुसलमान सरदार. ता० १५ एप्रिल स० १६७४ रोजीं शिवाजीनें फोंडा किल्ल्यास वेढा दिला. मोर्चे लावून हल्ले चढवीत असतां आदिलशाहीचा सरदार बुहलोलखान किल्लेकऱ्यांच्या उपराळ्यास येत असल्याचें कळलें. तेव्हां त्यास पिटाळून लावण्याचा शिवाजीनें बेत केला. वेढ्याची ढिलाई पाहून किल्ल्यांतील शिबंदीचे स्वार तटावर व बुरुजावर उभे राहिले. शिवाजीनें ही संधि साधली, व आधींच तयार भरून ठेविलेले सुरुंग उडविले; त्याबरोबर आंतील शिबंदीची पळापळ झाली. या गर्दींत इब्राहीमखानानें निशाण हातांत घेऊन कटकटीची पर्वा न करितां किल्ल्यावर रोविलें. शिवाजीनें त्याच्या शिताफीची तारीफ केली व इब्राहिमखानास तेथील सुभेदारी सांगितली.

**इरादतखान.**—मोगलांनीं स. १६३६ त निजामशाही बुडविली. त्यानंतर हा दौलताबादेचा सुभेदार होता. यानें शहाजीस मोगलांकडे मिळवून घेण्याची पुष्कळ खटपट केली, पण शहाजीनें दहा वर्षांचा एक मुलगा तख्तीं बैसवून निजामशाही जिवंत ठेवण्याचा प्रयत्न केला.

**कावजी कोंढाळकर.**—हें घराणें कान्होजी जेध्यांचें ऋणानुबंधी आणि जिवास जीव देणारें होतें. कान्होजी नाईक वयांत येऊन देशमुखीचा कारभार करूं लागला, त्या वेळीं जेध्यांचे प्रतिस्पर्धी बांदल देशमुख यांशीं त्याची कटकट झाली, त्यास कासारखिंडीचें झुंज असें म्हणतात. यद्यपि हें झुंज खाजगी भांडण होतें, तरी त्यांत उभयतांकडील दहापांच माणसें ठार व जखमी झालीं. त्याच झुंजांत कावजीचा वडील भाऊ पोसजी हा ठार झाला. तेव्हां कान्होजीनें कावजीस आश्रय दिला; आणि पुढें निजामशाहींत व आदिलशाहींत त्यास मनसबदारी मिळाल्यावर कान्होजीनें कावजीसही बढती देऊन गौरविलें. सन १६३५ त माहुलीच्या वेढ्यानंतर कान्होजी शहाजीकडे आला आणि त्याजबरोबर कर्नाटकांत गेला. त्या वेळीं दादाजी कृष्ण लोहकरे, वाघोजी तुपे वगैरे मंडळीप्रमाणें कावजीही त्याजबरोबर असावा. स. १६५९ त अफजलखानप्रसंगीं कान्होजीनें वतनावर पाणी सोडून शिवाजीची नोकरी बजावली, त्या वेळीं कान्होजीबरोबर कावजीही होता. कान्होजीच्या सैन्यानें प्रथम जावळीस आणि बांदलांबरोबर पारघाटांत अफजलखानाच्या सैन्याशीं चांगलें तोंड दिलें; त्या कामीं कावजीनें आपलें शौर्य गाजविलें. शिवाजीनें कावजी व वाघोजी तुपे या दोघांसही कर्ती माणसें पाहून कान्होजीपासून मागून घेतलें ( जे. श. ), आणि त्यांस पायदळावर हजारी नेमिलें ( स. १६५९ ). शक १५८२ म्हणजे स. १६६० पासून शास्ताखान पुण्यास राहून अंमल चालवूं लागला. त्याचे दोन सरदार बुलाखी आणि नामदारखान हे कुलाबा जिल्ह्यांत धामधूम करीत होते. कावजीची नेमणूक नुक्तीच देइरी गडावर झालेली होती. त्यास बुलाखीनें वेढा दिला. त्या वेळीं कावजीनें जवांमर्दी करून वेढा उठविला. ( स. १६६१ )

**केदारजी बिन नरसोजी खोपडे.**—हा खोपड्यांच्या घराण्यांतील देशमुख प्रथमपासूनच विजापुरकरांकडे असून शिवाजीचे पक्षास मिळाला नव्हता. अफजलखानानें समस्त मावळच्या देशमुखांस आपापल्या जमेतीनिशीं येऊन मिळण्याचीं फर्मानें लिहिलीं, त्यांस अनुसरून हा अफजलास जाऊन मिळाला. अफजलवधानंतरच्या युद्धांत केदारजी शिवाजीकडे पाडाव झाला. शिवाजीनें त्याचा शिरच्छेद करविला. ( खंडोजी खोपडे पहा. )

**खेळोजी भोसले.**—विठोजीचा मुलगा व शहाजीचा चुलतभाऊ. हा निजामशाही दरबारांत मोठा मनसबदार होता. मलिकंबराच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा फत्तेखान याजकडे कांहीं दिवसांनीं वजिरीचा अधिकार आला. फत्तेखान जुलुमी आणि हेकड होता, त्यामुळें दरबारांत एकमुखी सत्ता राहिली नाहीं. शहाजहानच्या दक्षिण जिंकणाऱ्या फौजा बऱ्हाणपुरास तळ देऊन आसपास घिरट्या घालीत होत्या. निजामशाही दरबारांत यापुढें आपलें ऊर्जित होणें नाहीं, असें पाहून खेळोजी आपल्या दोघां भावांसह—मालोजी व परसोजी यांसह—स. १६२९ त मोगलांस जाऊन मिळाला. तेथें त्यास ५ हजारांची मनसबदारी मिळाली. स. १६३३ त मोगलांनीं दौलताबादला वेढा दिला असतां, खेळोजी मोगल फौजांतून फुटून विजापुरकरांस जाऊन मिळाला. निजामशाही व आदिलशाही यांच्या संयुक्त फौजा दौलताबादचें रक्षण करीत होत्या. अर्थात् खेळोजीस मोगल फौजांविरुद्ध लढावें लागलें. पुढें खेळोजीची बायको एकदां गंगास्नानास गोदावरीतीरीं जात असतां मोगलांनीं तिला पकडिलें, आणि खेळोजीस निरोप पाठविला कीं, " तुझी बायको आमच्या ताब्यांत आहे. चार लाख रुपये खंडणी भरावयाची असेल, तर तिची सुटका होईल. " खेळोजीनें चार लाख रुपये भरून बायकोस परत आणिलें. पण याच वेळीं आदिलशहाचा व मोगलांचा तह झाल्यामुळें खेळोजीस त्याही नोकरीस मुकावें लागलें. अशा रीतीनें सर्वच बाज अंगावर आल्यामुळें तो परत आपल्या गांवीं गेला आणि वेरुळास त्यानें पाळेगारी आरंभिली. दक्षिणचा मोगल सुभेदार खुद्द औरंगजेबच या वेळीं अधिकारावर होता. त्यानें मलिक हसन नामक सरदारास खेळोजीवर पाठविलें. मलिकनें खेळोजीस पकडिलें, आणि त्याचा स. १६३९ च्या आक्टोबरांत शिरच्छेद केला.

( सरकार, औरंगजेब,—ग्रंथांक १ ).

**खंडोजी बिन धर्मोजी खोपडे.**—हे तर्फ उत्रोलीचे देशमुख. याचे आणि कारीचे जेधे देशमुख यांचे देशमुखीच्या वतनाबद्दल नेहेमीं तंटे चालू होते. जेध्यांनीं तपे शिरवळच्या देशमुखीच्या सनदा निजामशहाकडून आणिल्या; त्या वेळीं खोपड्यांनीं मेडखिंडींत खेळोजी जेध्याची वाट रोखून दगा केला. खेळोजी मयत झाला, परंतु त्या गडबडींत सनदा खोपड्यांच्या हातीं लागल्या नाहींत. याप्रमाणें कधीं जेध्यांनीं तर कधीं खोपड्यांनीं आपापलीं माणसें जमवून एकमेकांवर चालून जावें, दहापांच लोक प्राणास मुकावे आणि फिरून पांचदहा वर्षें दोघांनींही स्तब्ध राहावें, असा या दोन घराण्यांचा क्रम कैक वर्षें चालू होता. प्रमुख सत्तेची ढिलाई तर होतीच, पण खोऱ्यांच्या आणि त्यांमधील किल्ल्यांच्या आश्रयानें अशा

कटकटी त्या कालीं वारंवार होत. एकदां जेध्यांनींही मौजे करनवडें येथें खोपड्यांचें वऱ्हाड निघालें असतां त्यावर छापा घालून सारें लग्नच उधळून दिलें. परंतु पुढें या दोघांसही या कटकटींचा कंटाळा येऊन त्यांनीं शिरवळच्या हवालदाराकडे गाऱ्हाणें केलें. समस्त दिवाण व गोत यांनीं निकाल दिला कीं, "पातशहांनीं जेधियास देशमुखी दिल्ही हे गोष्टी; परंतु खोपडियांनीं जेध्यांचा मारा केला, व जेध्यांनीं खोपडियाचें वऱ्हाड मारिलें, त्यामुळें खून दुतर्फा जाले आहेत. याकरितां देसमुखी दो जागां वांटावी." ( खं. १५–३०२ ) या निकालाप्रमाणें भोरतर्फेची जेध्यांस व उत्रोली-तर्फेची खोपड्यांस अशी देशमुखीची फारकत करून मिळाली. जेध्यांप्रमाणें खोप-डेही विजापुरकरांकडे चाकरीस राहिले. शिवाजीनें साऱ्या मावळच्या देशमुखांस दस्त केलें, त्या वेळीं खंडोजीनें शिवाजीची सत्ता कबूल केली. तरी विजापुरचे मन-सबदार या नात्यानें तो आपणास विजापूरचा नोकर म्हणवी. या 'दोन डगरीं-वरील' धोरणाची कसोटी अफजलखान प्रकरणीं लागली. शिवाजीच्या पारिपत्या-साठीं अफजल विजापुराहून निघाला, तेव्हां त्यानें साऱ्या देशमुखांस व मनसब-दारांस आपापल्या जमेतीनिशीं येऊन मिळण्याचीं फर्मानें काढिलीं. त्या फर्मानाप्रमाणें खंडोजी अफजलास जाऊन मिळाला. अफजलवधानंतर झालेल्या लढाईंत खंडोजी पाडाव सांपडला. कान्होजी जेध्यानें त्याबद्दल शिवाजीकडे रदबदली केली. शिवा-जीनें त्याचें वतन कायम ठेविलें; पण बेइमानीबद्दल खंडोजीचा "उजवा हात व डावा पाय कापविला......ज्या हातें तरवार धरिली तो हात कापिला."

( जे. क., शि. च. प्र. पृ. ४५ )

**गाझी बेग.**—जयसिंगाच्या सैन्यांतील एक अधिकारी. आग्र्यास जातांना जयसिंगाच्या वतीनें हा शिवाजीबरोबर होता.

**राजा गोपाळदास गौर.**—अशेरीचा किल्लेदार. याचा भाऊ विठ्ठलदास शहाजहानच्या दरबारीं होता. स. १६२२ त शहाजहान बापाविरुद्ध बंड करून दक्षिणेंत आला, आणि गोपाळदासास आपला सारा सरंजाम सुपूर्द करून अशेरीच्या किल्ल्यावर ठेवून ( स. १६२३ ) स्वतः पर्वीझबरोबर लढण्यास निघून गेला. पर्वीझ जहांगीरच्या हुकुमावरून शहाजहानचें बंड मोडण्यास निघाला होता. शहाजहान निसटून गेला तेव्हां पर्वीझनें अशेरीस वेढा दिला. गोपाळदासानें दोन वर्षेपर्यंत किल्ला भांडविला. या कामगिरीबद्दल शहाजहाननें त्यास पांच हज़ारांची मनसब व 'मानधाता' असा किताब दिला. याचेच पुत्र बळिराम व मनोहरदास. ( मा. शिलालेख—डॉ. मोदी १९१५ ). अशेरी किल्ला माहीम तालुक्यांत आहे.

**गोपाळभट बिन श्रीधरभट महाबळेश्वरकर.**—हे "भले, थोर अनुष्ठाते, सूर्यउपासनी, पद्महस्ती " असून, शिवाजीची यांजवर बहुत श्रद्धा होती. स. १६५३ त जिजाबाई व शिवाजी महाबळेश्वरास देवदर्शनास गेले होते. यांजपासून शिवाजीनें मंत्रोपदेश संपादिल्याचा उल्लेख आहे. ( स. प. ११२ ). गोपाळभटांस राज्याभ्युदयार्थ सूर्यानुष्ठान करण्यास सांगितलें होतें, आणि याबद्दल त्यांस ता. २०–२–१६५३ रोजीं सनद करून दिली. त्या अन्वयें दरसाल पाछाई होन १००, आठ खंडी धान्य, आरक्त वस्त्रें दोन, पीतांबर एक, शाल एक व आसन एक इतकें देण्यांत येत असे. " स्वामींनीं आमचे अभ्युदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ प्रतिवर्षी अनुष्ठान उत्तरोत्तर करावें व मंत्रउपदेशही स्वामीचे वंशपरंपरेनें आमचे वंशपरंपरेस करावा. " ( कित्ता ). यावरून शिवाजी व जिजाबाई या मातापुत्रांची या भटजीवर अत्यंत भक्ति होती असें दिसतें.

**गोमाजी नाईक पानसबळ.**—लुखजी जाधवरावाच्या पदरचा मनुष्य. जिजाबाई माहेराहून शहाजीकडे आली, त्यावेळीं तिच्याबरोबर विश्वासाचा व खात्रीचा मनुष्य म्हणून जाधवरावानें यास पाठविलें होतें. याचा मुलगा खंडेराव नाईक राजारामाचे कारकीर्दींत महत्त्वास चढला. धनाजी जाधवापूर्वीं कांहीं काल सेनापतिपद याजकडे असल्याचा शिक्का सांपडतो. गोमाजी स. १६४६ त पुण्याचा हवालदार होता. याचा उच्चार पानस–बळ असा आहे; ' स ' वर अनुस्वार नाहीं.

**जाफरखान.**—शास्ताखानाचा मेहुणा व औरंगजेबाचा वजीर. याच्या तर्फे शिवाजीनें आपल्या सुटकेचें बोलणें लाविलें होतें; पण त्याच्या हातून कांहीं होण्यासारखें नाहीं, हें पाहून शिवाजीनें त्याचा नाद सोडला, व ' उद्धरेदात्मनात्मानम् 'चा अवलंब करून युक्तीनें सुटका करून घेतली.

**जिवा महाला.**—अफजलखानाचे भेटीचे वेळीं अत्यंत विश्वासू व जिवास जीव देणारे असे दोन इसम शिवाजीनें बरोबर घेतले होते. पैकीं जिवा महाला हा एक होता. हा " जिऊ महाला मरदाना होता. " अफजलखानाचा भेटीचा नुसता डाव असून तो आपल्या जिवास अपाय करणार, ही शिवाजीची अटकळ होतीच. त्याप्रमाणें तेथें भेटीचा विपरीत प्रकार दिसतांच शिवाजीनें प्रथम वाघनखें चालवन आणि अफजलखानाचा वार चुकवून " उजवे हाताचा बिचव्याचा मारा चालविला. " ( स. भा. १८ ) " ऐसे दोन वार करून, मुंडी आंसडून, चौथरियाखालें उडी घालोन निघोन गेले. " संभाजी कावजीनें " खानाचें डोचकें कापिलें. " इतक्यांत " सैदबंडा पटाईत धांवला. त्यानें राजे जवळ केले; आणि लगोलग शिवा–

जीवर चार वार केले. ते चारही वार शिवाजीनें 'कातर करून' चुकविले. पांचवा वार शिवाजीस मर्मभेदक होणार, इतक्यांत " जिऊ महाला याणें फिरंगेनें खांद्यावरी सैद बंडियासी वार केला. तो पट्टियाचा हात हत्यारा–समेत तोडिला. " अशा रीतीनें " होता जिवा म्हणून वांचला शिवा " अशी आपली कीर्ति जिऊनें मागें ठेविली. जिऊ महाला कोंडवली या गांवचा रहिवाशी. हा गांव महाबळेश्वरच्या जुन्या व डोंगराळ वाटेवर वेलंगनजीक आहे. वाई महाबळेश्वराकडे 'महाला' हा शब्द न्हावी या अर्थी वापरतात. जिऊ याचें मूळचें आडनांव सकपाळ. जात व धंदा न्हावी यामुळें सामान्यतः महाला हेंच त्याचें नांव तोंडीं व बखरींत कायम झालें. शिवाजीच्या कारकिर्दीपासून सकपाळांनीं आपला धंदा सोडला, आणि अद्यापिही त्यांचे वंशज हा धंदा करीत नाहींत. जिऊस सीताराम या नांवाचा मुलगा होता. सन १७३२ सालचा सीताराम बिन जीवा महाला याचा एक कागद उपलब्ध आहे. त्यांत मल्हारजी सुभानजी व संताजी महाला अशीं २ नांवें आढळतात. ( पं. सं. वृ. १८३९ पृ. १६–१९. )

**तापीदास तवाहीदास.**—फ्रेंच कप्तानाच्या हाताखालील दलाल, पेठ रायबागचा राहणारा. यानें फ्रेंचांच्या तर्फे शिवाजीकडे व्यापारास सवलती मागितल्या होत्या. त्यावरून शिवाजीनें " सौदागरी करून सर्फराज होणें " म्हणून दाभोळ बंदरींही व्यापार करण्यास त्यास परवानगी दिली. सुरत व राजापुर येथें फ्रेंचांच्या वखारी होत्याच, ( खं ८. ८ ).

**दाउदखान कुरेशी.**—जयसिंग–दिलेरखानाबरोबर दक्षिणेंत आलेला मातबर मोगल सरदार. दिलेरखानाच्या खालोखाल नांव घेण्याजोगा हाच सरदार होता. याचे दोन पुत्र हमीद आणि लोदीखान बापाबरोबर मोहिमेंत होते. जयसिंगानें दक्षिणेंत येतांच दिलेरखानास पुरंदर-वेढ्याचें काम दिलें. त्याच्या हाताखालीं दाउदखान केदार दरवाजासमोर मोर्चे देऊन बसला होता. अंतःस्थ रीत्या दिलेरखानाचा वरचढपणा दाउदखानास सहन होत नव्हता. म्हणून दाउदनें आपल्या कामांत ढिलाई करण्यास सुरुवात केली. जयसिंगानें लगोलग दाउदखानास तेथून काढून सिंहगड, राजगड, रोहिडा वगैरे किल्ले घेण्याच्या कामगिरीवर पाठविलें. राजा रायसिंग, सर्जाखान, कुत्बखान, अमरसिंग, अचलसिंग, शुभकर्ण हे सरदारही बरोबर दिले होते. दाउदखान तीन्ही किल्ले सर करून आसपासचीं खेडीं उध्वस्त करीत ता. १९ मे स. १६६५ ला पुण्यास दाखल झाला. यानंतर पुरंदरचा तह होऊन लढाई संपली. पुढें स. १६७० त शिवाजीची मोहीम सुरू होतांच दाउदखान आपल्या ७००० हजार

सैन्यासह निघाला आणि ता. २८ मार्च स. १६७० रोजीं अहंमदनगर येथें दाखल झाला. शिवाजीनें हस्तगत केलेलीं पारनेर, जुन्नर हीं ठाणीं त्यानें परत घेतलीं. औरंगजेबानें या चढाईबद्दल दाउदची तारीफ केली, ( सरकार-शिवाजी १९१ ), आणि त्यास बऱ्हाणपुरास सुभेदार नेमिलें.

**दादंभट बिन पिलंभट भट.**—शिवाजी बसनूरच्या स्वारीस जातांना मालवण येथें जांजिरा बांधण्यालायक कुरटें नांवाचें बेट होतें. तेथें 'पंडितराव, उपाध्ये व ज्योतिषी यांनीं मुहूर्त पाहून ता. २५ नोव्हें. स. १६६४ रोजीं मुहूर्त करून चिरा भूमिमध्यें बसविला. नांव सिंधुदुर्ग ठेविलें.' दादंभट व त्यांचे मामा जानभट अभ्यंकर यांस शिवाजीनें तेथील उपाध्येपण दिलें. पुढें संभाजीच्या कारकीर्दींत मोगलांच्या धामधूमींत कुडाळच्या सावंतांनीं मोगलांची ताबेदारी पत्करिली. महमद अब्बास व अबदुल राजखान यांची 'स्वारी येऊन कित्येक लुटी नागाव करून मनुष्यें धरून नेलीं.' त्या प्रसंगीं दादंभट टिकाव धरून राहिला; आणि जानभट परागंदा झाला. दादंभटानें "कितीएक काल दुष्काळ काढिला. भाजीपाला खाऊन सोबत दिली. कित्येक महार्णवाचे प्रसंग सोसिले." याबद्दल जंजिऱ्याचें उपाध्येपण पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें दादंभटास मिळालें. दादंभट हा "एका पायानें क्षीण" असा होता, त्यानें "कोणाची प्रथम, कोणाची दुसरी व कोणाची तिसरी अशा तीन पिढ्यांपर्यंत उपाध्येपण केलें. पुढें जानभटाचा वंशज कोणी कृष्णंभट वृत्तीचा अर्धा वांटा मागं लागला. तेव्हां सिंधुदुर्गाचा मुद्राधिकारी चांदोजी घाटगे याजकडे 'तटसरनोबत बारगीर व नायकवाडी' यांनीं दादंभटातर्फे करीना लिहून दिला. त्याप्रमाणें दादं-भटास सिंधुदुर्गाचें उपाध्येपण स्वतंत्र व मालवणचें दादंभट व कृष्णंभट यांत वांटून दिलें. हा निवाडा ता० २ मे १७२१ रोजीं झाला, (का.सं.प.या.४२१). समुद्रकाठीं 'आधिकोत्तर स्थळ पाहिजे,' असा शिवाजीच्या मनांत विचार होता. तों मालवणास असें स्थळ सांपडलें. "चौऱ्यांशी बंदरीं ऐसा जागा नाहीं" असें शिवाजीस वाटलें. तेथील कोळी तानाजी, मानाजी, गंगाजी व सावजी यांस त्या स्थळाचें "ठिकाण पाहून" आणण्यास सांगितलें. "मार्ग कठीण सर्पाकार, तरांडी होडी मात्र चालते. सभोंवते सारे खडक. दुसरीं तरांडीं तीन कोशपर्यंत यावयास अगदीं गति नाहीं." अशा जाग्यावर "पांच खंडी शिसें आणून जंजिरेचा पाया शोधून घातला." "हुन्नरवंत पाथरवट चुना मुस्तेद करावया कोळी आणि कामाठी व बाजे लोक मिळोन तीन हजार" आणि "तेथील फिरंगी हुन्नरवंत काबील जंजिरियाचें काम-काजांत म्हणोन शंभर आणविले. इमारत पक्की तळ शोधून बांधावयासी शिसेबंद

धोंड्यांत आरपार आड्न घालून पक्कें काम पाणियास जुम्मस न खाय ऐसें बांधिलें." बांधावयाची सारी युक्ति महाराजांनीं सांगितली. या कामावर देखरेख ठेवण्यासाठीं कुंभारजुव्याचा आरमारी ठाणेदार **गोविंद विश्वनाथ प्रभु** बंदरनिवीस व जहाजनिवीस ता॥ खारेपाटण याची नेमणूक झाली होती. या सिंधुदुर्गाबद्दल मराठ्यांस फार अभिमान वाटे. कारण "चौऱ्यांशीं बंदरांत हा जंजिरा मोठा; अठरा टोपीकरांचे उरावर **शिवलंका** अजिंक जागा निर्माण केला," ( चित्र. ). सिंधुदुर्गाचा ऊर्फ या शिवलंकेचा 'दर्याबुरूज' शत्रूवर मारा करण्यास बांकी जागा होती. अशा प्रकारचा हा "सिंधुदुर्ग महाराजांचें हृदयकमलच" आणि म्हणून "कौस्तुभाहुनि आगळाचि गरिमा त्याचीच त्या योग्यता" असे एका कवीनेंही उद्गार काढले. या सिंधुदुर्गाचें अत्यंत गौरवयुक्त वर्णन चित्रगुप्त आपल्या बखरींत मोठ्या उल्हासानें करतो. ( पहा पृ. १३२–१३७ ). पुढें या दुर्गावर राजाराम महाराजांनीं शिवाजीचें मंदिर बांधलें. मंदिरांत शिवाजीची मूर्ति काळ्या पाषाणाची बसाविली आणि गाभाऱ्याच्या बाहेर मौनिस्वामी पाटगांवकर यांची प्रतिमा स्थापिली. हे मौनिस्वामी व बाबा याकूब यांनीं गोव्यापासून दाभोळपर्यंत शिवाजीचा अंमल बसाविण्यास फार मदत केली. या दोघांचें शिवाजीवर फार प्रेम होतें. शिवाजीनें दिलेलीं इनामें अद्यापि यांच्या वंशजांकडे चालू आहेत. सिंधुदुर्गाच्या कोटाच्या पश्चिम बाजूस दगडावर शिवाजीचा पंजा कोरलेला आहे. तथून कांहीं यार्डांच्या अंतरावर शिवाजीच्या पादुका आहेत. ( ऐ. स्फु. ले. भाग १. १. ) दादंभटाचा करीणा वाचण्यालायक आहे.

**दामलवाड.**—हा शिवापा बिद्नूरकर याचा सरदार, धारवाडच्या मजबूद ठाण्याचा अंमलदार होता. खवासखानाची आदिलशाहीशीं बेदिली होऊन तो फौजबंद निघून धारवाडास आश्रयार्थ आला; पण दामलवाडानें त्यास आंत घेतलें नाहीं, ( अ. घ. इ. ). सन १६४६–४७ च्या विजापूरकरांच्या स्वारींत हा शिवापा नाइकातर्फे लढत होता. यानें मुस्तफाखानाचें "लष्कर फोड्न भग्न केलें" व आसदखानास जखमी केलें. परंतु सिद्दी रैहानच्या पिछाडीच्या हल्ल्यांत दामलवाड ठार झाला, ( रा. मा. चंपू ८४–८५ ).

**नरहरि रुद्र.**—शिवाजी दक्षिण–दिग्विजय करीत वेलोर येथें आला. तेथील कोट अबदुल्ला खान यानें भांडविला. रघुनाथपंत व आनंदराव कर्णालीकर यांनीं मोर्चे लाविले होते. मुसलमान तवारीखकार म्हणतात, खानानें काट १४ महिने लढविला व शेवटीं ५०००० होन लांच घेऊन मराठ्यांस दिला, ( सरकार, शिवाजी ३४८ ). वेलोरजवळच दोन टेकड्या होत्या. तेथें किल्ले बांधून साजिरा–गोजिरा

असें नाव ठेविलें व नरहरि रुद्रास हवालदार नेमिलें. हा पुढें राजारामाच्या कारकीर्दीस महत्वास चढून त्यास 'सेनाकर्ते' पद मिळालें. ( स. प. पृ. १८२ ).

**नारायण त्रिमल हनुमंते.**—हा शहाजीचा कारभारी. हा शहाजीबरोबर कर्नाटकांत राहून त्याच्या जागिरीचा बंदोबस्त ठेवी. " शक १५६१ त बंगळूर काबीज करण्याच्या इरायानें तेथील चारपांच लक्ष होनांचें उत्पन्न खूष होऊन आदिलशहानें शहाजीस सैन्याच्या खर्चाकरितां लावून दिलें होतें; " ( रा. मा. चं. ८३ ). स. १६४९ च्या पावसाळ्यांत शहाजी बंधमुक्त होऊन बंगळुरास गेला, तो बहुतेक अखेरपर्यंत तिकडेच होता. नारो त्रिमलचे तीनही पुत्र रघुनाथ, जनार्दन व त्रिंबक, हे शिवाजीच्या कारभारांत पुढें प्रमुख होते.

**पादरी गोशाल मार्तीस.**—( Padre Goncalo Martins ). गोवेकर फिरंग्यांकडून शिवाजीकडे आलेला वकील. प्रथम गोवेकरांचा वकील रामोजी शेणवी स. १६६५ त तहाची वाटाघाट करून बरोबर शिवाजीचा वकील ' सकोपंत ' यास घेऊन परत गेला. पुढें सकोपंत शिवाजीकडे परत येतांना पादरी गोशाल हा गोव्याचा वकील शिवाजीशीं तह पक्का करण्यासाठीं आला. बरोबर शिवाजीस ३०० असराफ्या किंमतीचा नजराणा त्यानें आणला होता. उभय पक्षीं तह होऊन हा वकील परत गेला. हा तह ता. ५ डिसेंबर स. १६६७ रोजीं झाला. वाडीचे सावंत शिवाजच्या भयानें फिरंग्यांच्या आश्रयास गेले होते. त्यांनीं जुनें गोवें या शहराबाहेर जाऊं नये व शिवाजीशीं लढाई करूं नये, असा त्या तहाचा आशय होता.

( पृ. १२५ ).

**पीतांबर शेणवी.**—कुडाळच्या सावंतांचा कारभारी. सावंतांतर्फे शिवाजीशीं तह करण्यास स. १६५९ त आला होता. ( का. सं. प. या. ४११ ). स. १६७० त शिवाजीनें कोळवण काबीज केलें, तेव्हां गोवेकर जो ' चौथ 'चा हक्क रामनगरच्या राजास देत, तो आपणांसही द्यावा अशी त्याजकडे शिवाजीनें मागणी केली; त्या कामीं पीतांबर शेणवी या गृहस्थाची नेमणूक त्यानें केली होती. परंतु ही कामगिरी पुरी होण्यापूर्वींच स. १६७८ त पितांबर मरण पावला, ( पां. पिसुर्लेंकर, शि. च. प्र. पृ. १८१ ). याचें आडनांव गुळगुळे चिटणीस असें होतें. कोटेकर पंडित गुळगुळे पुढें सिंदेशाहींत प्रसिद्धीस आले, ते याच घराण्यापैकीं असावे.

**पिलाजी व तानाजी शिरके.**—शृंगारपूरच्या सुर्व्यांचे कारभारी. ठिकठिकाणचे पाळेगार दस्त करतांना सुर्व्यांवरही शिवाजीनें शस्त्र धरिलें. तेव्हां पिलाजी शिवाजीकडे वकिलीस आला. परंतु उभयतांचे करारमदार बनले नाहींत. म्हणून

शिवाजीनें सुर्व्यांस बुडविलें. त्या वेळीं ही शिरके मंडळी हबसाणांत पळून गेली, ( चि. ७१ ); परंतु शिवाजीनें त्यांस अभयपत्र देऊन " आपणापाशीं ठेविलें. " शृंगारपूर शिवाजीनें ता. २९ एप्रिल स. १६६१ रोजीं घेतलें. याच पिलाजी शिरक्यांची कन्या येसूबाई ही संभाजीची बायको.

**फालुदखान ऊर्फ पोलादखान.**—आग्रा शहराबाहेर शिवाजीस रहावयाच्या हवेलीवर हा फौजबंद कोतवाल होता. याचा पाहरा जय्यद तोफखान्यासह तीन महिनेपर्यंत—शिवाजीवर होता. शिवाजी पळून जातांच त्याच्या राहिलेल्या परिवारांपैकीं तिघांचे यानें फार हाल केले.

**बजाजी निंबाळकर.**—बजाजी हा मुधोजीचा कनिष्ठ पुत्र म्हणजे जगपाळाचा नातू होय. धर्मांतरप्रकरणीं याचें नांव मराठी इतिहासांत प्रसिद्ध आहे. निंबाळकरांचें घराणें विजापूरदरबारीं सरदारी करून असे. त्याचा बजाजीच्या आजापणजांपासून भोसले घराण्यांशा निकट परिचय व शरीरसंबंध होता. विजापूरचा इब्राहिम आदिलशाहा याच्या मृत्यूनंतर महंमदशहा गादीवर आला. त्या वेळीं निंबाळकरांनीं इतरांप्रमाणें दरबारचें सेवावृत्तीचें जूं बाजूस सारून मुलखांत आवाडाव सुरू केली. परंतु विजापुरच्या लष्करापुढें मुधोजी नामोहरम होऊन पाडाव झाला; आणि त्यास साताराच्या किल्ल्यांत कैदेंत रहावें लागलें. त्यावेळीं बजाजी हा बापाबरोबर सातार्‍यास होता. बजाजीचे दुसरे दोघे भाऊ साबाजी व जगदेव हे बापावरील हा प्रसंग पाहून स्वतंत्रपणें विजापुरीं गेले. त्यांनीं बादशहाकडून दहिगांव व भाळवणीची जहागीर मिळविली; मात्र बादशहाच्या हुकुमाप्रमाणें ते विजापुरींच राहूं लागले. बजाजी बापाबरोबर दहा वष अटकेंत होता. शहाजी भोसले निजामशाहीनंतर विजापुरचा बलिष्ठ मनसबदार झाला होता, त्याच्याच साह्यानें ह्या पितापुत्रांची अटकेंतून सुटका झाली, आणि फलटणची जहागीर त्यांस पववत मिळाली, ( सन १६३९ ). देशीं परत येऊन मुधोजीनें प्रांताची लावणी संचणी केली; आणि आपली मुलगी सईबाई हीस शिवाजीस अर्पण केलें. हें लग्न ता. १६ मे स. १६४० रोजीं झालें. सईबाई ही बजाजीची बहीण होय. ही ता. ५ सप्टेंबर १६५९ रोजीं मरण पावली. बजाजीचे दुसरे दोघे भाऊ स्वतंत्रपणें जहागीर मिळवून मनसबदार बनले होते. शिवाय मुधोजीनें त्यांस जवाहीर, हत्ती, घोडे दिले आणि फलटण हें संस्थान एकट्या बजाजीच्या नांवानें करून त्याप्रमाणें बादशाही सनदाही आणविल्या, ( स. १६४१ ). तथापि पुढील २।३ वर्षांतच दरबारीं यांचें पटेना. खेरीज, "त्यास उभयतां बापलेक पुंडावा करीत होते. नित्य उठून स्वार्‍या शिकार्‍या

करावया. फलटनवाले मार्ग सरळीत चालूं देईनात;" म्हणून अंबरखान हा ससैन्य मुधोजी-वर चालून आला. युद्ध होऊन त्यांत मुधोजी पडला आणि बजाजीचा पाडाव करून त्यास विजापुरीं नेलें. ( १६४४ ). बजाजी हा निरपराधी होता; तरी ' तूं नाहीं तुझ्या बापानें ' या न्यायानें त्यास मारण्याचा बादशहानें हुकूम सोडिला. पण ' जिवावरचें शेंपटावर गेलें ' याप्रमाणें मुसलमानी धर्म स्वीकारण्याचें कबूल केल्यावर त्यास जीवदान मिळालें. ज्याची बहीण शहाजीसारख्या सरदाराच्या मुलास केली, तो सरदार बाटविल्याबद्दल बादशहास मोठा आनंद झाला. " मुलास मारावें ऐसें नाहीं. थोर मराठे आहेत. सुरतपारव, मर्दुमीस जादा आहेत. " पुढें ' बेगमेच्या चित्तांतही गोष्ट आली आहे, ' ही मुलीची संमति, आणि " पातशाहा आपणांस आपल्या कुटुंबांत मेळवितात, तर त्यांची लेक आपणांस द्यावी, म्हणजे आम्ही कबूल करतों. " असा उभयतांकडूनही सवालजबाब येतांच बादशहानें बजाजीचें आपल्या मुलीशीं लग्न केलें. " पुढें बेगमेची व त्यांची माया एक झाली. " याच मायेच्या जोरावर बजाजीनें फिरून फलटणची जहागीर मिळविली. कारण राजाळकर नांवाच्या पात-शाही सरदारानें बजाजी कैद होतांच फलटणची देशमुखी आपल्या नांवें करून घेतली होती. फार दिवस श्वशुरगृहीं राहिलेले हे ' घरजांवई ' देशीं परत आले, ( १६५१ ). त्याच सुमारास जिजाबाई आपल्या कुलस्वामीचें दर्शन घेण्यास शिखरशिंगणापूर येथें होती. तिनें बजाजीस दर्शनास बोलविलें, आणि त्यास शुद्ध करून स्वधर्मांत घेतलें. त्याची मुसलमान बायको विजापुरीं मृत्यु पावली. परंतु कैद होऊन विजापुरास जाण्यापूर्वीं त्याची धर्मपत्नी सावित्रीबाई म्हणून होती, तिच्यापासून त्यास अपत्य झालें होतें. त्या पुत्राचें नांव महादाजी. सावित्रीबाई ही बजाजी विजापुरीं असतांच मरण पावली म्हणून त्यानें फिरून दोन लग्नें केलीं. त्यांपासून त्यास गोरखोजी, वणगोजी व मुधोजी असे तीन मुलगे झाले. बजाजीनें शिवाजीस गुप्तरूपें पुष्कळ साह्य केलें. शिवाजीनें आपली मुलगी सखूबाई ही महादाजीस दिली. आणि अशा रीतीनें बजाजीच्या धर्मांतराविषयीं कांहीं लोकांच्या मनांत जी मळमळ होती, ती नष्ट झाली. बजाजीनें आपणांस मिळावें, म्हणून औरंगजेबानें १६६९ त त्यास पत्र लिहिलें पण तो त्यास सामील झाला नाहीं. फलटणास त्याच्या नांवाचा एक घुमट आहे. त्यास ' लांडे बजाजीचा घुमट ' असं म्हणतात. (खं ८. ५३) बजाजी स. १७०५ पर्यंत जिवंत असल्याचें नमूद आहे. ( खं. ८. ५३ ).

**बहादुरखान**—." बहादुरखान पेंडीचें गुरूं आहे. त्याचा गुमान काय आहे ? त्यास आपले मुलकांत यावयास दोन वर्षें लागतील. " असें राजे म्हणाले. ( सभा.

७६ ). सालेरच्या प्रख्यात लढाईंत महाबतखान, दाउदखान व इकलासखान याचा पुरता मोड झाला. औरंगजेबास ही बातमी समजून तो म्हणतो, “ खुदानें मुसलमानांची पातशाही दूर करून शिवाजीसच दिधली असें वाटतें. ” औरंगजेबाचा हा वैताग पाहून बहादुरखान म्हणाला, “ नाना हुन्नर करून त्यास जेर करतों. ” अशा तोऱ्यानें ७० हजार स्वारांनिशीं दक्षिणेंत आला तो हा बहादुरखान होय. हा औरंगजेबाचा दूधभाऊ असून, याचें मूळचें नांव मीर मलिक हसन. आघाडीस दिलेरखान औरंगजेबानें पाठविला होताच; बहादुरखान त्यास येऊन मिळाला, आणि उभयतांनीं सालेरीस वेढा दिला, ( जून १६७१ जे. श. ). तेथून सरदार औरंगाबादेस आले. शिवाजीनें आपल्या प्रांतांचा बंदोबस्त अधिकच जारीनें केला. बादशहाचा प्रयत्न शिवाजीनें या नाहीं त्या उपायानें हाणून पाडला. बहादुरखानानें ही अपयशाची परंपरा ओळखून, व “ शिवाजीच्या फौजेच्या आणि बंदोबस्ताच्या मानानें आपल्या फौजेचा टिकाव लागावयाचा नाहीं.” ( म. रि. पृ. ३४६ ), असें पाहून तह करण्यास तयार झाला. इतक्यांत शिवाजीनें “ हरद्र सोधावें ” अशा आशयाचीं गुप्त पत्रें पाठविलीं, तेव्हां सलोखा झाला. बहादुरखान १६७२ च्या पावसाळ्यांत दौंडच्या पूर्वेस भीमाकांठीं पेडगांव येथें छावणी देऊन राहिला; आणि तेथें त्यानें बहादुरगड नांवाचा किल्ला बांधला. हेंच ठिकाण पुढें मोंगल छावणीचें मुख्य स्थान झालें. पांडे पेडगांव हें पूर्वीं परगण्याच ठाणें होतें. तशांत तेथें किल्ला होऊन बादशाही फौजेचा तळही पुढें सुमारें ४० वर्षें असे. या गावांस २५ वेसी व ५२ पेठा होत्या असें म्हणतात. ( इ. वृ. १८३७-२२४ ). बहादुरखानास स. १६७४ त ‘ खान जहान बहादुर कोकलताश जाफरजंग ’ असा बहुमानाचा किताब आणि ७००० घोडेस्वारांच पथक देण्यांत आलें; आणि फिरून त्याची १६७६ त विजापुरकरांवर रवानगी करण्यांत आली. त्याची आणि विजापुरकरांचा बुहलोलखान यांची लढाई ता० १ जून स. १६७६ रोजीं हलगी येथें झाली. त्या वेळीं इसलामखान रुमी हा मोगल सरदार पडला आणि बुहलोलखानाची फत्ते झाली. स. १६७७ पर्यंत तो दक्षिणेंत होता. पण त्या सालच्या ऑगस्ट. सप्टेंबरमध्यें औरंगजेबानें त्यास परत बोलावून फिरून इकडे दिलेरखानाची नेमणूक केली. पण आदिलशाहीनें शिवाजीची मदत घेऊन दिलेरखानाला तोंड दिलें. शिवाजीच्या मृत्यूनंतर १६८० च्या जुलै—ऑगस्टमध्यें बहादुरखान फिरून दक्षिणेंत आला, आणि अहिवंतगडास वेढा देऊन बसला ( जे. श. ). बहादुरखान ता. २४ नोव्हें. स. १६९७ रोजीं वारला, ( इ. वृ. १८३७ ).

**बहिरजी जाधव नाईक.**—हा शिवाजीचा ' पाळती जासूद ' म्हणजे हेर ऊर्फ नजरबाज. यानेंच बातमी राखून " सुरत मारिल्यानें अगणित द्रव्य सांपडेल, " अशी शिवाजीस खबर दिली. शिवाजी कल्याण प्रांतीं होता. तो सुरतेवर येणार, असें ऐकून तेथच्या व्यापाऱ्यांनीं आगाऊच सुरक्षित ठिकाणीं आपला माल ठेवण्याची व्यवस्था केली. इंग्रज व्यापारी मालाचे गठ्ठे बोटीवर चढविण्याच्या धांदलींत मग्न झाले. बहिरजीची बातमी ऐकन ता० ४ आक्टोबर स. १६७० रोजीं शिवाजीनें येऊन सुरत लुटली. लुटीची मालमत्ता ५ कोट होनांची भरली व शिवाय चांर हजार घोडीं पागेस लाविलीं. ( सभा० ६४ ).

**बापूजी मुद्गल.**—तर्फ खेडेबारेचा देशपांडे, पुणें प्रांताचा हवालदार. यानें कोंडाणा घेण्याच्या कामीं शिवाजीस चांगली मदत केली. याचेच दोन पुत्र बाबाजी बापूजी व चिमणाजी बापूजी शास्ताखानाच्या छाप्याच्या प्रसंगीं प्रसिद्धीस आले.

**बाबाजी बापूजी व चिमणाजी बापूजी.**—बापूजी मुद्गल, खेडेबाऱ्याचे देशपांडे याचे हे दोन मुलगे. शास्ताखान पुण्यांत शिवाजीच्या वाड्यांत लालमहालांत येऊन राहिला होता; त्याचा बेत शिवाजीला समूळ उखडून टाकण्याचा होता. त्यास पिटाळणें शिवाजीला जरूर होतें. शास्ताखानाकडे फुलें देण्यास रोज एक माळी जात असे. त्यास मथवून या बंधूंनीं शिवाजीस थेट लालमहालांत प्रवेश करून देण्याची कामगिरी केली. शिवाजीचे लोक आलेले पाहून त्यांस पहारेकऱ्यांनीं अडविलें. " कटकांतील लोक, चौकी पहाऱ्यास गेलों होतों; " अशी बतावणी या बंधूंनीं केली, ( सभा. ३३ ). खासे दोनशें माणूस चिमणाजीच्या हवालीं करून डेऱ्याचें वाड कट्यारीनें चिरून शिवाजी आंत गेला. रखवालीच्या कांहीं खोजांनीं गडबड केली, तेव्हां चिमणाजीनें चारपांच खोजांस कापून काढिलें. शिवाजीनें कांहीं लोक आंबेओहोळांत ठेविले होते. खानाचीं बोटें छाटून तो खिडकीवाटे पळाला, त्या बरोबर जिकडे तिकडे ओरडा झाला. पुढें शिवाजीनें खुणेचा करणा वाजविला, तेव्हां सर्वांनीं दंगल केली आणि कात्रजच्या घाटानें सारे निघून गेले. या कामगिरीनंतर या बंधूंस शिवाजीनें पालख्या देऊन नांवाजिलें. हा छाप्याचा प्रसंग रविवार ता. ५ एप्रिल १६६३ रोजीं घडला.

**बाबाजी नाईक पुंडे.**—श्रीगोंद्याचे प्रसिद्ध शेषोबा नाइकाचा नातू. शेषोबा नाईक ' परम भले द्रव्यवान ' होते. मालोजी भोसल्यास देवीचा दृष्टांत होऊन भूमिगत द्रव्य सांपडलें, तें त्यानें शेषोबाच्या घरीं ठेविलें. शेषोबानें द्रव्य ठेऊन

घेतलें. " तुम्हांस दौलत राज्य प्राप्त जालियावर तुमची पोतेदारी वतनी आम्हांस परंपरागत करून द्यावी, " (चि० २०). पुढें हा बाबाजी नाईक शिवाजीतर्फे विजापुरदरबारीं वकील होता. स. १६७२ त विजापुरकरांशीं झालेला तह मोडल्यामुळें बाबाजी ना॥ परत आला. स. १६७५ त हा मरण पावला.

**बाबाजी राम होनप.**—हा मोरो तानदेवाचा चुलता. यांचें देशकुळकर्ण ३६ गांवचें असल्यामुळें काम शिस्तवार उरकण्यासाठीं नामाजी कृष्ण यांस गुमास्ते नेमिले. नामाजीनंतर त्याचा मुलगा आपाजी नामदेव गुमास्तगिरी करूं लागला. धन्याचें लक्ष कुळकर्णपणावर फारसें नाहीं असें पाहून आपाजी स्वतःसच देशपांडे म्हणवूं लागला. स. १५६० पासून पुणें परगणा मोगल अमलाखालीं होता. म्हणून या आपाजीबद्दल तक्रार सिंहगडचा हवालदार उदयभान राठोड याजकडे गेली. स. १६६८ त उदयभानानें आपाजीस फारखती देवविली; परंतु आपाजी गयावया करूं लागल्यावरून फिरून त्यास गुमास्तेगिरी देवविली. तरी आपाजीनें फिरून खलेल करण्यास सुरुवात केली. स. १६७७ त दिलीरखान दक्षिणचा सुभेदार म्हणून नामजाद झाला, तेव्हां बाबाजीराम त्यास बऱ्हाणपुरीं जाऊन मिळाला. दुसऱ्या वर्षी संभाजीही पेडगांव येथें दिलीरखानाकडे दाखल झाला. तेव्हां स्वपक्ष सोडून शत्रूस जाऊन मिळण्याची ही साथ बंद करण्याकरितां शिवाजीनें पुरंदर मुक्कामीं बाबाजीरामास समक्ष बोलाविलें, आणि स. १६७८ त त्यास देशपांडेपणाचें वतन परत देवविलें.

**बाळकृष्ण त्रिमल हनुमंते.**—प्रसिद्ध नारायण त्रिमलाचा भाऊ व रघुनाथ नारायण हणमंते याचा चुलता, शहाजीच्या पदरीं होता. स. १६३८ त दादाजी कोंडदेवाकडे यास मुजुमदार म्हणून शहाजीनें रवाना केलें. शहाजीबरोबर कर्नाटकांत जाण्यापूर्वी हा जिजाबाईजवळ परम विश्वासू व खात्रीचा इसम म्हणून शहाजीनें ठेविला होता.

**भवानीबाई.**—ही संभाजीची मुलगी म्हणजे शिवाजीची नात होय. हिचा जन्म ता. २९ जानेवारी स. १६७९ रोजीं शृंगारपूर येथें झाला. ही आपली आई येसूबाई व बंधु शाहू यांजबरोबर औरंगजेबाच्या बंदींत होती. हिचें लग्न औरंगजेबाच्या छावणींत हरजी राजे महाडिक यांचे पुत्र शंकरजी राजे यांजबरोबर झालें. शंकराजी हा औरंगजेबाचे नोकरींत कर्नाटकांत असतांच शाहूचे सुटकेपूर्वी दक्षिणेंत आला. त्या वेळीं भवानीबाईही आली. राज्यावर बसतांच शाहूनें भवानीबाईस त्यांच्या

वाडिलार्जित तारळें महालाच्या देशमुखीच्या सनदा करून दिल्या. ( सन. १७०९ ). मोगलाईच्या धामधुमींत तारळें गांवची वाताहात झाली होती; म्हणून भवानीबाईनें ता. १ जुलै १७१० रोजीं तारळेकरांस कौलपत्र दिलें; आणि फिरून गांवची वसाहत करविली. हिजवर शाहूचें फार प्रेम होतें. हिला दुर्गाजी व अंबाजी नांवाचे दोन पुत्र होते. शंकराजी राजे नक्की कधीं वारला, तें समजत नाहीं; तथापि सन १७२६ पर्यंत भवानीबाईस सौभाग्यादिसंपन्न हा मायना पत्रांतून आढळतो. पतिबरोबर हिनें सहगमन केलें. सन १७२८ त बहुधा शंकराजी राजे वारला असावा. ( इ. सं., प्रा. म. स., )

**मनोहरदास गौर.**—अशेरीचा किल्लेदार राजा गोपाळदासाचा मुलगा व राजा विठ्ठलदासाचा पुतण्या. शहाजहान बादशहाची या कुटुंबावर बहाल मर्जी होती; ( गोपाळदास पहा. ). स. १६५२ त मनोहरदासास अशेरीची किल्लेदारी मिळाली. पुढें औरंगजेबानें स० १६६५ त त्यास माहुली किल्ल्याची ( जि० ठाणें ) हवालदारी सांगितली. मनोहरदासानें माहुलीच्या तीनही किल्ल्यांची तटबंदी केली. उत्तरभागीं पलासगड, मध्यभागीं माहुली व दक्षिणभागीं भंडारगड मिळून माहुलीचा बळकट किल्ला बनतो. ( माहुली किल्ल्यांतील शिलालेख—डॉ. मोदी १९१५. ) स. १६६५ च्या पुरंदरच्या तहान्वयें शिवाजीनें औरंगजेबास २७ किल्ले दिले, त्यांपैकीं माहुली हा एक होता. स० १६७० च्या जानेवारींत औरंगजेब व शिवाजी यांचा तह मोडला आणि शिवाजीनें आपले किल्ले परत मिळविण्याची मोहीम सुरू केली. लगोलग फेब्रुवारींत त्यानें माहुलीस रात्रींचा अचानक छापा घातला. पण मनोहरदास फार दक्ष होता. त्यानें त्या छाप्यास चांगलेंच तोंड दिलें; आणि तटाच्या शिड्या कापून टाकल्या. प्रतिकार झाला असें पाहून माहुलीचा नाद तात्पुरता सोडून शिवाजी कल्याण-भिवंडीकडे वळला. मनोहरदासास मोर्चे उठल्यानंतर कांहींसें निष्कंटक वाटलें खरें; पण शिवाजी पुनः येणार व स्वतःस पातशहाकडून उपराळा व्हावयाचा नाहीं, हें ओळखून त्यानें हवालदारी सोडून दिली. त्याच्यां जागीं अलावर्दीखान किल्लेदार आला, ( सरकार, शिवाजी पृ० १९० ). शिवाजीनें तत्काळ या संधीचा फायदा घेतला आणि सन १६७० च्या ता. १६ जून रोजीं माहुली किल्ला हस्तगत केला.

**मल्हारभट्ट देउळगांवकर.**—हा देउळगांवचा कुळकर्णी व ग्रामजोशी. हा पुढें शहाजीच्या पदरीं राहून त्याजबरोबर कर्नाटकांत गेला. स. १६४८ त शहाजीस विजापुरीं अटकेंत ठेविलें, त्या वेळीं बरोबर आलेल्या लवाजम्यांत मल्हारभट

होता. यानें शहाजी अटकेंतून सुटेपर्यंत श्रीशंकरास अनुष्ठान केलें. " अनुष्ठानास हातांत जीभ धरून निग्रह करून बसला होता. " ( म. द. रु. १ ) सुटकेनंतर भटजीची स्वामिनिष्ठा पाहून शहाजीनें सिंगणापुर येथें राहवयास सांगून तेथील उत्पन्न वंशपरंपरा बक्षीस दिलें; आणि विनोदान त्यास शंभुभट असें नांव ठेविलें. त्याचा मुलगा मुद्गलभट. या घराण्याकडे छत्रपतींचें उपाध्येपण अखेरपर्यंत होतें.

**महाबतखान.**—चितोडचा राणा प्रताप याचा भाऊ संगराजित प्रथमपासूनच मोगलांस जाऊन मिळाला होता, त्याचा महाबतखान हा मुलगा. यानें जहांगीर, शहाजहान व औरंगजेब या तिघांच्या कारकीर्दींत मोगल पातशाहीचीं अनेक कामें केलीं. सन १६११ पासून हा मुसलमान होऊन मोगल दरबारीं वावरत होता. स. १६३२ त यानें दौलताबाद किल्ला घेतला. त्यानंतर स. १६७१ त तो फिरून दक्षिणेंत आला. व अहिवंत, मार्कंडा वगैरे किल्ले त्या वेळीं घेतले. पुढच्याच वर्षीं म्हणजे स० १६७२ तो अफगाणिस्थानच्या कामगिरीवर गेला असतां परत हिंदुस्थानकडे येतांना वाटेंतच मरण पावला. दीर्घ काल जगून व मुसलमान बनून आपलें सारें आयुष्य मोगल पातशाहीच्याच सेवेंत यानें खपविल ! !

**माणकोजी दहातोंडे.**—स० १६३७ त शहाजी बंगळुरास राहूं लागला, त्याच सालीं " शहाजीनें आपले तर्फे दादाजी कोंडदेव मलठणकर यास सुभा सांगोन पुण्यास ठाणें घातलें, " ( म. द. रु. २ श ). तेथील बंदोबस्तासाठीं व व्यवस्थेसाठीं शहाजीनें शामराजपंत रोझेकर, माणकोजी दहातोंडे व बाळाजी हरि यांस शिवाजीसमवेत स. १६४१ च्या हिवाळ्यांत बंगळूरहून पुण्यास रवाना केलें. शिवाजीनें मावळ्यांची जमवाजमव केली, तेव्हां माणकोजीस स. १६४३ त पागेची सरनोबती दिली; आणि लोहगड विसापुरावर पाठविलें. तेथील ठाणेदार सीदी हिलाल हबशी सामोपचारानें किल्ला देईना. तेव्हां त्यास माणकोजीनें शहाजी-कडे पाठवून दिलें, व विसापुराचा ताबा घेतला. ( सीदी बिलाल पहा ).

**मालोजी नाईक निंबाळकर.**—महाराष्ट्रांतील शिरके, मोहिते, माने वगैरे अत्यंत जुन्या मराठी घराण्यांप्रमाणेंच निंबाळकरांचें घराणेंही अभिजात आहे. यांचें मूळ नांव पवार. हे आपली पीठिका सूर्यवंशी परमार कुळापर्यंत लावतात. अला-उद्दिनाचे वेळेपासूनच यांस १२ हजार स्वारांची मनसबदारी मिळाली, असा कैफियतींत उल्लेख आहे. वेळोवेळीं यांनीं मुसलमानांची कामगिरी करून बहुमान वगैरे मिळविले. यांनीं प्रथम निंबळक येथें व पुढें फलटणास कायमचें वास्तव्य केलें.

मालोजी सन १५३० त जन्मला आणि सन १५६० त आपल्या बापाच्या मृत्यू-नंतर वयाच्या तिसाव्या वर्षी सरदारी करूं लागला. आदिलशाहीच्या वतीनें मालोजी राक्षसतागडीच्या ( तालिकोट ) लढाईंत हजर राहून त्यानें चांगली तरवार गाजविली. तेव्हां दरबारांतून त्याची मानमान्यता विशेष झाली. मालोजीस वणगोजी ऊर्फ जगपाळराव व दीपाबाई अशीं दोन अपत्यें झालीं. हीच दीपाबाई मालोजी भोसल्यास दिली. मालोजी निंबाळकर सन १५७० त मरण पावला.

**मीर्झा राजा जयसिंह**—मोगल पातशाहीचा अनुभवी, कसलेला आणि उत्कृष्ट सेनापति. याचा जन्म स. १६०५ त झाला. वयाच्या बाराव्या वर्षापासून त्यानें मोगल सैन्यांत नोकरी केली. मोगल पातशाहीचा सेनापति या नात्यानें त्याची कामगिरी विविध स्वरूपाची आहे. मध्य आशियांतील बल्खपासून तों तहद विजापुरपर्यंतचा आणि कंदाहारापासून तों पूर्वेस मोंगीरपर्यंतचा सारा प्रदेश त्यानें पालथा घातला. ( सरकार, औरंगजेब ग्रंथांक ४–६० ). शास्ताखान व जसवंत-सिंग यांस शिवाजीवर पाठवूनही कांहीं उपयोग झाला नाहीं; इतकेंच नव्हे, तर मोगल पातशाहीचें वजन मराठ्यांच्या दृष्टीनें थोडें बहुत कमी झालें, हें ओळखून, औरंगजेबानें जयसिंहासारख्या कसलेल्या सेनापतीस उत्तम हत्यारें व मुबलक पैसा देऊन दक्षिणेंत शिवाजीवर पाठविलें. शिवाजीनें जयसिंहाशीं सल्ला केला आणि तो बादशहाचे भेटीस आग्र्यास गेला असतां बंदिवास व तेथून पलायन हे प्रसंग त्यास घडून आले. शिवाजीच्या पलायनाबद्दल जयसिंहास बादशहानें ठपका दिला व त्याचा मुलगा रामसिंग याची मनसब जप्त केली. शेवटीं जयसिंग दुःखानें चूर होऊन ता. २ जुलै १६६७ रोजीं बऱ्हाणपुर येथें मरण पावला.

**मुशो डुरो ऊ० मुश्रो डुरो ( Monsieur Duroc ).**—सुरतेच्या फ्रेंच वखारीचा मुख्य एजंट. फ्रेंच लोक शिवाजीशीं स्नेहानें वागत असून त्यांजमध्यें सलोखा होता. स. १६७० च्या सुरतेच्या स्वारीच्या प्रसंगीं शिवाजीनें फ्रेंच वखारीस यत्किंचितही उपसर्ग दिला नाहीं. फ्रेंचांनींही शिवाजीच्या बहीरबुण-ग्यांशीं तक्रारीचा प्रसंग येऊं दिला नाहीं. फ्रेंचांच्या वखारी सुरत व राजापुर येथें होत्या. ( खं. ८-८ )

**मुरार बाजी**—जन्म सन १६१६. बाजी मुरार देशपांडे महाडकर याचा मुलगा. हा प्रथम जावळीच्या मोऱ्यांकडे स० १६३७ ते १६५६ पर्यंत होता. शिवाजीनें त्याची कर्तबगारी जाणून त्यास पुरंदरची किल्लेदारी दिली. स० १६६५

च्या एप्रिलांत दिलेरखान पुरंदरावर त्वेषानें चालून आला असता मुरार बाजी शर्थीनें लढला. दिलेरखानानें त्याची मर्दानगिरी पाहून त्यास आपणांकडे बोलाविलें. मुरार बाजी म्हणाला, " मी शिवाजी राजाचा शिपाई, तुझा कौल घेतों कीं काय ? " ( सभा. पृ. २१ ). पुरंदरच्या लढाईंत हा लढतां लढतां मरण पावला.

**मोरो तानदेव होनप.**—पुण्याचे देशपांडे. कर्यात मावळांतील ३६ गांवांचें देशकुलकर्ण याजकडे होतें. मलिक अंबरच्या मृत्यूनंतर पुणें, सुपें, चाकण, जुन्नर, शिरवळ या परगण्यांवर मुसलमानी अधिकारी असले, तरी मुख्य निजामशाही सत्ता ढिली पडल्यामुळें, कित्येक पुंड-पाळेगार आपापल्या अधिकारक्षेत्रांत बंडाळी करीत. मोरो तानदेवानें हाच मार्ग पत्करून पुण्याच्या आसपास हमामा आरंभिला, चाकणाचा कोट बळकाविला आणि स्वाराशिबंदी ठेविली. " सोड आउत आणि हो मोरोबाचा राऊत, " अशी त्या वेळीं दटावणीची एक म्हणच पडण्याएवढी त्यानें दंगल माजविली होती. स. १६३६ पूर्वी वरील मुलूख शहाजीराजे यांजकडे निजामशाहींतून जागीर होता, तोंपर्यंत मोरो तानदेवास कांहीं गडबड करतां आली नाहीं. परंतु शहाजी आदिलशाहीकडे गेला, त्या वेळीं मोरो तानदेवानें मवासगिरी म्हणजे बंडखोरी आरंभिली. स. १६३० त मुरार जगदेव आदिलशाहीतर्फे अंमल बसविण्यास आला. मोरो तानदेवाची धामधूम पाहून त्यानें या होनप देशपांड्याचीं पाळें मुळें खणून काढण्यासाठीं पुण्यावर चाल केली; आणि देशपांड्याचा वाडाहुडा, कोट पाडून जमीनदोस्त केला. सबंध गांवास आग लावून पुणें उद्ध्वस्त केलें; चाकणचाही कोट पाडिला आणि रायाराव यास शिरवळ परगण्याचा अधिकारी नेमिलें; सबंध प्रांतावर अमल चालवितां यावा म्हणन जेजुरीजवळ भुलेश्वरच्या डोंगरावर सुभानमंगळ नांवाचा किल्ला बांधिला. या गडबडींत मोरो तानदेव पळून रानांत दडून राहिला. त्यास मोठ्या मेहनतीनें पकडिलें. " नखीं सुया टोंचून मार देऊन कैदेंत होते. " पुढें हा कैदेंतून सुटला. कांहीं दिवस गडबड न करितां स्वस्थ होता. स. १६३८ त वरील प्रदेश पूर्णपणें शहाजीच्या ताब्यांत आला, आणि शहाजीनें दादाजी कोंडदेवास कारभारी केलें. स. १६३१ च्या दुष्काळामुळें आधींच मुलख वैराण झाला होता. त्यामुळें दादाजीस कधीं मिनतवारीनें तर कधीं धाकदपटशानें वसती करवावी लागे. कौल देऊनही न येणाऱ्यांपैकीं मोरो तानदेव होता. म्हणून त्यांजवर दादाजीनें शस्त्र धरिलें. तेव्हां तो भीतीनें रंगभट मळेकर याच्या घरीं लपून बसला. रंगभटाची आई फुलाई इनें सहा महिनेपर्यंत त्याच्या गुप्तपणाची खबर लागूं दिली नाहीं. तिचा

नातू अनाजी रंगनाथ हा शिवाजीच्या पदरीं राहिला होता. त्यानें मोरो तानदेवास शिवाजीच्या पायांवर घातलें. शिवाजीनें त्यास क्षमा करून देशपांडेपण परत दिलें.

**म्हालदारखान.**—त्रिंबकचा निजामशाही किल्लेदार; मोगलांस जाऊन मिळाला होता. त्या वेळीं शहाजी निजामशाहीतर्फे मोगलांविरुद्ध लढत होता. अर्थात् शहाजीचीं बायकामुलें पकडून मोगलांच्या ताब्यांत दिल्यास स्वतःची बढती होईल, या आशेनें शहाजीच्या व जिजाबाईच्या हालचालींची बातमी राखून, म्हालदारखान जुन्नरीं दाखल झाला. तो आल्याची बातमी जिजाबाईस आगाऊच समजली होती. म्हणून तिनें शिवाजीस गुप्त व सुरक्षित स्थळीं रवाना केलें व स्वतःचें काय होईल तें होवो, अशा निश्चयानें ती जुन्नरासच राहिली. बापाचा—लुखजी जाधवाचा—खून झालेला, नवरा—शहाजी—जवळ नाहीं, आणि संरक्षणापुरता फौजफांटा हाताशीं नाहीं, अशा स्थितींत म्हालदारखान शिवाजीसह जिजाबाईस कैद करण्यास दत्त म्हणून पुढें उभा राहिला. जिजाबाईनें " शिवाजी नाहींसा झाला, मी काय करूं ? " असा म्हालदारखानासच जाब विचारिला. शिवाजी नव्हता तरी जिजाबाईसच कैद करून त्यानें कोंडाण्यावर ठेविलें. स. १६३३ व १६३४ पर्यंतचीं दोन तीन वर्षें शिवाजी गुप्त स्थळीं होता. जिजाबाईच्या चुलत्यानें अखेरीस दीड लाख खंडणी भरून जिजाबाईस सोडवून गांडापूर येथें आणून ठेविलें. ( डफ, विजापुरकागद, व किंकेड १ ).

**म्हाळोजी घोरपडे.**—दक्षिणेंत स्थाइक होऊन राहिलेल्या शिरके, मोहिते, माने वगैरे जुन्या मराठ्यांपैकींच घोरपड्यांचें घराणें आहे. जांबगांवीं, भालवणी, न्हावी वगैरे गांवांची पाटिलकी या घराण्याकडे होती. शिवाय निजामशाही सैन्यांत बारागिरीही करून होते. संभाजी बंडखोरी करून स. १६७८ त पेडगांव येथें दिलीरखानास जाऊन मिळाला. त्यास पकडून आणून पन्हाळ्यावर बंदोबस्तानें ठेविलें; आणि म्हाळोजीस किल्ल्याची सरनोबती दिली. पुढें संभाजीच्या कारकीर्दींत याजकडेस पन्हाळ्याचीच सरनोबती कायम झाली. ता. २८–१२–८८ रोजीं संगमेश्वरीं संभाजीची धरपकड व चकमक झाली, त्यांत म्हाळोजी ठार झाला. यास पुत्र तीन. संताजी, बहिरजी व मालोजी. हे तिघेही पुढें राजारामाच्या कारकीर्दींत महत्त्वास चढले.

**येसाजी मल्हार.**—ता. २७-१०-१६६७ त मोगलाशीं झालेल्या तहान्वयें औरंगजेबानें खानदेश–वऱ्हाड हे प्रांत शिवाजीस दिले. तेथील बंदोबस्तासाठीं प्रतापराव गुजर सरनोबत व त्याचा कारभारी येसाजी मल्हार हे शिवाजीनें पाठविले.

**रामसिंग.**—जयसिंगाचा मुलगा. दिल्लीसच होता; दक्षिणेंत आला नव्हता. औरंगजेबाच्या दरबारीं २५०० चा मनसबदार होता. यासच जयसिंग ' शिवाजीच्या केसास धक्का न लागूं देण्याची ' खबरदारी घेण्यास पत्रें वरचेवर लिही. शिवाजी निसटून गेल्यानंतर औरंगजेबानें रामसिंगावर वहीम घेऊन, त्याची मनसब जप्त केली. या प्रसंगानंतर ११ महिन्यांनीं जयसिंग मेला. तेव्हां औरंगजेबानें जप्ती उठवून रामसिंगास चार हजारी नेमिलें. तदनंतर त्याची आसामच्या स्वारीवर नेमणूक झाली आणि तेथेंच.तो हालअपेष्टेंत मेला. ( सरकार, शिवाजी ).

**रामोजी शेणवी कोठारी.**—हा गोवेप्रांतांतील डिचोलीचा राहणारा. गोंवेकर फिरंग्यांकडून हा वजनदार गृहस्थ मौल्यवान नजराणा घेऊन शिवाजीकडे वेंगुर्ल्यास आला होता. पण तत्पूर्वा शिवाजीचा मुक्काम तेथून हलल्यामुळें त्याची गांठ पडली नाहीं. बिदनूरकर शिवापा नाइकाकडेही हा फिरंग्यांतर्फे वकील म्हणून गेला होता. शिवाजी आगऱ्याहून सुटून आल्यानंतर रामोजी रायगडावर शिवाजीस भेटला. त्या प्रसंगीं फिरंगी व शिवाजी यांमध्यें तहाची वाटाघाट झाली व रामोजी परत गेला.
( पिंगुळकरकृत सावंतवाडीचा इ. )

**रायबागीण.**—दक्षिण वऱ्हाडांत यवतमाळ जिल्ह्यांत पेनगंगेच्या कांठीं माहूर म्हणून एक प्राचीन स्थळ सुप्रसिद्ध आहे. तेथें एक देशस्थ ब्राह्मण घराणें उदयास आलें. त्याचें नांव उदाराम.* उदारामाची सून म्हणजे जगजीवनरावाची बायको, ही इतिहासांत रायबागीण म्हणून प्रसिद्ध आहे. स. १६५८ त पतिनिधनानंतर अल्पवयी मुलगा बाबूराव याच्या नांवें ही सरदारीचा व सरंजामाचा कारभार पहात असे. याच वेळीं रजपूत मवाशांनीं बंड केलें; तेव्हां या बाईनें गोषाचा बुरखा फेकून व स्वतः घोड्यावर स्वार होऊन, मवाशांस जेरदस्त केलें. या शौर्याबद्दल औरंगजेबानें तिला ' पंडिता ' व ' रायबागन ' असे किताब दिले. इतिहासांत हिचें खरें नांव लुप्त असून रायबागीण अथवा क्वचित् राजव्याघ्री याच नांवानें ती प्रसिद्ध आहे. स. १६७० त शिवाजीनें सुरतेवर दुसऱ्यानें स्वारी केली; त्या वेळीं दाऊदखान, महाबतखान, एकलासखान वगैरे मोगल सरदार बऱ्हाणपुराकडून शिवाजीवर चालून आले. त्यांची कुमक करण्यास औरंगजेबानें रायबागिणीस फर्माविलें. त्याप्रमाणें ती पांच हजार सैन्यासह निघाली. शिवाजीनें रायबागिणीची व मुख्य सैन्याची गांठ पडूं न देतां तिच्या सैन्यास उमरखिंडींत अडवून लढाई दिली. रायबागीण

---

* या घराण्याची हकीकत उदाराम या नांवाखालीं स्वतंत्र दिली आहे. ( वऱ्हाड इ० )

मोठ्या हिंमतीनें लढली; पण खुद्द ती व तिचें सामान शिवाजीच्या हातीं सांपडलें. शिवाजीनें तिच्या शौर्याची तारीफ करून व तिला बहुमानाचीं वस्त्रें देऊन सोडिलें. शिवाजीच्या या औदार्यामुळें तिनें मोठ्या अभिमानानें स्वतःस " मी तुमची धर्म-कन्या म्हणवीती " असें म्हटलें.

**राजा रायसिंग सिसोदिया.**—औरंगजेबाच्या दरबारांतलि पंचहजारी महा-राणा भीमसिंगाचा मुलगा. यासच उद्देशून शिवाजीनें, " याच्या लष्करच्या पाठी माझ्या लोकांनीं पाहिल्या असतील ! याचे खालें आपण उभें राहावें म्हणजे काय ? " ( सभा. ब. पृष्ठ ४७ ) असें औरंगजेबाच्या दरबारांत रामसिंगास म्हटलें. बखरींत जसवंतसिंगाचा उल्लेख आहे. पण तो पंचहजारी नसून सप्तहजारी होता. म्हणजे शिवाजीपासून तो बऱ्याच वरच्या रांगेंत असला पाहिजे. (सरकार, शिवाजी १५९.)

**लखम सावंत.**—कुडाळ प्रांताचा शूर सरदेसाई व आदिलशाहीचा कोंकण-प्रांताचा अधिकारी. पूर्वीं विजयनगरच्या अमलाखालीं हा मुलूख मोडत असून पुढें आदिलशाहीकडे आला. खेमसावंत नांवाच्या पुरुषानें विजापुरकरांकडून कांहीं प्रांतांची देशमुखी मिळविली, व स. १६१२–१३ च्या सुमारास कुडाळ हें आपलें संस्थान केलें. या खेमसावंताचा पुतण्या लखम सावंत. यानें शिवाजीची वाढती शक्ति पाहून त्यास मिळण्याचें ठरविलें व आपला वकील पीतांबर शेणवा यास शिवाजीकडे पाठविलें. उभयतांत पांच कलमांचा तह झाला. त्यामध्यें प्रांतांचा निम्मा ऐवज शिवाजीस द्यावा व तीन हजार फौज ठेवून शिवाजीस गरज पडेल तेव्हां मदत करावी असें ठरलें. हा करार ता. ५–३–१६५९ रोजीं झाला, ( का. सं. प. या. ४११ ). परंतु सावंतांकडून हा करार पाळला गेला नाहीं, म्हणून शिवाजीनें त्यांजवर स. १६६२ त स्वारी केली. तत्पूर्वीं लखम सावंतानें " फौज घोडा–राउत हशम मेळवून आपण राजियावरी चालोन जातों आणि कोंकण सोडवितों, " ( सभा. पृ. ६८ ) असा निरोप विजापुरकरांकडे पाठविला. त्या अन्वयें खवासखान व बाजी घोरपडे हे त्याच्या मदतीस आले. परंतु ते येण्या-पूर्वींच शिवाजीनें सावंतास पिटून लाविलें. तेव्हां तो फिरंग्यांच्या आश्रयास गेला. स. १६६७ त फिरंग्यांनीं शिवाजीशीं स्वतंत्र तह केला. त्यामुळें लखम सावंतास बाहेर पडणें भाग पडलें. त्यानें "आपण सावंत म्हणजे भोसले यांचा गोत्रज. आपलें तुम्हीं चालविणें उचित आहे,"अशी दयेची याचना शिवाजीकडे केली. त्यावरून शिवा-जीनें कुडाळची देशमुखी त्याजकडे कायम केली. शिवाय, दरसाल सहा हजार होन

द्यावे. "वाडा-हुडा बुरुजांचा बांधूं नये. कुडाळीं रहावें. जमाव करूं नये." अशाही अटी घातल्या. सावंतांनीं यानंतर शिवाजीशीं दगलबाजी केली नाहीं. लखमसावंताची कारकीर्द स. १६५१–७५ पर्यंत झाली. शिवाजीनें बाजी घोरपडे यास मारल्याचें वर्तमान बापास ज्या पत्रानें कळविलें, त्यांत सावंत, पोर्तुगीझ, खवासखान वगैरेंचा उल्लेख आहे. हें पत्र पिंगुळकरकृत सावंतवाडीचे इतिहासांत छापलें आहे.

**लाय पाटील.**—दर्याकिनाऱ्यावरील सोनकोळी जातीपैकीं हें सरपाटिलांचें घराणें कोळवाड कसबा चाल ता॥ अष्टागर येथें नांदत होतें. किल्ले पद्मदुर्ग येथें सुभानजी खराडे हा सरनोबत आणि सुभानजी मोहिते हा हवालदार होता. त्यांजकडे लाय पाटिलाची चौकशी होऊन वरील अधिकाऱ्यांनीं त्यास "आदर करून सेवेशीं ठेविलें." शिवाजीनें वरघाटीं प्रांत काबीज करण्याचा व्याप चालू ठेवला, तसाच कोंकणावर कायमचा दाब ठेवणें, त्यास अवश्यक वाटूं लागलें, आणि कोंकणप्रांत म्हणजे दर्याकिनारा ताब्यांत असल्याखेरीज सीदी, पोर्तुगीज व इंग्रज यांजवर दाब ठेवून राज्य राखणें मुष्किलीचें आहे, असें शिवाजीस समजून चुकलें. रायगडच्या आसमंतांतील टाप व कुलाबा जिल्हा यांत पुष्कळ डोंगरी किल्ले आहेत. परंतु राजपुरीच्या खाडींत जंजिरा हा अवघड आणि मजबूद दुर्ग सीदी याच्या ताब्यांत असल्यामुळें समुद्राच्या बाजून शिवाजीस तो सारखा त्रास देई. म्हणून शिवाजीनें पद्मदुर्ग, सिंधुदुर्ग, विजयदुर्ग हे पाणकिल्ले बांधले, आणि स्वतःचें चांगलें आरमार तयार केलें. कोळी आणि खलाशी यांस नोकरींत सामील करून घेतलें. अशा वेळीं लाय पाटील हा शिवाजीच्या आरमारखात्यांत नोकरीस राहिला. स. १६६१–६२ त शामराजपंत पेशवे व रोहिड्याचा पूर्वीचा किल्लेदार बाजी घोलप यांस जंजिरेकर सीदीवर फौजेसह रवाना केलें होतें. पण शामराजपंत स्वतः कैद होऊन, ही मोहीम फुकट गेली. नंतर खुद्द मोरोपंत पेशव्यास ही कामगिरी सांगण्यांत आली. त्या वेळीं लाय पाटिलास त्यानें "तुम्ही चाकर छत्रपतीचे. सरकारची चाकरी निकडीची पडली तरी कराल कीं नाहीं?" असें विचारलें. लाय पाटिलानें "आज्ञा प्रमाण" म्हणतांच मोरोपंतानें "जंजिरेयासी सिड्या लावून मात्र द्याव्या. आम्ही हजार बाराशें धारकरी तयार केले आहेत." किल्ल्यावरील पहारा चुकवून किल्ल्यास शिड्या लावण्याची अवघड कामगिरी पाटिलानें केली; पण "धारकरी यांची वाट पाहतां धारकरी दिसत नाहीं," असा हुकूम व अमलबजावणी यांचा घोटाळा होऊन पाटिलानें शर्थीनें केलेली ही कामगिरी वायां गेली. दुसरे दिवशीं पाटिलानें मोरोपंतास साफ सांगितलें कीं, "आम्ही सिड्या लावून धारकरी यांची वाट पहात राहिलों, उजडावयासी आलें, प्रभात जाली. तेव्हां निघालों."

पाटिलानें ही कामगिरी रात्रीं गुपचूपपणें केली होती. तरी मोरोपंतानें सगळा दोष आपल्याकडे प्रांजलपणें घेऊन शिवाजीजवळ पाटिलाची शिफारस केली. शिवाजीनें मोरोपंतास " कोताई केलींत, कार्य राहून गेलें, " असा बोल लाविला. पन्हदुर्गाचे हवालदार, सरनोबत, सबनीस व लाय पाटील यांस पालखीचा मान देऊं केला. पाटिलानें पालखीचा मान मोठा, म्हणून नम्रपणें " सेवकास पावली " एवढेंच म्हटलें. पालखी नाकारिली, तेव्हां शिवाजीनें " **पालखी** " नांवाचें गलबत बांधून तें पाटिलास देण्याचें फर्माविलें, आणि छत्री व निशाण बक्षीस दिलें. शिवाजीनें अधिक चौकशी केली कीं, " पाटिलकी कोणीं दिली ? " लाय पाटील म्हणाला, " पाटिलकी पाच्छाहीं दिली. " त्यावर शिवाजीनें त्यांस पाटिलकीपेक्षां अधिक मानाची सरपाटील ही पदवी दिली. शिवाय त्यास समस्त अष्टागरांत पुष्कळ हक्क व सवलती दिल्या. ( भा. इ. मं. त्रै. व. १।२ पृ. १२८–३९ ).

**वणंगोजी ऊर्फ जगपाळराव निंबाळकर.**—मालोजी भोसले, निंबाळकरांच्या आश्रयानें प्याद्याचे फर्जी झाले. निंबाळकरांनीं यांस प्रथम सालीना १२०० होनांची तैनात करून दिली. हा मालोजी निंबाळकराचा मुलगा. याचीच बहीण दीपाबाई. दीपाबाईचा व मालोजीचा शरीरसंबंध बहुधा मालोजी निंबाळकरांच्या हयातींत सन १५६३ त झाला असावा. त्यांतून हा संबंध झाल्यापासून भोसल्यांस ऊर्जितावस्था प्राप्त करून घेण्यास साधनें मिळत गेलीं. त्यांत प्रामुख्यानें वणंगोजी ऊर्फ जगपाळराव याचा जास्त उपयोग झाला. वणंगोजीच्या कोल्हापूरच्या स्वारींत मालोजी हजर असून त्यानें चांगला पराक्रम केला. जिजाईच्या लग्नाबाबत जाधवांनीं भोसल्यांस चिडविल्यामुळें वणंगोजीनें भोसल्यांचा चांगलाच पाठपुरावा केला. वणंगोजी भातवडीच्या युद्धांत हजर असून त्यानें विशेष पराक्रम केला. त्यांत आदिलशाहीचा यद्यपि पाडाव झाला, तरी वणंगोजीस २५ लक्ष रुपये इनाम मिळाल्याचा कैफियतींत उल्लेख आहे. वणंगोजी सन १६३० त मृत्यु पावला.

**वाघोजी तुपे.**—कान्होजी जेध्याच्या पदरीं ' बारा मुळवे ' म्हणून जिवास जीव देणारे साहाय्यक होते. त्यांपैकीं वाघोजी तुपे हा एक होय. कान्होजीचें भाऊबंदांनीं बळकाविलेलें देशमुखीचें वतन परत मिळविण्यांत वाघोजीचा वडील भाऊ मारला गेला. कासारखिंडीच्या झुंजांत यानेंही कामगिरी केली होती. अफजलखानप्रकरणीं वाघोजीची उत्तम कामगिरी पाहून कान्होजी जेध्याकडून शिवाजीनें यास आपल्या पदरीं घेतलें. वाघोजीस हशमांचा म्हणजे पायदळावरील हजारी नेमून

त्याची रवानगी कोंकणांत केली. तेथें मोगल सरदार नामदारखान आपलीं ठाणीं घालीत होता. त्यास पेणजवळच्या मिरे डोंगरावर गांठून शिवाजीनें वाघोजीसह निकडीचें झुंज दिलें. या चकमकींत वाघोजी जखमी झाला.

**विक्रमशहा.**—जव्हारचा संस्थानिक. सालेरच्या युद्धांत इक्लासखानाचा पाडाव केल्यानंतर मोरोपंत पेशवा कोळवणांत वळला. त्यानें जव्हारचें ठाणें घेतलें आणि १७ लाखांची लूट मिळविली. अशा रीतीनें विक्रमशहा नामोहरम होऊन स० १६७२ च्या जूनमध्यें मोगल अंमलाखालील नाशिक जिल्ह्यांत पळून गेला. यापुढें तो भिल्ल, कोळी वगैरे लोकांचे जमाव करून ठाणें जिल्ह्याच्या उत्तर भागांत धामधूम करीत होता. स० १६७८ त मोरोपंत पेशव्यानें नाशिकवर स्वारी केली. तेव्हां विक्रमशहा मोगलांस मिळून मोरोपंताच्या विरुद्ध लढूं लागला असतां, युद्धांत तो मराठ्यांकडे पाडाव सांपडला. तेव्हां त्याचा वध करण्यांत आला. सुरत बंदरापासून जव्हार १०० मैल अंतरावर दक्षिणेस असून, जव्हार संस्थानचा प्रदेश नाशिक व ठाणें जिल्हा आणि पश्चिम घांटांची रांग यांस जोडणारा आहे.

**विजय राघव.**—तंजावरचा संस्थानिक. याचें व त्रिचनापल्लीकराचें बहुत दिवसांपासून भांडण चालू होतें. त्रिचनापल्लीकर जबरदस्त राजे होते. "विजय-राघव यांची हरएक विशीं बांक यश विजापुरकरांनीं राखावी" (शि. दि. पृ. ६४). असें असतां, त्रिचनापल्लीकरांनीं शहाजीस आपल्या शब्दांत गुंतवून राज्यही देण्याचें कबूल केलें. शहाजी विजापुरी नोकर; तथापि वचन मोडतां न ये, म्हणून त्रिचना-पल्लीकरांचा उपराळा करून शहाजीनें विजयराघवाशीं युद्ध केलें. युद्धांत विजय-राघव पडला. तेव्हां शहाजीनें त्रिचनापल्लीकरांकडून कांहींही न मागतां तंजावरचें राज्य व "चंजाऊर ठाणें शहर सुद्धां हस्तगत केलें. जागा चांगली पाहून अंतःकरणांत आपले राहण्यायोग्य आहे, असें सर्वानुमतें ठरवून" तेथें तुकाबाईस ठेविलें. म्हणजे तंजावरचें राज्य शहाजीस मिळण्यापूर्वीं तें या विजयराघवाकडे होतें.

**विठोजी भोसले.**—मालोजीचा कनिष्ठ बंधु. शहाजीचा चुलता. याचा जन्म वेरूळ येथें स० १५५२ त झाला. विठोजी व मालोजी पुढें देऊळगांव येथें राहूं लागले. येथें असतांना यांचे वडील बाबाजी मृत्यु पावले. कांहीं काळ हे दोघे बंधु आपलें पाटिलकीचें वतन सांभाळून होते. पुढें ते मातोश्रीचा निरोप घेऊन फलटणच्या निंबाळकरांकडे रोजगारास गेले. दोघेही तरूण, मर्द पाहून निंबाळकरांनीं त्यांस प्रथम बारगिरी सांगितली. निंबाळकर कोल्हापूर प्रांतीं मुलुखगिरीस गेले असतां बरोबर या बंधुद्वयासही घेऊन गेले होते. या कोल्हापूरच्या स्वारींत या दोघां बंधूंनीं

उत्कृष्ट कामगिरी केली; आणि केवळ बारगिराचे छोटे सरदार बनले. इतकेंच नव्हे, पण निंबाळकरांनीं मालोजीस आपला जांवई केलें व १५०० स्वारांची मनसब दिली. विठोजीस आठ पुत्र. यांचा वंशविस्तार गंगातीरीं वावी, मुंगी, बनसेंद्री, मुंजेरी, कोराळे, भांबुरी व कळस या गांवीं आहे. ( म. द. रु. १ )

**विठ्ठल भालेराव.**—भूपाळगडाचा सबनीस. ता. १३ डिसें. स.१६७८ रोजीं संभाजी परळीहून पळून गेला व पेडगांव येथें दिलेरखानास जाऊन मिळाला. खानानें त्यास सप्तहजारी केलें. त्या बळावर प्रथम तो भूपाळगडीं आला व गड स्वाधीन करण्यास त्यानें फर्माविलें. किल्लेदार फिरंगोजी नरसाळा व सबनीस विठ्ठल भालेराव यांनीं गड दिला. शिवाजी कडक शिक्षा करणार याची कुणकुण लागतांच दोघेही पळन गेले. पण पुढें दोघेही सांपडले. विठ्ठल भालेरावास फार मारझोड केली आणि स्वराज्याच्या हद्दीबाहेर घालवून दिलें.

**वेदाजी भास्कर.**—हा अरणीचा महालकरी. हा महाल उत्तर अर्काटांत आहे. वेदाजीच्या देखरेखीखालीं अरणी व वेणीदुर्ग हे दोन कोट असत. या महालाची पहिली सनद वेदाजी भास्करानें विजापूर दरबारकडून मिळविली; आणि पुढें कर्नाटकची जाहगीर शहाजीकडे येतांच तो शहाजीसच मुख्य समजून त्यांस खंड–कमाविशी देऊं लागला. शिवाजीच्या कर्नाटकच्या स्वारींत तो शिवाजीस बिनशर्त खंडणी देण्यास कबूल झाला. वेदाजीनें ४३ वर्षें महालाचा कारभार पाहिला. त्यास श्रीनिवासराव, सुभाराव, कोनेरराव वगैरे आठ पुत्र होते, ( चि. २८९ ). परंतु कोनेररावानेंच पुढें आपल्या बापाचा कारभार चालविला. या घराण्याची सत्ता १९९ वर्षेंपर्यंत होती. अखेरचा पुरुष त्रिमलराव यास कंपनी सरकारानें ता. १० मे १७९६ पासून पेन्शन सुरू केलें. ( Concise History of North Arcot ).

**शरीफजी**—शहाजीचा कनिष्ठ बंधु, शिवाजीचा चुलता. याचा जन्म स. १५९५ त घुसृणेश्वर येथें झाला, व लग्न स. १६०६ त दौलताबाद येथें झालें. शहाजीप्रमाणेंच हा सुद्धां प्रथम निजामशाहींत नोकर होता. पण पुढें हा मोगलांस मिळाला (म. द. रु. १). याच्या ताब्यांत चाकण चौऱ्यांशीं हा परगणा होता. पातशाही उमरावांत याची गणना होत असे. याच्या वंशाचें वास्तव्य दौलताबाद येथें असे. याचा मुलगा त्रिंबकजी राजे. त्रिंबकजीचा मुलगा बाबाजी. त्रिंबकजीचा उल्लेख शहाजीनें अली आदिलशहास लिहिलेल्या पत्रांत आहे.

**शामराव नीलकंठ पारसनीस रोझेकर.**—दौलताबादजवळच्या रोझे गांवचा. वेरूळकर भोसल्यांच्या परिचयांतला कुळकर्णी. याच्याकडे प्रथम सबनिशी होती. नंतर

स० १६४६ त शिवाजीनें यास पेशवा केलें. याचा शिक्का " महादेव मतिमंत प्रधान " असा होता. स० १६६२ त शिवाजीनें यास सीदीवर पाठवून जंजिरा काबीज करण्याची कामगिरी सांगितली. ती शामरावाकडून झाली नाहीं. म्हणून त्यास पेशवे पदावरून शिवाजीनें काढून टाकिलें.

**शिवापा नाईक बिदनूरकर.**—हा विजयनगरच्या राजा रायल ऊर्फ श्रीरंगशायी नायक याचा मांडलिक असून, बिदनूरचा डोंगराळ प्रांत याच्या ताब्यांत होता. रायल व शिवापा नेहमीं विजापूरच्या आदिलशाही मुलुखांत धुमाकूळ घालीत. म्हणून आदिलशाहीतर्फे शहाजी, मुस्तफाखान, आसदखान आणि सीदी रैहान हे रायलवर चालून आले. वेलोर येथें दोघांची मोठी लढाई होऊन रायलचा पराभव झाला, आणि त्यानें दरसाल खंडणी देण्याचें कबूल केलें. ( सन १६४७; रा. मा. चंपू, पृ. ८४–८५ ). शिवापा हा मांडलिक असला तरी मोठा बलाढ्य होता. याच्या दरबारीं गोवेकर फिरंग्यांचा रामोजी शेणवी कोठारी हा गृहस्थ वकीलीस आला होता. ( रामोजी पहा. ) शिवापा डिसेंबर १६६३ त मरण पावला. त्याच्यामागून त्याचा मुलगा भद्रापा नाईक राज्यावर आला. सप्टेंबर १६६२ त विजापूरकरांची स्वारी होऊन भद्रापानें फिरून नवा तह त्यांजशीं केला. त्यानंतर लवकरच भद्रापा मरण पावला. पुढें त्याचा बंधु सोमा शंकर हा राज्यावर आला, ( शि० च० प्र०, २४. १७८ व अ. घ. इ. ). शिवाजीची बिदनुरावरील स्वारी बहुधा १६६४–६५ त झाली असावी. त्या वेळीं शिवापा नाईक शरण आला, असा साऱ्या बखरींचा उल्लेख आहे. पण शिवापा १६६४–६५ त हयात नव्हता. ' शिवापाच्या मागून सोमा शंकर आला; आणि त्याचा खून झाल्यानंतर त्याचा अल्पवयी मुलगा गादीवर बसवून, त्याची आई चैन्नमा ही राज्यकारभार पाहूं लागली होती. चैन्नमाचा सल्लागार तिमय्या नायक नांवाचा ताडीविक्या होता, आणि तोच पुढें सेनापति होऊन राज्यरक्षक झाला,' वगैरे हकीकत प्रो. सरकार देतात. ( पहा शिवाजी पृ० २७१ ). परंतु भद्रापा व सोमा शंकर यांची माहिती खुद्द गोवेकरांच्या दप्तरांतून मिळालेली असून ती अधिक विश्वसनीय दिसते. असो. सोमा शंकरानें शिवाजीस शरण येऊन दरसाल तीन लक्ष खंडणी देण्याचें कबूल केलें. शिवाय, त्यानें "महाराजांस नजराणा पोशाख, जवाहीर, लाख रुपये नक्त नजर" पाठविले. त्याच्या दरबारीं उमाजीपंत नांवाचा शिवाजीचा वकील होता. ( पहा, चिटणीस–पृ० १४६; म. सा. ब. पृ. ३४ ).

**दामलवाड.**—हा शिवापा बिदनूरकर यांचा सरदार, धारवाडच्या मजबूद ठाण्याचा अंमलदार होता. खवासखानाची आदिलशाहाशीं बेदिली होऊन तो फौजबंद

निघून धारवाडास आश्रयार्थ आला; पण दामलवाडानें त्यांस आंत घेतलें नाहीं, (अ. घ. इ.). सन १६४६–४७ च्या विजापुरकरांच्या स्वारींत दामलवाड शिवापा नाइकातर्फे लढत होता. यानें मुस्तफाखानाचें " लष्कर फोडून भग्न केलें, " व आसदखानास जखमी केलें. परंतु सिदी रैहानच्या पिछाडीच्या हल्लयांत दामलवाड ठार झाला. ( चंपू पृ. ८४—८५ ).

**शेरखान लोदी.**—विजापुरकरांचा तृणमल्ली प्रांताचा सुभेदार. वेलोर, तिरुपति वगैरे प्रांत याच्या ताब्यांत होते. सन १६७७ त शिवाजीनें कर्नाटक, चंदावर या प्रांतीं स्वारी केली, तेव्हां त्या सालच्या जून–जुलै महिन्यांत तिरुपतीजवळ शेरखानाचा पराभव झाला. ( जे. श. ) " पांच हजार घोडे व बारा हत्ती पाडाव केले. द्रव्य जवाहीर अपार हस्तगत झालें. " ( सभा. ८९ ). ( त्रिपथीच्या ऐवजीं ' त्रिमली ' असा सभासद व चिटणीस यांचा पाठ. ) शेरखान खासा जिवंत धरिला.

**साबाजी अनंत ऊ० चतुर साबाजी.**—निजामशाहींतील प्रसिद्ध ब्राह्मण मुत्सद्दी. याची विद्वत्ता व बुद्धिमत्ता अलोट असल्यामुळें यास ' चतुर साबाजी ' असें टोपण नांव पडलें होतें. निजामशाहींतील दरबारी काम हा पहात असे आणि लष्करी कामें चंगीझखानाकडे होतीं. चंगीझखानाच्या मृत्यूनंतर यानेंच मलिकंबरास हाताशीं धरून त्याचे मार्फत निजामशाहीचा कारभार चालविला. तो त्यानें पुष्कळ वर्षे केला. " अकबराचा जसा तोडरमल्ल, तसा निजामशाहींतील हा प्रख्यात श्रीकरणाधिप होता. मलिकंबरी जमीन–मोजणी म्हणतात, ती ह्या चतुरसाबाजीनेंच केली. " ( रा. मा. चं. पृ. ६७ ). शेवटीं याचा खून झाला. याच्याविषयीं कागदोपत्रीं विशेष माहिती नाहीं.

**सिद्धेश्वर बिन मेघनाथभट ब्रह्मे.**—या सिद्धेश्वरभटावर गोपाळभट महाबळेश्वरकराप्रमाणें शिवाजीची निष्ठा होती. गोपाळभटाकडून शिवाजीनें मंत्रोपदेश घेतला होता. " स्वामींच्या अनुष्ठानबळें आपण राज्यास अधिकारी जालों व सकळ मनोरथ चिंतिले पावलों, " ( स. प. पृ. ११२ ) असें श्रद्धापूर्वक मानून या भटजीस १०० होनांचें वर्षासन करून दिलें. ' संकटकाळीं सहकारी ' मानण्याइतका शिवाजीचा त्याजवर विश्वास होता.

**सीदी जोहार ऊ० सलाबतखान.**—मलीक अबदुल नांवाचा सरदार आदिलशाही अमलांतील कर्णूल प्रांताचा अधिकारी होता. सीदी जोहार हा त्याचा विकत घेतलेला गुलाम. लहानपणापासून याची हुशारी पाहून मलीक अबदुलनें यास थोडीफार स्वतंत्रता देऊन स्वारीशिकारीच्या वेळीं स्वतःबरोबर वागविलें. जोहारनें त्या

थोड्याशा शिक्षणाचा चांगला उपयोग करून घेतला. पुढें मलीक अबदुल मरण पावला. त्याचा मुलगा मलीक रहयान यास सरदारीचीं वस्त्रें मिळावयाचीं, पण जोहारनें संधि योग्य आहे असें पाहून रहयान यास कैद केलें; आणि स्वतःच कर्णूल प्रांताचा सरदार बनला. सीदी मसऊद नामक दुसरा एक मलीकचा गुलाम होता. तो कदाचित् या उसन्या सरदारीबद्दल बोभाटा करील, व कदाचित् मलीक रहयान यास कैदेंतून सोडविण्याचा प्रयत्न करील, या भीतीनें मसउदास जोहारनें आपला जांवई करून घेतलें. हें कृत्य नीटसें पचलें असें पाहून, खुद्द आदिलशाहीच्या विरुद्धही त्यानें बंडखोरी आरंभिली. शिवाजीची वाढती धामधूम बंद करण्याच्या कामीं आदिलशाही दरबार गुतलें होतें. मध्यंतरीं अफजलखानाचें प्रकरण होऊन दक्षिणेकडे लक्ष देण्यास दरबारास सवड नव्हती. अफजल मारला गेला आणि रुस्तमजमान व फाजलखान धास्त खाऊन माघारे फिरले. त्या वेळीं खुद्द सुलतान अली आदिलशहाच स्वारीवर निघाला. त्याच सुमारास मोगलांचा शास्ताखान दक्षिणचा सुभेदार म्हणून मुअज्जमच्या जागीं आला. शिवाजीला रसातळास पोंच-विण्याचें काम औरंगजेबानें त्याजकडे दिलें होतें. अफजलप्रकरण म्हणजे आदिल-शाहीची नामुष्की होती. म्हणून आदिलशहानें शास्ताखानाशीं सख्य करून शिवा-जीस पळवून लावण्याचें काम उभय सैन्यांनीं करावें, असें ठरविलें. जोहार कर्णूलच्या आसपासचा मुलूख लुटीत होता. त्यानें खुद्द आदिलशहा बाहेर निघाल्याचें ऐकून माफी मागण्यासाठीं एक दिलगीरपत्र पाठविलें. अलीनें या मनुष्याचा शिवाजीच्या कामीं तात्पुरता उपयोग करून घेण्यासाठीं त्याचा गुन्हा माफ केला, आणि 'सलाबतखान' असा किताब देऊन त्यास शिवाजीवर रवाना केलें. शिवाजीनें नुक्ताच पन्हाळा घेतला होता. त्यासच प्रथम जोहारनें वेढा दिला. गडावरील शिबंदी हत्यारबंद नव्हती, म्हणून शिवाजीनें जोहाराशीं सल्ल्याचें बोलणें लाविलें. जोहारनें आपल्या मोर्च्यांत रात्रीं शिवाजीची भेट घेतली. "दोघेही परस्परांस मोठ्या उमेदीनें व स्नेहानें भेटले, त्यांत सलाबतखानानें शिवाजीची अतिशय बरदास्त ठेविली." ( अ. घ. इ., पृ. २०२ ). मात्र त्याबरोबरच वेढ्याची बतावणीही चालू ठेविली. तथापि ही गुप्तभेटीची बातमी अलीस समजतांच तो स्वतः मोठ्या सैन्यासह निघाला व चढया घोड्यानिशीं त्यानें पन्हाळा सर केला. ( ता. २५ आगस्ट १६६० ). परंतु शिवाजी तेथून निसटून गेला. त्याच्या पाठलागास फाजलखान व सलाबतखानाचा मुलगा सीदी अबदुल अजीज हे रवाना झाले. याच वेळीं सुप्रसिद्ध पावन खिंडीचें युद्ध होऊन बाजीप्रभु ठार झाला. सलाबतखान या-नंतर विजापुरास तोंड न दाखवितां कृष्णातीरीं चिमुलग्यास जाऊन राहिला. तेथ

अलीनें त्यास चार हिताच्यां गोष्टी सांगितल्या, पण सलाबतखान दुसरी आदिलशाही स्थापून स्वतःच सुलतान होण्याच्या मर्ख कल्पनेनें " बहकलेला शिपाई होता. शिवाय अपाय न होतां नुसत्या उपदेशावर भागलेलें पाहून सलाबतखान तेथून निसटला. अलीनें तोरगलच्या किल्ल्यास वेढा दिला होता. तेथील किल्लेदारास रसद पोंचविण्याचें जातां जातां काम करून तो कर्णूलास दाखल झाला. वाटेंत मुद्गलच्या किल्लेदारास अली आपल्यावर चालून आल्यास किल्ला भांडविण्याची ताकीद करण्यास तो विसरला नाहीं. पण अलीच्या सैन्यास मुद्गलच्या किल्लेदारानें प्रतिकार केला नाहीं. सलाबतखान आपल्या जुजबी सैन्यासह आदिलशाही सरदारांस तोंड देण्यास उभा राहिला. परंतु युद्धांत त्याचा निभाव लागेना. म्हणून तो तेथून रायचुरास पळून गेला; आणि तेथेंच तो कांहीं दिवसांनंतर मरण पावला. त्याचा मुलगा सीदी अब्दुल अजीज व जांवई मसाउदखान यांस आदिलशहानें दरबारांत सरदाऱ्या देऊन कायम केलें. ( अ. घ. इतिहास. प्रो. सरकार; शिवाजी. )

**सीदी बिलोल हबशी.**—निज़ामशाही दरबारांत अबिसिनिअन म्हणजे हबशी लोकांचा भरणा पुष्कळ होता. पुढें या हबशांचा व मुसलमान पठाणांचा बेटीव्यवहार होऊन दोहोंची सरमिसळ झाली. सीदी हा शहाजीच्या पदरचा नोकर. त्याची हुषारी पाहून शहाजीनें त्यास बारगिरी प्रथम सांगितली. शक १५५० च्या श्रावणांत म्हणजे स. १६२८ त शहाजीस पुणें व पाटस हे प्रांत निजामशाहीकडून 'अर्जानी झाले'; त्या वेळीं बिलोलास लोहगडची हवालदारी सांगितली. पुढें स. १६३७ त आदिलशाहीकडून पुणें, इंदापूर, जुन्नर, पाटस वगैरे परगणे शहाजीस मिळाले, त्या वेळीं या परगण्यांवर शहाजीनें आपले लोक नेमिले. सीदी बिलोल लोहगडावर राहून नाणें, पवन व अंदर ह्या मावळांवर देखरेख ठेवी. शिवाजीनें सैन्य ठेवून किल्ले घेण्याचा उपक्रम केला. त्याप्रमाणें लोहगड घेण्यासाठीं माणकोजी दहातोंडे यास रवाना केलें त्या वेळीं सीदी बिलोल म्हणाला " महाराज पुंडपणा करून, मरणाची निशाणी करितात. बेकैदी वागतात. " ( शि. दि. १२३ ). प्रतिकार धन्याच्या ( शहाजीच्या ) मुलाशीं कसा करावा ! असें म्हणून सीदीनें शिवाजीचा नोकर होण्याचें नाकारिलें. " पारिपत्य करावें तरी वडिलांचे वेळचे माणूस. यास्तव विशोभा अगर दुर्भाषण न करितां माणकोजीनें शहाजीकडे पाठविला; ( शि. दि. ) आणि किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. "

**सूर्यराव काकडे.**—शिवाजीचा बाळमित्र आणि शूर योद्धा, मराठ्यांच्या ऊच्च कुळांत गुंजण मावळांतील वांगणीच्या काकडेरावांची गणना होते. याच

काकडेरावांपैकीं सूर्यराव होता. या काकड्यांचा व कारीच्या जेध्यांचा शरीरसंबंध झालेला होता. रोहिडा किल्ला घेतांना सूर्यरावानें चांगला पराक्रम केला. याची कामगिरी जावळीच्या मोरे प्रकरणांतही दिसून आली. शिवाजीनें मोऱ्यांशीं प्रथम सामाचें बोलणें लावलें. हेतु असा कीं, विशेष कटकट न होतां स्वतःचें प्रभुत्व सोडून शिवाजीशीं सख्यत्वानें वागण्यास तयार असल्यास त्यांशीं सलोखा करावा. पण मोऱ्यानें शिवाजीचें म्हणणें मानिलें नाहीं. तेव्हां सूर्यराव काकडे याच्या हाताखालीं " दोन हजार हासम जावलीवर रवाना केले. " निसणीच्या घाटानें जाऊन सूर्यरावानें जावळीवर छापा घातला. ( ऐ. स्फु ले. १–८ ) मोऱ्यांनीं एक महिनाभर दाद दिली नाहीं. परंतु सूर्यरावानें वेढा चालू ठेवला आणि महिन्यानंतर स. १६५६ च्या डिसेंबरांत जावळी सर केली. पण यापुढें आपला निभाव लागणें कठीण असें पाहून मोरे तेथून पळाला व रायगडचा आसरा धरून राहिला. स. १६७२ च्या जानेवारींत दिलेरखान व एखलासखान यांच्याबरोबर साल्हेरची प्रसिद्ध लढाई झाली. त्या प्रसंगीं सूर्यराव रणांगणीं ठार झाला. " सूर्यराव म्हणजे सामान्य योद्धा नव्हे. भारतीं जैसा कर्ण योद्धा, त्याच प्रतिमेचा असा शूर पडला. " ( सभा. ७५ )

**संभाजी कावजी.**—हा प्रथम शिवाजीचा भालदार होता. अफजलखानाचे भेटीसमयीं विश्वासू व मर्दाने म्हणून दोघे इसम त्यानें बरोबर घेतले होते. एक जिवा महाला व दुसरा संभाजी कावजी. शिवाजीस खानानें काखेंत दाबून धरिलें, आणि वार केला तेव्हां शिवाजीनें वाघनखें चालविलीं. ही गडबड ऐकून सैदबंडा हा खानाचा रक्षक पुढें धांवला. त्याचा समाचार जिवा महाल्यानें घेतला व पालखीचे भोई गडबड करणार इतक्यांत संभाजीनें " भोयांच्या पायांच्या पट्टयानें ढोणा सिरा तोडून पालखी भुईस पाडली, " ( म. द. रु. १. पृ. ३० ) आणि खानाचें शिर कापून शिवाजीस दिलें. इतर सैन्याची व्यवस्था पूर्वीं ठरली होती, त्याप्रमाणें सर्वांनीं सांगितल्याप्रमाणें केली. शिवाजीसह संभाजी कावजी व जिवा महाला प्रतापगडावर जलदीनें दाखल झाले. शिवाजीनें या कामगिरीबद्दल त्याची सर्फराजी केली; आणि संभाजीस चाकण येथें पाग्या म्हणजे समस्त पागेवरचा अधिकारी नेमिलें. पुढें कांहीं काळ त्याजवर शिवाजीची गैरमर्जी झाली होती. शास्ताखानानें चाकणास वेढा घातला त्या वेळीं हा खानास जाऊन मिळाला. त्याची अचाट शक्ती पाहून खान खूष झाला. " बळकट, घोडें उचलावें ऐसें बळ, मर्द होते. " ( चि. २११ ) पुढें शाहीस्तेखानानें चाकण सर केला आणि संभाजी कावजीस तेथील हवालदार

नेमिलें. स० १६६९ अखेर शिवाजीनें मोगलावरील मोहिम फिरून हातांत घेतली; तेव्हां चाकणचा कोट सर केला; आणि संभाजीस पागे सुद्धां लुटन ठार मारिलें.

**संभाजी.**—शिवाजीचा ज्येष्ठ बंधु. याचा जन्म वेरूळ येथें सन १६२३ त झाला. ( म. द. रु. १ ). याच्या बारशाच्या दिवशीं खुद्द मूर्तिजा निजामशहा नामकरणविधीस हजर होता. ( रा. मा. चं. ). हा आपल्या बापाबरोबर सन १६३६ त पुणें प्रांत सोडून कर्नाटकांत गेला, तो अखेरपर्यंत बहुधा तिकडेच होता. शिवनेरी गडचा गडकरी श्रीनिवासराव ( विश्वासराव बृ. शि. ले. ) याची मुलगी जयंती ही संभाजीस दिली होती. खेरीज गौरीबाई व पार्वतीबाई अशा आणखी दोन स्त्रिया त्यास होत्या. संभाजीला उमाजीराजे नांवाचा एक मुलगा असून ( जन्म ता. २५ नोव्हेंबर १६५४ ) उमाजीच्या बायकोचें नांव सखूबाई असें होतें. संभाजीस मलकोजी नांवाचा दुसरा एक पुत्र असल्याचा उल्लेख आढळतो. संभाजीस आणखी एक मुलगा सुरतासिंग नांवाचा होता, तो बापामागून कोलार येथें राहूं लागला. संभाजीची ज्येष्ठ पत्नी जयंतीबाई हिनें ता. ५ जून १६६६ रोजीं भाऊजीपंत या ब्राह्मणास भूदान केल्याचा उल्लेख सांपडतो. ( वि. ज्ञा. वि. एप्रिल-मे १९२३ ) आणखी एक दान केल्याचा उल्लेख आहे. संभाजी नोव्हें. १६६३ त मरण पावला. शहाजीस मिळालेल्या जहागिरीपैकीं बंगळूर व कोलार यावर संभाजीचा अंमल १६४७ पासून होता. त्याचें वास्तव्य बहुतेक कोलार येथें असे. सन १६५५ त आदिलशाही अंमलाखालील कनकगिरीच्या संस्थानांत बंडाळी झाली, तेव्हां संभाजी बंडखोरांवर चालून गेला. याच युद्धांत तो तोफेचा गोळा लागून ठार झाला असें बखरींत नमूद आहे. कदाचित् विजापुराहून त्याच कामगिरीवर रवाना झालेल्या अफजलखानानें कृष्णकारस्थान करून त्यास ठार मारलें असा बखरकारांचा झोक दिसतो. पुढें १६५९ त अफझलखानास मारून शिवाजीनें आपल्या भावाबद्दल पुरता सूड उगविला. किंबहुना, असा सूड घेण्यास जिजाबाईनें मुद्दाम शिवाजीस सांगितलें. तथापि कर्नाटकांत सांपडलेल्या शासनपत्रकांवरून तो १६६३ त मेला असल्याचें दिसतें. कोलार प्रांत चिक्क रायल तिम्मा गौडा याजपासून जिंकून तेथें शहाजीनें संभाजीस अधिकारी नेमिलें. याची स्त्री मकाऊ आईसाहेब कसबे जिंतीनजीक पळसदेव ( भीमातीरीं ) येथें पाटिलकीच्या वतनावर शहाजीनें पोंचविली. पोटीं संतति नाहीं. ( म. द. रु. १ )

---

शिवकालांतील एकंदर सुमारें १९० व्यक्तींची यादी निरनिराळे ग्रंथ वाचून मीं बनविली आहे. पैकीं प्रत्यक्ष लिहून तयार झालेलीं सुमारें ७९ चरित्रें वर दिलीं असून बाकीच्यांची नांवनिशी नुसती अकारविल्हेनें खालीं दिली आहे. त्यावरून या उद्योगाचें स्वरूप वाचकांच्या लक्षांत येईल.

अंबरखान—चंदीचा किल्लेदार
अहीरराव घोरपडे
अण्णाजी दत्तो सुरनीस
अनाजी रंगनाथ मळेकर
अनुपखान
अप्पाखान
अफजलखान
आनंदराव कर्णालीकर
आनंदराव ( मकाजी )
आबाजी सोनदेव
आवजी गोविंद
उदेभान राठोड
औरंगजेब
काकाजीपंत
काजी मुलाणा
कानो मोरदेव गुपचूप
कान्होजी नाईक जेधे
कान्होजी भांडवलकर
काशीराम अत्रे
कृष्ण जोशी
कृष्णाजी भास्कर
केशरसिंग
केशव भास्कर
केशवभट महाबळेश्वरकर

केसोपंत
कोन्हेरपंत महादेव
कोन्हेर रुद्र
कोंडाजी फर्जंद
खंडोजी जगताप
खान खानान
गणेश शेट
गंगाजी मंगाजी
गंगाधरपंत
गागाभट्ट
गोविंद विश्वनाथ
गोंदजी जगताप
चंगीझखान
चंद्रराव मोरे
जमानखान
जलेल नासिरुद्दीन
जायणा लिंगरस
जिजाबाई
झुंझारराव घाटगे
तानसावंत
तानाजी मालुसरे
तिमाजी केशव
तुकोजी चोर
तुळसाजी देशपांडे

त्रिंबकजी इंगळे
त्रिंबकजी बाजी प्रभु
त्रिंबक भास्कर
त्रिंबक सोनदेव
दत्ताजी केशव पिसाळ
दत्ताजी त्रिंबक वाकनीस
दर्यासारंग
दलपतराव पोतनीस
दलेलखान
दादजी रघुनाथ
दादाजी कृष्ण लोहोकरे
दावलजी घाटगे
दियानतराव कासी
धनाजी जाधव
धर्माजी नागनाथ
धर्माजी पंडित
नरसो मलनाथ
नरहर बल्लाळ
नरहर रघुनाथ
नागोजी नाइक
नागोजी राजे
नागोजी ससारे
नामाजी लांडे
नारो निळकंठ
नारो भिकाजी
निराजीपंत
निळोजी काटकर
निळो निळकंठराव
निळोबा नाईक
निळो मोरेश्वर
निळो सोनदेव
नूरबेग
नेताजी पालकर
पंताजी गोपीनाथ कुळकर्णी
पिराजी नाईक
पिलाजी गोळे
पिलाजी सणस
प्रतापजी राजे
प्रतापराव गुजर
फत्तेखान
फाजल महंमद
बहिरजी भिजदास
बहिरजी राजे मोहिते
बाजी घोरपडे
बाजी घोलप
बाजी दळवी
बाजी पासलकर
बाजी प्रभु
बाजी शामराज
बाबाजी ढमढेरे
बाबाजीराव
बावलीखान
बारकोजी भोसले
बाळाजी आवजी

बाळाजी हरी
कृष्णाजी नाईक बांदल
भद्रापा नाईक
भानजी तुकदेव
भावसिंग जमादार
भिवजी राजे
भिवराव
मदारी मेहतर
मयाजी राजे
मलबाई देसाईण
मलिक अंबर
मल्हार कोन्हेर
मल्हार नारायण सबनीस
महकूमसिंग
माहादजी शामराज सुरनीस
महाबतखान
माणको हरी
मानाजी मोरे
मानाजी विचारे
माल सावंत
महादाजी नीळकंठ सरनाईक
मीर जुमला
मुरार अनंत
मुरार जगदेव
मुरार दादाजी
मुल्ला महंमद
मुस्ताफाखान
मोरो नागनाथ

मोरोपंत पेशवे
मंबाजी राजे भोसले
यशवंतराव शहाजी कदम
याकुतखान
युसफखान मायणा
येसाजी कंक
येसाजी काळे
येसाजी गोपीनाथ लोहोकरे
येसाजी बल्लाळ
येसाजी निकम
रखमाजी शिवदेव
रखमाजी दादाजी
रंगभट मळेकर
रंगो नारायण
रघुनाथ पंडित
रघुनाथपंत हणमंते
रघुनाथ बल्लाळ कोरडे
रणदुल्लाखान
रणमस्तखान
राघोजी मित्रा
राघो बल्लाळ अत्रे
राजा रायल
राजा रूपनाईक
राजा वीरभद्र
रामचंद्रपंत
रामजी पाटील
राम दळवी
रामाजी नळगे

रामाजी पांगारे
रायाराव
रावजीपंत
रुद्राजी सखाजी
रुद्राजी साळवी
रुस्तुम जमान
रूपाजी भोसले
रोहिलाखान
लष्करखान
लाला कायत
लांबाजी भोसले
लखुजी जाधव
वालोजी
वासुदेव बाळकृष्ण
विठ्ठल दत्तो सुभेदार
विठ्ठल पंडित धुमे
विठोजी सिलिमकर
विश्वासराव नानाजी प्रभु
विसाजी बल्लाळ
व्यंकाजी खांडेकर
व्यंकोजी भोसले
शहाजहान
शामजी नाईक
शामजी हरी
शामराज पद्मनाभी
शास्ताखान
शिर्दोजी निंबाळकर
शिवाजी नाईक
शिवाजीपंत
शिवाजी शंकर
शेकूजी गायकवाड
शेषोबा नाईक पुंडे
श्रीनिवासराव
सखोपंत
सरजाखान
सरजाराव घाटगे
साबाजी नारायण
साबाजी मुरार
सावजी देशमुख
सावित्रीबाई
सिंदकर देशपांडे
सिधोजी पालकर
सीदी अंबर
सीदी शामळ
सुभानजी खराडे
सुभानजी नाईक
सुभानजी मोहिते
सुभानसिंग
सुर्वे
सैदबंडा
सोन महाला
सोनाजी नाईक
सोनाजी विश्वनाथ
सोमनाथभट कात्रे
संतोजी राजे
हंबीरराव मोहिते
हिरोजी फरजंद
हुसेनखान

# Shivaji Souvenir.

## GUJARATI SECTION

## अनुक्रमणिका

# ભારતીય ઈતિહાસનાં કેટલાંક લક્ષણો

## લેખકઃ-કવિ ન્હાનાલાલ દલપતરામ

ગાવ એ મહાકથા મનુષ્યમોહિની, અહો ભારતકુલ !

**વિદ્યાર્થી મિત્રો !**

ભારતીય ઇતિહાસ એટલે માનવકથાની એક અજાયેબી.

આજના ભાષણના વિષયને અડકતાં અંગુલીઓ ઠરી જાય છે, બુદ્ધિ થંભી જાય છે, આંખડલી અનિમિષ રહે છે. મહાસાગર ઉપર મીટ માંડી રહી મોજાં-ઓના ગૂઢ સન્દેશ કો પીધાં કરે-પીધાં જ કરે, એવું કંઇક થાય છે.

સાગર પાતાં થાકતો નથી; પીધાનો ધરવ પીનારને થતો નથી; એવો ભારતીય ઇતિહાસ છે.

**क्व सूर्यप्रभवो वंशः ? क्व चाल्पविषयामतिः ?**
**तितीर्षुर्दुस्तरं मोहादुडुपेनास्मि सागरम् ॥**

કય્હાં સૂર્યજન્મિયો વંશ ? કય્હાં અલ્પ મતિ વસ્તુની ?
મોહ છે હોડલે મ્હારે તરવા દુસ્તર સાગર.

રઘુવંશની ઇતિહાસકથા આરંભતાં કાલિદાસને એ ભાવ જાગ્યા હતા; આપની સન્મુખ આજે ઉભતાં મ્હને યે એ ભાવ જાગે છે. કય્હાં ભારતીય ઇતિહાસનો મહાસાગર ? કય્હાં મ્હારૂં જ્ઞાનબુદ્ધિનું હોડકું ? ને કય્હાં આજની ત્રણેક ઘડીની અવધિમાં એ મહાવાર્તાના અર્થવિસ્તારનો દિશાનિર્દેશ ?

આભને ઓળંગવાના પંખીની પાંખના જાણે ફડફડાટ !

ક્ષમા કરશો—આપની આશાને પરિતર્પી ન શકું તો મ્હને ક્ષમા કરશો.

ભારતીય ઇતિહાસના રેખાચિત્રની ઝાંખી યે કરાવી શકું ત્હો યે મ્હને તો સંતોષ થશે.

સફર લાંબી છે, ધીરજ ને ભાવથી આદરિયે.

એક તો; ભારતીય ઇતિહાસની કવિતા એટલી અદ્ભુત છે, એનું Romance એટલું પ્રતાપી છે કે prosaic જીવ પણ કવિતાની પવનપાવડીએ ઉડતો થાય. મ્હારો પતંગ બને તેટલો પૃથ્વી સંગાથે સન્ધાયેલો રાખીશ.

બીજું; ઇતિહાસ સર્વસ્વનું કેન્દ્ર એટલે મનુષ્ય જાતિની કલ્યાણસિદ્ધિ. ભારતીય ઇતિહાસમાં એ એટલી બધી છે કે સન્તોને ફિલસુફો પણ મોહાશ્ચર્ય પામે છે. સંસારશાસ્ત્રના અભ્યાસી તરીકે બુદ્ધિનું લંગર બનશે એટલું મોહાશ્ચર્યનાં પૂરપ્રવાહમાં તણાવા નહિ દઉં.

ચાલો ત્હારેઃ પ્રથમ તો ઇતિહાસ એટલે જ શું ?

ઇતિહાસ એટલે મનુષ્યજાતિની મહાવાર્તાઃ વિધાતાની અદૃશ્ય અંગુલીએ આલેખેલા અનુભવમન્ત્રોઃ પૃથ્વીપાટે પડેલા કાલના અમ્મર આંકડા.
ઇતિહાસ એટલે બ્રહ્માંડના મહાસાગર ઉપર અખંડ ઉછળતી તરંગાવલિના અક્ષર લેખ.

ઇતિહાસ એટલે મહાસત્યોની કવિતા, ને મહાકવિતાનાં સત્ય.

ઇતિહાસ એટલે કલ્પનાપર અદ્ભુતતાઃ પરમ કલાવિધાયક બ્રહ્માંડનાથનું રચેલું મહાકાવ્યઃ રામાયણ, મહાભારત, ઇલિયડ, શાહનામું તો એના એકેકેક અધ્યાય.

ઇતિહાસ એટલે સત્‌ની લીલા.

અને ભારતીય ઇતિહાસ એટલે જગત્ ઇતિહાસના મહાવર્તુલનું મધ્યબિન્દુ. સિકન્દરથી માંડીને કોલંબસ, વાસ્કો ડી ગામા, નેપોલિયન અને કયસર બીજા વિલ્હેમ સૂધીના જગત્ સંશોધકો ને જગત્ સામ્રાજ્યવાદી સ્વપ્નદ્રષ્ટાઓનું સ્વપ્નસ્વર્ગ.

વ્રજમાં કૃષ્ણજીને શોધતાં સખી સાંપડે એમ ભારત શોધવા નીકળેલા યુરોપને અમેરિકા ખંડ સાંપડ્યો.

લક્ષ્મીસમૃદ્ધ યૂરોપની આજની લક્ષ્મી કેટલીક અમેરિકાએ આપી, કેટલીક ભારતે આપી, બાકીની કીમ્બરલી જેવી હીરાખાણોએ આપી.

આંબાને મ્હોર બેસે, કેરી આવે, વેડાય, ને પાંદડાં યે ખરી પડે; બીજે વર્ષે બીજી વસન્ત આવે, મ્હોર બેસે, કેરી થાય, વેડાય; એ વેડાવું ને એ પાંગરવું, એ લુંટાવું ને એ ઉભરાવું, એ કરમાશ ને એ પુનરુજ્જીવનઃ—**वासांसि जीर्णानि यथा विहाय ।** વિ૦ શ્લોકભાખ્યા યુગયુગનાં નવસૃજનઃ તે ભારતીય ઇતિહાસકથા.

યૂરોપીયન ઇતિહાસવેત્તાઓ ભાખે છે કે મધ્ય એશિયા એટલે the Cradle of Mankind—મનુષ્યજાતિનું પારણું. કોકેસસ એટલે આર્યપ્રજાના પંચ મહાનદ જ્યાંથી વિવિધ દિશાઓમાં વહ્યા તે આર્યોનું વતન. આર્યપ્રજાનું–આર્યસંસ્કૃતિનું ઓછામાં ઓછું અશુદ્ધ સ્વરૂપ તે આજની ભારતીય આર્યપ્રજા અને ભારતીય આર્યસંસ્કૃતિ.

કોકેસસના આર્યત્વના પડછાયા આજે પૃથ્વી ઉપર કય્હાંએ શોધતાં જડે તો તે ભારતવર્ષમાં.

જગતઇતિહાસમાં સેમેટિક વંશ છે, મોગલ વંશ છે, રાતા ઇન્ડિયનોનો વંશ છે. છતાં મનુષ્યજાતનો ઇતિહાસ એટલે આર્યત્વના ઇતિહાસનું ઉજ્વળમાં ઉજ્વળ પર્વ.

ભારતીય ઇતિહાસ એટલે સંસારશાસ્ત્રના અજબ અખતરાઓનું સંગ્રહસ્થાન.

દ્રૌપદીના પાંચ પતિ, શ્રીકૃષ્ણની અષ્ટ પટરાણીઓ, રામનું એક પત્નીત્વ, સીતાજીનું એક પતિત્વ, સુભદ્રાહરણનો રાક્ષસવિવાહ, સીતા દ્રૌપદી સંયુક્તાના સ્વયંવરો; પિતૃઆજ્ઞાધારી રામ, પિતૃસ્વતંત્ર પ્રહ્લાદ, સરસ્વતીનાં બ્રહ્મચર્ય; તારા, મંદોદરીના વિધવા વિવાહ; સાગરબાંધી પૃથ્વીના એકચક્ર ચક્રવર્તીઓ, રાજવીશૂન્ય પ્રજાશાસનનાં રાજવિધાન; સત્યવાદી હરિશ્ચન્દ્ર, રાજખેલખેલાડી ચાણાક્ય; રાજવીકુલમાં મેરુ સમોવડા દેવોને પ્રિય અશોકદેવ, શાહનશાહ અકબરશાહ; સુંદરીકુલમાં સૌન્દર્યમણિ સરિખડી શકુન્તલા, સંયુક્તા, નૂરજહાંન, મુમતાજ મહાલ; અહલ્યાબાઇ, લક્ષ્મીબાઈ ને ચાંદબીબી સમી સમરસુહાગિણી રાજરાણીઓ; કુન્તા ને જીજીબાઈ સમી રાજમાતાઓ; કવિતા, સ્થાપત્ય, ચિત્ર, સંગીત, નાટક—સૌન્દર્યનો સર્વાંગે ખિલાવ; ઢાકાનું મલમલ—સાતસાત પડ છતાંએ મહીંથી શરીર ઝંખાય, અમદાવાદનો કિનખાબ–જેની સોનામોહિની આજે યે નથી ઉતરી; મેઘદૂત ને શાકુન્તલ; રામાયણ ને મહાભારત; દેલવાડાનાં મંદિરોની આરસકોતરી કવિતા, તાજમહાલનું આરસઆલેખ્યું દાંપત્યકાવ્ય, ગોકુલવૃન્દાવનની ગોપકવિતા; બુદ્ધ સમા ધર્મસંસ્થાપક, કપિલ, કણાદ, પતંજલિ સમા ફિલસુફો, વારણાવટમાંના ફિલસુફીના અખાડાઓ ને ધર્મવિપ્લવો; બ્રહ્માવર્તનું બ્રાહ્મણત્વ; ચિતોડનું ક્ષત્રિયત્વ–ક્ષત્રિયોનાં કેસરિયાં, ક્ષત્રાણીઓના જૌહર; મિ. બોલ્ડવીને ચતુર્થાંશ સમૃદ્ધિ યુદ્ધકાલે ઈંગ્લાંડને સોંપી, ઈંગ્લાંડે મહામંત્રી સ્થાપ્યા. ભામાશાહે પ્રતાપને સર્વસ્વ સમર્પ્યું હતું. એ ભામાશાહ, ટોડરમલ, જગડૂશાહ, વસ્તુપાળ, તેજપાળ સમાઓનું વૈશ્યત્વ; સંન્યાસીઓ, રાજ્યત્યાગી રાજસંન્યાસીઓ; મનુસ્મૃતિ ને આઇને અકબરી સમા Codes, રાજતરંગિણી

અકબરનામા, બાબરશાહનું આત્મવૃત્તાન્ત–સમા ઇતિહાસો; કાદંબરી સમી જન્માંતરની મહાવાર્તા; સાગરખોળે ઉછળતા પારસીઓનો ગુજરાતખોળે સમાસઃ પ્રાચીનમાં પ્રાચીન ખ્રીસ્તીઓની ૧ લા–૨ જા સૈકામાંજ મલબારકાંઠે વસાહતો.

જગત્ ઇતિહાસની અજાયબીઓજ વીણી વીણીને જાણે પરમેશ્વરે ભારતીય ઇતિહાસ રચ્યો ન હોય!

ભારતીય ઇતિહાસ એટલે જગત્ ઇતિહાસની ચાવી.

જગત્ ઇતિહાસના કેટલાક ભ્રમ છે, તેમ ભારતીય ઇતિહાસના પણ કેટલાક ભ્રમ ઇતિહાસના બાલ અભ્યાસીઓમાં ઘર કરી રહ્યા છે.

રોમે ગ્રીસને જીત્યું; ઇતિહાસપર્યેષકો ભાખે છે કે ના, ગ્રીસે રોમને જીત્યું–ગ્રીસ સંસ્કૃતિએ રોમન સંસ્કૃતિને જીતી. કારણ કે સરવાળે તો ઇતિહાસ એટલે સંસ્કૃતિઓની હારજીત.

Britons never shall be slaves. ભવિષ્યવાણ તરીકે તો આપણ સૌ Chorus પૂરિયે કે પૃથ્વીની કોઇએ પ્રજા ગુલામગિરિમાં ન હજો. એ કવિત ચરણને ઇતિહાસના સત્ય તરીકે સ્વીકારતાં પહેલાં રોમના બજાર વચ્ચેનો પોપ ગ્રેગરીનો પ્રસંગ ઇતિહાસપટેથી ધોવો પડે. ઈ. સ. ૧૦૧૪ ની આસપાસ–સોરઠીસોમનાથના પ્રસંગ પહેલાં એકાદ દાયકે બ્રિટનમાં કાયદો ઘડાયો કે બાલકોને ગુલામ તરીકે વેચવાં નહિ. White Slaves' Traffic ની ચર્ચા આજ વીસમી સદીમાં યે આથમી નથી. ને ત્હેના નિષેધના કાયદા હજી ઘડાય છે.

ભારતીય ઇતિહાસના યે એવા કેટલાક ભ્રમ છે.

પહેલો ભ્રમઃ ભારત એટલે ઉત્તર હિન્દઃ વિન્ધ્યાચળ, હિમાલય, હિન્દુકુશ, કારાકોરમ, હાલા ને સુલેમાન પર્યન્તની પર્વતબાંધી કિલેબંધી.

ત્રેતામાં રામચંદ્રજી, ને ત્હેમની યે પૂર્વે અગસ્ત્ય મુનિ દક્ષિણની વિન્ધ્યા પૂર્વઘાટને પશ્ચિમઘાટની પર્વતબાંધી ને સાગરબાંધી કિલેબંધીમાં આર્યત્વ લઇને પ્રવેશ્યા ત્યહારથી દક્ષિણ પણ આર્યદેશ થયો. છતાં મનુમહારાજની આર્યદેશની વ્યાખ્યા ઇતિહાસ ભૂસી શકયો નથી. શાલીવાહન, પુલકેશિન, ચારે આચાર્યો. સાયણાચાર્ય, વિજયનગર, વિજાપુર, ચાંદબીબી, શિવાજી, પેશ્વાઈની મહાવાર્તા ભારતીય ઇતિહાસમાંથી અળગી રખાય એમ છે જ નહિ. ગોળકોંડાની ખાણોના જેવા એ યે આપણા ઇતિહાસના હીરા છે.

બીજો ભ્રમઃ ભારત એટલે કુસંપનું વતનઃ ભારતનાં રાજકુટુંબો એટલે કૌરવપાંડવ ને પૃથ્વીરાયજયચન્દ, ભારતની ભિન્ન ભિન્ન કોમો એટલે પરસ્પરનાં ખૂન.

ખરૂં. કિયા દેશમાં એમ નથી બન્યું ? રશિયા જર્મની ઈંગ્લાંડ વચ્ચેનું છેલ્લું યુરોપી યુદ્ધ એટલે મામામાસીફોઈનાં ભાંડુડાં વચ્ચેનું જ યુદ્ધ કે નહિ ! વીસમી સદીમાં યૂરોપ ભારતનાં બારમી સદીનાં ને ઈ. સ. પૂ. ૩૨ મી સદીનાં નાટક નથી ભજવતું દીઠું ? અકબરશાહ જ્યહારે જૈન પારસી ખ્રીસ્તી ધર્માચાર્યોને ન્હોતરતા હતા ત્યહારે મેરી ને ઇલઝબેથ નિજ ખ્રીસ્તી બન્ધુઓને જ પજવતાં હતાં. કબીર ને નાનક હિન્દુઈસ્લામના સમન્વય કાજે મથતા હતા ત્યહારે યૂરોપખોળે વિગ્રહ ખેલાતો હતો. ૧૬૪૮ માં વેસ્ટફેલિયાના તહનામા પહેલાં સારા યૂરોપમાં ધર્મવિગ્રહની લોહીની છોળો ને અગ્નિના ભડકા ઠામઠામ ન્હોતા શું ઉછળતા ?

ભારતીય ઇતિહાસનો ત્રીજો ભ્રમ એ છે કે ઇસ્લામ એટલે અન્ધકારયુગ. પંદર વર્ષની અંદર બે બે વાર સમરકન્દ જીતનાર બાબર, અઢાર વર્ષે પાણીપત ખેલનાર હુમાયૂન, તેર વર્ષે હેમૂને જતો કરી ગાઝી ન થનાર અકબર, છ વર્ષે હળદીઘાટમાં ઉતરનાર સલીમશાહ, પચ્ચીસ વર્ષમાં રાણો અમર અને મલીક અંબરને જીતનાર શાહજહાંન, બાવીસ વર્ષે બદક્ષાનમાં ચાલતે સંગ્રામે સેનાનીઓની તરવાર મ્યાન કરાવી નિમાઝનો આજ્ઞાટંકાર કરતા શાહઝાદા ઔરંગઝેબ; આગ્રા, દિલ્હી, ફતેહપુર સીક્રીના મહાલયો; તાનસેન સુરદાસ જેવા સંગીતાચાર્યો; ટોડરમલ્લ જેવા મન્ત્રીશ્વર; નાનક કબીર મુબારક અકબર સમા ધર્મસમન્વયકારકો; કેશવદાસ, વિહારીદાસ, ગંગ, તુલસીદાસ સમા કવિઓ; અને ઇસ્લામના દુશ્મન પ્રતાપ, દુર્ગાદાસ, શિવાજી, ગુરૂ ગોવિંદ: જે યુગમાં થયા એ યુગને અંધકારયુગ ભાખનારને ઇતિહાસની આંખ છે કે કેમ ? એ પ્રશ્ન શું ન થાય ?

ઇસ્લામ અંધકારયુગ ન હતો; સર્વ સંસ્કૃતિઓની પેઠે ઈસ્લામ પણ જ્યોતિર્યુગ હતો.

ભારતીય ઇતિહાસનો ચોથો ભ્રમ એ છે કે ત્યારે સ્ત્રીઓની અધમ દશા હતી. લીલાવતી, સરસ્વતી ગાર્ગી, સીતા, દમયંતી—ની પૌરાણિક કથાઓ ન ગણાવતાંયે યશોધરા, સંયુકતા, કર્માદેવી, જીજીબાઈ, અહલ્યાબાઈ, લક્ષ્મીબાઇ, ગુલબદન બાનુ બેગમ, સુલ્તાન સલીમા બેગમ, નૂરજહાંન, મુમતાઝ બેગમ, રોશનઆરા, જહાનઆરા, ઝેબુન્નિસા બેગમ, ચાંદબીબી—જે દેશમાં થયાં એ દેશમાં સ્ત્રીઓની અધમ દશા ભાખનાર ઇતિહાસ ભાખે છે કે ઇર્ષ્યા ? એમજ પૂછાય. એમનાં જોડલાં જગતઈતિહાસમાંથી શોધી શોધીને દાખવજો એટલે ઓળખીશું.

શું ઇસ્લામ યુગમાં કે શું હિન્દુ યુગમાં સુન્દરીનું સ્થાન ચન્દ્રકલા સમું ઉન્નત જ હતું.

ભારતીય ઇતિહાસનો પાંચમો ભ્રમ એ કે ભારત એવો દેશ છે કે જેના ઉપર પરદેશી હુમલાઓ થયાં જ કર્યા છે !

ખરૂં. જગત્ખોળે કિયો મહાદેશ છે કે જેના ઉપર પરદેશીઓ એ હુમલા નથી કીધા ? જેને પરદેશીઓએ નથી જીત્યો ? એ દેશનું નામ કહો. જ્યાં પર-દેશીઓએ નથી રાજ્ય કીધું, એ કિયો દેશ ? ગ્રીસ, રોમ, ફ્રાંસ, જર્મની, રશિયા ?

ઇંગ્લાંડને રોમે જીત્યું, ઍંગલ્સે જીત્યું, સેક્ષને જીત્યું, ડેનમાર્કે જીત્યું, નોર્સમેને જીત્યું, નોર્મન્ડીના ડયુકે જીત્યું. ને એ સૌએ રાજ્યે કીધાં એ સૌ હુમલાઓ ને સવારીઓ શુ ન હતાં ?

ભારતમાં એ સા બન્યું છે–પાંચે વાનાંઓ. માત્ર ભારતમાં કે પ્રધાનતઃ ભારતમાં એમ બન્યું છે એ ભ્રમ ઉતારજો.

જગત્ઇતિહાસના એવા અનેક ભ્રમ આજ પ્રવર્તે છે. જગત્ ઇતિહાસના અભ્યાસીઓ ભાખે છે કે એ ઇતિહાસ નથી, ઇતિહાસના ભ્રમ છે.

સદ્બન્ધુઓ ! ફ્રેન્ચવિપ્લવનો ત્રિમન્ત્રી પોકાર હતો, ત્રિરંગી જયધ્વજ હતો. ભારતીય ઇતિહાસનો યે ત્રિવર્ણો કાલપટ છે; હિન્દુ યુગ, ઇસ્લામ યુગ, યૂરોપીય યુગ.

ઈ. સ. ૧૧૯૩ ની સાલમાં સ્થાણેશ્વરના રણસંગ્રામમાં પૃથ્વીરાય ચોહાણ પડયો ત્યાં સુધીનો હિન્દુયુગ.

ઈ. સ. ૧૭૦૭ માં ઔરંગાબાદમાં ઔરંગશાહ દફનાયો ત્હેની સાથે ઇસ્લામનું ચક્રવર્તીત્વ દફનાયું.

ઈ. સ. ૧૭૪૮ માં ત્રિચિનોપલ્લીના ઘેરાથી કે. ઇ. સ. ૧૭૫૭ માં પ્લાસીના આંબાવાડિયાંઓમાં તોપખાનાં ગાજ્યાં ત્ય્હારથી બ્રીટને હિન્દને ઇસ્લા-મીઓ કનેથી જીતવા માંડયું. ઈ. સ. ૧૮૫૮ માં ઇસ્ટ ઇન્ડિયા કંપનીનું રાજ-છત્ર ગ્રેટબ્રિટનના રાજવીશિરે ધરાયું ત્ય્હારથી ભારતમાં બ્રીટનનું ચક્રવર્તીત્વ.

ભારતીય ઇતિહાસના ભિન્નભિન્ન યુગના એ સીમાસ્તંભો ભારતીય ઇતિ-હાસની કાલગંગાના એ ઘાટ. તીર્થના ઘાટે ઘાટે ડુબકી મારીએ છીએ એમ ચલો આપણે યે આજ એ ત્રણેય યુગઘાટે સ્હેજસ્હેજ ડુબકી મારી લઇએ.

સ્હામે પૂરે તરનારા તારાઓની પેઠે ગંગામુખથી મૂળ ભણી વિચરિયે ત્ય્હારે પહેલ્લું આવશે કલકત્તા.

અને કલકત્તા એટલે યૂરોપીય યુગ.

એ ભણુતાં એક ચેતવણી દઉં છું. યુરોપીઓને તેમ જ હિન્દીઓને; Political આંખે વાંચશો તો ઇતિહાસ અડધો ઉકલશે.

We are too near & in the period; absence of proper perspective is natural. એમાં કોમીભાવ, રાજકીય પક્ષાપક્ષી પેસે તો ઇતિહાસવેત્તા ફ્રીમેન, ગીબન, મેલીસન જેવા સ્પષ્ટ દૃષ્ટાને બદલે ફ્રૂડ, મેકોલે, હન્ટર, કે કીન વ્હીલર જેવા એકઅંખાળા નીવડે.

એ ખરૂં છે કે આ યુગમાં કલાઈવ, હેસ્ટીંગ્સ, ડેલહૌસી, કર્ઝન, ડાયર, ઓડવાયર થયા છે; તેમ જ એ પણ ખરૂં છે કે આ જ યુગમાં સર વિલિયમ જોન્સ, ટૉડ, ફોર્બ્સ, રીપન, હ્યુમ, મેક્ષમૂલર, એડવિન આર્નોલ્ડ, મોન્ટેગ્યુ યે થયા છે. કૌરવપાંડવ ઉભયને અવલોકજો, ઇતિહાસદ્રષ્ટા એટલે બેઅંખાળો નર.

યૂરોપી યુગને પણ ભવિષ્ય અજબ કહેશે.

આત્મારામ ભૂખણની પેઢી આફ્રિકા વ્હેપાર કરવા ગઈ, ને આખો આફ્રિકા ખંડ જીતી ઘેર કીધો; એમ કોઈ કહે તો ? તો ત્હેને પરીઓની વાર્તા-માંની એક કહો ! આ પણ એક પરીની વાર્તા જેવું છે.

મહમ્મદ ઘોરી છ વાર હાર્યો; સાતમી વારે સ્થાણ્વશ્વરમાં ભરતખંડને જીત્યો. બાબરે ૧૫૨૬ માં પાણીપતના એક સંગ્રામમાં ને ૧૫૨૭ માં કહાનવાના બીજા સંગ્રામમાં ભરતખંડ જીત્યો. હુમાયૂને ૧૫૩૯ ને ૧૫૪૦ ના બક્ષર ને કનોજના બે યુદ્ધોમાં ભારત ખોયું. બહેરામખાને ૧૫૫૬ ના એક પાણીપત-વિજયમાં હિન્દ સર કીધું. ૧૭૬૧ ના પાણીપતના એક પરાજયથી પેશ્વાઈનાં પૂર પાછાં વળ્યાં.

ભારત એમ જીતાતું ને એમ ખોવાતું.

૧૭૪૮ થી ગણતાં ૧૧ દાયકા ને ૧૭૫૭ થી ગણતાં પૂરો એક સૈકો બ્રીટને ભારત જીતતાં લીધો. ૧૮૫૮ માં ચક્રવર્તીત્વ સાધ્યું, ને ૧૮૭૭ માં ચક્રવર્તીત્વ ઉચ્ચાર્યું. સૈકાભરની એ અખંડ જયપ્રવૃત્તિ.

મદ્રાસ, કલકત્તા, મુંબઈ, એમ ત્રણ સ્થળેથી વ્યુહરચના આદરી, ને સૈકા-ભર અખંડ ભરતી ઉછાળી.

ઇસ્લામે સિદ્ધ કીધું કે હિન્દુકુશ, કારાકોરામ, હાલા, સુલેમાનની દુર્ગ-દિવાલો અભેદ્ય નથી. યુરોપે સિદ્ધ કીધું કે સાગરની ખાઇઓ કે પૂર્વઘાટ ને પશ્ચિમઘાટ પણ અજેય નથી.

જાળવતાં આવડે તો આત્મા એક જ અજેય છે.

આ યુગમાં ભારતનાં કમાડ ઉઘડ્યાં. ભારત પૃથ્વીની પ્રજાઓમાં ભળ્યું. જલધિ ને પર્વતાવલીની કુદરતી કિલ્લેબંધીમાં ઘેરાયેલું ભારત જગતથી અળગું

પડી ગયું હતું. આ યુગમાં પૃથ્વી જલ ને વાયુમાર્ગે ભારત મહાપ્રજાઓ સાથે જોડાઈ પૃથ્વીકુલમાં ભળ્યું, ભારતના જગત્સંબંધ બંધાયા.

ભારતમાં ચક્રવર્તીઓ આવતા અને જતા. ભરતદેવ, અશોકદેવ, અકબરશાહ, ઔરંગશાહ ચક્રવર્તી થયા ત્હો યે આ યુગમાં નાડીઓ જેવા સલેપાટથી ને તારથી ભારતના અવયવોનું સંગઠન થયું છે એવું પૂર્વે થયું ન હતું.

આ યુગ એટલે દૈવાસુર પ્રકૃતિ સમી Modernism નો જન્મયોગ.

આ પડઘાનો યુગ છે. યુરોપમાં બોલાય એના અંહી પડઘા પડે એ દૃષ્ટે જોતાં ગાંધીજીની સ્વરાજ્યઘોષણા યુરોપનો જ પડઘો છે.

આ યુગમાં Militant Hinduism નો જન્મ થયો. ભારતમાં એ ટંકાર કીધો ૧૮૭૭ માં ઓંકારનો ઝુંડો દિલ્હી દરબાર વચ્ચે ફરકાવી મહર્ષિ દયાનન્દે; ને પશ્ચિમ ગોલાર્ધમાં કીધો ૧૮૯૩ માં વિશ્વની ધર્મ મહાસભા વચ્ચે હિન્દુત્વનો સન્દેશ ઉચ્ચારી સ્વામી વિવેકાનન્દે; હિન્દના જગત્સંદેશાનાં મૂળ એમણે સજીવન કીધાં. બૌદ્ધોએ અશોકદેવના સમયમાં ધર્મમહાસભા ભરી ભિખ્ખુઓને જગત્યાત્રાએ પાઠવ્યા હતા. બે હજાર વર્ષે ફરીથી ભારતમાં આત્મિક જગત્ચક્રવર્તીત્વની ભાવનાનો પુનર્જન્મ થયો.

ચાલતો યુગ એટલે ત્રણ દૈત્યની વાર્તા; વાતપ્રવાહ, જલપ્રવાહ, ને વરાળિયો. વરાળિયાની બ્હેન વીજળીને એ કુટુંબમેળામાં ઉમેરીશું તો ઇતિહાસ સાક્ષી પૂરશે.

આજની સંસ્કૃતિ એટલે એ ચાર દૈત્યોની માયાવી લીલા. આગગાડી, તાર, આગબોટ, વિમાન, મનવાર, જલાંતઃસંચારિણી મનવાર; વોટ, મોર્કોની, ફ્રેન્કલીન, એડીસન, ફોર્ડ.

દલપતરામના અમર શબ્દોમાં કહીએ તો આજનો સુધારો એટલે હુન્નરખાનની ચ્હડાઈ.

જગત્સાહિત્ય, જગત્સમાચાર રોજ રોજ ઘરનાં બારણામાં આવી પડે છે.

આ યુગમાં જગત્ ન્હાનું થયું, હિન્દ વિશાળ થયું. હિમાલય ને હિન્દી મહાસાગર ઓળંગી ભારતીય દૃષ્ટિ પાછી વિશ્વવિશાળ થઈ.

પણ બદલામાં મ્હોંમાગ્યાં મૂલ હિન્દે દેવાં પડ્યાં છે. આજે એ હિન્દી રૂનો ભાવ અમેરિકા કહે તે, મોતીનો ભાવ પેરિસ ભાખે તે.

ઇસ્લામયુગમાં બહુધા લક્ષ્મી હિન્દમાં રહેતી. આજે બહુધા લક્ષ્મી ભારતનો કાંઠો છોડી જાય છે.

૧૭૪૮ માં ત્રિચિનોપલ્લીના ઘેરા વખતે ઓસામણ ભારતીય વીરોએ પી ભાત બ્રિટિશ સૈનિકોને આપ્યા હતા. આજેય તે આપણ તો ઓસામણજ રહે છે.

અસ્તુ. વ્યાધિઅવસ્થામાં મગનાં પાણી યે બલપ્રદ છે.

આજનો યુગ એટલે સુવર્ણયુગ. સોનાની શોધમાં યુરોપ અમેરિકા ગયો, ને પછી પૃથ્વીમાં પરવર્યો જ્યાં જ્યાં જડયું ત્યાંથી અમેરિકા, આફ્રિકા, એશિયા, આસ્ટ્રેલિયામાંથી, સોનું ને જવાહીર સંઘરી સંઘરી યુરોપમાં સંચ્યાં. મૂલ્યવાનનાં એટએટલાં મૂલ કેટકેટલાંકોએ એવાં પ્રીછ્યાં છે ?

૨૦ માં સૈકાની યુરોપની લક્ષ્મી ને પંદરમાં સૈકાની યુરોપની લક્ષ્મી એની બાદબાકી તે છેલ્લા પાંચ સદીનો યુરોપી સંસ્કૃતિનો જગતઇતિહાસ.

સંસ્કૃત સાહિત્યને સજીવન કરી આંગણ આંગણ વેંચનાર અને હિન્દુયુગ ને ઇસ્લામયુગના ઇતિહાસના સંશોધક આ યુગનું ઋણ આપણે ઇતિહાસના અભ્યાસીઓએ આજ સ્વીકારવું જ ઘટે.

હિન્દ આવવા નીકળેલો યુરોપ જગત્યાત્રાએ કેમ સંચર્યો એ કથા કોલંબસના જીવનવૃતમાં ને Seely's Expansion of England માં વિસ્તારથી આલેખેલી છે.

રાતો સમુદ્ર ને ઇરાની અખાતની માર્ગે ભૂમધ્ય સમુદ્ર વાટે હિન્દનો યુરોપ સાથે વ્હેવાર હતો. બગદાદ, ડમાસ્કસ, અલેપ્પો, એલેકઝાન્ડ્રા, વેનિસ, જીનિવાના શહેરો હિંદના માલ ઉપર કમીશન ચ્હડાવતા, ને તેથી પશ્ચિમ યુરોપને એ માલ મોંઘો પડતો.

ભારતનો સિધો માર્ગ પશ્ચિમ યુરોપને લાધે તો એ નગરોનું કમીશન ન ચઢે. સસ્તાઈ થાય, લાભ પોતાને રહે.

પૃથ્વી ગોળ છે. પશ્ચિમમાં પ્રયાણ આદરશું તો પૂર્વમાં પ્હોચીશું. સાગર ઉપર ઝંપલાવ્યું. પશ્ચિમ યુરોપની દરિયાઈ પ્રજાઓની સ્પર્ધા જામી.

પહેલા ફિરંગીઆ ( પોર્ટયુગીઝ સ્પેનિયાર્ડ્ઝ ) ચ્હડ્યા. પછી વલંદા, પછી ફ્રેંચ, છેલ્લે ૧૬૦૧ માં ઇસ્ટ ઇન્ડિયા કંપની.

હિન્દની અઢળક દોલતનાં આકર્ષણે પશ્ચિમ યૂરોપ જાગી ઉઠયો. હિન્દ આવતાં મારગમાં યૂરોપને અમેરિકા ખંડ ઠેશે ચ્હડ્યો.

યૂરોપીય પ્રજાઓની એ સ્પર્ધા હજી યે પૂરી નથી થઈ, જો કે સ્હાંઝ પડી છે. કારણ કે જીતવાની પૃથ્વી ખૂટી ગઈ.

એ પ્રજાસ્પર્ધામાંથી યૂરોપમાં જ નવનવા પ્રજારોગ જન્મ્યા. Colonization, Industrialism, Capitalism, Imperialism વિ. અને એ પ્રજા-

